# मति विकार

[ सामाजिक नाटक ]

-: लेखक :-

कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर
बी. ए. एल्‌एल्. बी.

टीकात्मक विवेचन-

प्रा. वा. दा. गोखले, एम. ए., बी. टी.
प्रा. म. वि. फाटक, एम. ए., बी. टी.

जून १९४८ ] [ मूल्य ३॥ रुपये



मॉडर्न बुक डेपो, प्रकाशन



# कांही संदर्भ ग्रंथ

(१) कोल्हटकर लेखसंग्रह प्रस्तावना.

(२) समग्र केळकर: खंड १०–साहित्यखंड 'मतिविकार' परीक्षण.

(३) मराठी नाट्यसृष्टि—डॉ. वि. पां. दांडेकर

(४) मराठीचा नाट्यसंसार—श्री. वि. स. खांडेकर

(५) मराठी साहित्य समालोचन—श्री. वि. सी. सरवटे

(६) दोन तात्या,<br>युग प्रवर्तक कोल्हटकर :– श्री. ग. त्र्यं. माडखोलकर

(७) प्रदक्षिणा–नाट्य–प्रा. श्री. ना. बनहट्टी

(८) कोल्हटकरांच्या नाटकांतील सुंदर उतारे–श्री. रा. ग. गडकरी

(९) श्रीपाद कृष्ण कोल्हटकर—श्री. गं. दे. खानोलकर.

(१०) महाराष्ट्रीय नाटककार–श्री. कृ. कोल्हटकर. शं. ब. मुजुमदार

(११) मतिविकार–श्री. पु. रा. लेले (समीक्षक १९४५)



**मुद्रक** :–पृष्ठें १ ते १३६

**भ. पं. सोमण,** मॉडर्न प्रिंटिंग प्रेस, ३९१ नारायण पेठ, पुणे २.

बाकी सर्व:—

वि. गं. केतकर, लोकसंग्रह छापखाना, ६२४ सदाशिव पुणें २.

**प्रकाशक**:–ना. त्र्यं. भिडे, बी. ए., मॉडर्न बुक डेपो, पुणें २.

# श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

## त्रोटक परिचय

[ १८७१ ते १९३४ ]

कोल्हटकरांचें घराणें जरी कोकणांतील नेवरें गांवचें असलें तरी त्यांचे पणजे देशावर आल्यापासून त्यांचा तिकडील संबंध कमी कमी होत गेला. कोल्हटकर २९–६–१८७१ रोजीं नागपूरला जन्मले. वयाच्या नवव्या वर्षी अर्धांगवायूचा झटका येऊन त्याचा परिणाम त्यांच्यावर थोडासा झाला तो अखेरपर्यंत राहिला. त्यांचें प्राथमिक व दुय्यम शिक्षण नागपूरला झालें. या शालेय जीवनांतच नाटकें वाचण्याची त्यांना आवड निर्माण झाली; व त्याचा दृश्य परिणाम म्हणजेच या काळांत त्यांनीं 'सुखमालिका' नांवाचें एक नाटक लिहिलें.

१८८८ मध्यें मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यावर कोल्हटकर पुण्यास येऊन डेक्कन कॉलेजमध्यें दाखल झाले. कै. न. चि. केळकरांचा स्नेह त्याच काळांत झाला आणि 'साहित्याच्या' साधर्म्यामुळे तो अखेरपर्यंत टिकला. कॉलेजच्या वातावरणांत त्यांच्या नाट्यवाङ्मयाच्या अभ्यासाला व्यवस्थित रूप प्राप्त झालें. १८९१ मध्यें कोल्हटकर बी. ए. ची परीक्षा पास झाले व नंतर ते कायद्याचा अभ्यास करण्यासाठी मुंबईत आले. १८९७ मध्यें एल्एल्.बी. झाल्यावर ते वऱ्हाडांत वकिली करण्यास गेले. मुंबईच्या या मुक्कामांत त्यांच्या टीकालेखनास आरंभ झाला आणि याच काळांत 'वीर-तनय, व 'मूकनायक' ही त्यांचीं सामाजिक नाटकें लिहून झालीं.

कोल्हटकरांनीं वऱ्हाडांत अकोला, तेल्हारा, खामगांव व जळगांव येथें वकिली केली आणि त्या धंद्यांत त्यांनीं जरी यश व पैसा मिळविला असला तरी त्यांचा खरा नांवलौकिक त्यांच्या वाङ्मयनिर्मितीमुळेच झाला. 'नाटककार, कवि, टीकाकार, विनोदी लेखक' इत्यादि विविध भूमिकेवरून यांनीं केलेलें लेखन उच्च दर्जाचें ठरलें आहे. 'वीरतनय, मूकनायक, गुप्तमंजूष, मतिविकार, जन्मरहस्य, सहचारिणी, प्रेमशोधन, वधूपरीक्षा'

इत्यादि बारा नाटकें; 'महाराष्ट्र गीता' सारख्या प्रासादिक कविता; 'रागिणी, सौभद्र, तोतयाचें बंड' इत्यादि पुस्तकांवरील टीका; आणि 'गणेश चतुर्थी, झोंप, श्रावणी, साहित्यसंमेलनाची तयारी, आमचे बैठे खेळ, चोरांचें संमेलन' इत्यादि सुदाम्याच्या पोह्यांतील लेख यांचा विसर वाचकांना केव्हांहि पडणार नाही. साहित्याप्रमाणेच ज्योतिषशास्त्राचाहि त्यांचा व्यासंग जबर होता.

पुणें येथें भरलेल्या कविसंमेलनाचे व नंतर १९२७ मध्यें भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते व या अध्यक्षीय पदावरून केलेलीं त्यांचीं भाषणें आजहि साहित्यशास्त्राच्या अभ्यासाला आधारभूत ठरलीं आहेत.

**मतिविकार** हें नाटक १९०६ मध्ये लिहिलें गेलें व किर्लोस्कर नाटक मंडळीकडून तें १९०७ मध्ये प्रथम रंगभूमीवर आलें.

---

# मतिविकार : टीकात्मक विवेचन

## १ मराठी नाटयाची पूर्वपीठिका

मराठी रंगभूमीचा शतसांवत्सरिक उत्सव सांगली येथे एकोणवीसशे त्रेचाळीसमध्ये थाटानें साजरा झाला; आणि तेव्हांपासून मराठी नाट्यसृष्टीच्या अभ्यासाला एक प्रकारचें ऐतिहासिक व तुलनात्मक वळण प्राप्त झालें. १८४३ मध्ये श्रीमंत सांगलीकरांच्या प्रोत्साहनानें विष्णुदास भावे यांनीं मराठी नाटकें रचून तीं प्रयोग रूपानें जनतेसमोर आणलीं. या वेळेपासून ते इ. स. १८६० पर्यंत मराठी नाट्यसृष्टि केवळ पौराणिक आख्यानांवर आणि राक्षस पात्रांच्या धांगडधिंग्यावर आधारलेली होती. १८६० च्या सुमारास परशुराम तात्या गोडबोले, कृष्णशास्त्री राजवाडे इत्यादि मंडळींनीं संस्कृत नाटकांचीं भाषांतरें केलीं; या संस्कृत भाषांतरांच्या जोडीस हास्यरसप्रधान अशीं प्रहसनेंहि लिहिली गेलीं. इंग्रजी विद्या शिकून तयार झालेल्या विद्वानांची एक पिढी निर्माण झालेली होती. त्यांच्यापैकींच श्री. महादेवशास्त्री कोल्हटकर यांनीं इंग्रजी नाटकांचीं रूपांतरें करण्यास आरंभ केला. आणि अल्पावधींतच पुढें शेक्सपिअरच्या सर्व प्रसिद्ध नाटकांचीं रूपांतरें झालीं.

१८८० नंतर मराठी नाट्यसृष्टीला जर नमुनेदार बाळसें आणून देण्याचा कोणी विशेष प्रयत्न केला असेल तर तो त्रिलोकेकर, अण्णा किर्लोस्कर व देवल यांनींच होय. मराठी नाटकांना निश्चित वळण लावून त्यांतील संगीताची पात्रानुसार वांटणी करून देण्याचें व नाटक हें कलाविलासाच्या द्वारें सामान्य जनतेंत प्रिय करण्याचें कार्य शाकुंतल, सौभद्र, रामराज्यवियोग, इत्यादि नाटकांनींच या काळांत केलें आहे. या नाटकांचें वळण मुख्यतः बालबोध होतें व त्यांचें संविधानक जरी संस्कृत किंवा इंग्रजी नाटकांवरून घेतलेलें होतें तरी साधे–सोपे पण चटकदार संवाद, मनाची पकड घेणारी कथावस्तु, सर्वत्र प्रतीत होणाऱ्या व्यक्तिरेखा, सोप्या चालीवरचीं भावमधुर पदें आणि ओघवती नाट्यरचना–इत्यादि गुणांमुळे हीं नाटकें गेलीं पन्नास वर्षें सतत डोळ्यासमोर राहिलीं आहेत.

## २ महाराष्ट्रांतील नवा मनु

१८८० ते १९०० हा वीस वर्षांचा कालखंड महाराष्ट्राच्या सर्वांगीण विकासाच्या इतिहासाच्या दृष्टीनें पुनरुज्जीवनाचा आहे. पाश्चात्य विद्या, शास्त्रें व संस्कृति यांचा प्रसार करणाऱ्या शाळा-कॉलेजांचीं पुष्कळ ठिकाणीं स्थापना झालेलीं होती. पाश्चात्यांची हिंदवासीयांना पडलेली भूल चिपळूणकरांच्या निबंधमालेपासून उतरूं लागलेली पण याच काळांत दिसून आली. या बदलत्या काळाचें चित्र रेखाटतांना प्रा. श्री. ना. बनहट्टी म्हणतात, "....राजकीय, सामाजिक व धार्मिक ध्येयवाद या काळांत उदय पावत होता. पाश्चात्य शिक्षणानें भूषित झालेले सुधारक समाजजीवन बदलण्याच्या उद्योगाला लागलेले, तर पाश्चात्य आदर्श जसेच्या तसें घेणें इष्ट नाही म्हणून विरोध करणारा समंजस व सनातन धर्माभिमान्यांचा वर्ग या सुधारकांना विरोध करण्यास पुढे सरसावल्यामुळे नव्या जुन्यांचा झगडा निकराला जाऊन सर्व वातावरण व्याप्त होऊन गेलें होतें. सामाजिक ध्येयवाद आगरकरांच्या द्वारे व्यक्त होत होता. धार्मिक ध्येयवाद रानड्यांमध्ये अवतीर्ण झाला होता. तर राजकीय ध्येयवाद टिळकांच्या मुखानें बोलत होता. या तिघांच्या उद्‌गारांनीं व उद्योगांनीं त्या काळचें वातावरण भरून गेलें होतें.!"*

चिपळूणकर व टिळक आणि लोकहितवादी, ज्योतिबा फुले व आगरकर यांच्या राजकीय व सामाजिक चळवळींचा परिणाम साहित्यावर होणें अपरिहार्यच आहे. त्यामुळे समाजजीवनाचे भाष्यकार व ललितलेखक या नव्या दृष्टीकोनांतून लेखन करूं लागलें. टिळक, गोखले व परांजपे यांचे राजकीय निबंध; रानडे, आगरकर व पटवर्धन यांचे सामाजिक लेख; हरिभाऊ आपटे यांच्या सामाजिक कादंबऱ्या; केशवसुतांनीं काव्यक्षेत्रांत फुंकलेली तुतारी; आणि नाट्यसृष्टीच्या सामाजिक दालनांत झालेलें श्री. कृ. कोल्हटकरांचें पदार्पण—हीं साहित्यक्षेत्रांतील नव्या विचारांच्या आगमनाचीं प्रसादचिन्हेंच होत.

---

* प्रा. श्री. ना. बनहट्टी–प्रदक्षिणा. नाट्यवाङ्मय व त्याचा विकास–पृष्ठ १७०

## २ श्री. कृ. कोल्हटकर : व्यक्तिदर्शन

श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचा जन्म १८७१ मध्यें नागपूरला झाला; आणि तेथेंच त्यांचे आरंभीचें शिक्षण झाल्यावर, ते १८८८ मध्यें पुण्यास डेक्कन कॉलेजमध्यें उच्च शिक्षणासाठीं आले. कै. न. चिं. केळकर हे त्यांचे या काळांत सहाध्यायी होते. पुण्यास तीन वर्षें राहून ते १८९१ मध्यें बी. ए. झाले. नंतर त्यांनीं मुंबईस एल्एल्. बी. चा अभ्यास सुरू केला आणि १८९७ मध्ये वकीलीची परीक्षा पास झाल्यावर ते वऱ्हाडांत वकिली करण्यास गेले. मुंबईस वकिलीचा अभ्यास करीत असतांनाच त्यांनीं नाटकें लिहिण्यास आरंभ केला होता. त्यांचें पहिलें नाटक स्वतंत्र, कल्पनारम्य व सामाजिक होतें. हें १८९२ मध्ये तयार झालेल्या 'मूकनायक' या नाटकांवरून स्पष्ट होईल. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात शिकून तयार होणाऱ्या या तरुण नाटककारावर दुहेरी परिणाम झाला असल्यास नवल नाही. कॉलेजमध्ये आंग्ल नाट्यवाङ्मयाच्या वाचनानें, मुख्यत्वे शेक्सपिअर-व मोलिअर यांच्या नाट्यतंत्राचा त्यांचेवर ठसा उमटला होता. महादेवशास्त्री कोल्हटकर, शं. मो. रानडे, व आगरकर यांनीं शेक्सपिअरच्या प्रसिद्ध नाटकांचीं रूपांतरें १८८० च्या पूर्वीच केलेलीं होतीं व त्यांचे प्रयोगहि मराठी रंगभूमीवर होऊं लागले होते. शेक्सपिअरच्या रूपांतरित नाटकांचा परिणाम लोकमतावर किती जबर होतो याचीहि प्रतीति कोल्हटकरांना त्यावेळीं आलेली होती. फक्त त्या धर्तीवर स्वतंत्र कथावस्तु घेऊन नाट्यरचना मात्र कोणी केलेली नव्हती. कोल्हटकरांच्या सव स्वतंत्र नाट्यरचनेच्या मनोभूमिकेचा हा तांत्रिक भाग जसा अभ्यासला जाणें आवश्यक आहे तसाच या नाट्यांतून प्रकट होणाऱ्या विचारांची बैठकहि समजून घेणें आवश्यक आहे. या काळांत लो. टिळकांचें जहाल राजकारण सुरू झालेलें असलें तरी कोल्हटकरांच्या मनोवृत्तीवर त्याचा फारसा परिणाम झालेला दिसत नाही. राजकीय विचाराच्या दृष्टीनें कोल्हटकर टिळकांपेक्षां, रानडे व गोखले यांच्या नेमस्त व सनदशीर पक्षाकडेच झुकलेले होते. नेमस्त व प्रगत विचारांच्या साधर्म्यामुळे

सामाजिक बाबतींत ते आगरकर–पक्षाकडे वळलेले असणें अपरिहार्यच होतें. कोल्हटकरांच्या सर्व सामाजिक नाटकांत जे सुधारणावादी समाजविचार आहेत त्याचें मुख्य कारण म्हणजे आगरकरांच्या सामाजिक मंत्रांचे पडसाद, त्यांच्या तरूण, भावनोत्कट पण विचारक्षम अंतःकरणावर उमटलेले होते. केवळ त्यांची सामाजिक नाटकेंच नव्हे तर 'श्यामसुंदर,' 'दुटप्पी कीं दुहेरी' अशा सामाजिक कादंबऱ्यांचाहि उगम या विशिष्ट मनोभूमिकेंतून झालेला आहे.

## ४ कोल्हटकरांच्या नाट्याची भूमिका :

कोल्हटकर किंवा अन्य कोणीहि तत्कालीन सामाजिक नाटककार अभ्यासावयाचा म्हणजे १८८० ते १९०० या कालखंडांतील महाराष्ट्रांतील सामाजिक चळवळींचा इतिहास प्रथम दृष्टिसमोर ठेवणें अपरिहार्य ठरतें. 'स्त्रीशिक्षण, स्त्रीस्वातंत्र्य, बालविवाह, *स्त्रीपुनर्विवाह, संभोगसंमतीचें वय*,' आधुनिक शिक्षणाच्या योगानें माजलेलें दौर्बल्य व दुराचार, अस्पृश्यता, हुंड्यासारख्या दुष्ट चाली ' हे या काळांतील चर्चेचे व वादाचे विषय होते. या सर्व खळबळीचें प्रतिबिंब तत्कालिन वाङमयावर व त्यांतूनहि नाट्यवाङमयावर पडलें असल्यास नवल नाही ×. महादेव शिवराम गोळे यांचा ' हिंदुधर्म आणि सुधारणा ' हा प्रबंध, केसरी–सुधारक या पत्रांतील अग्रलेख, हरिभाऊ आपटे यांच्या सामाजिक कादंबऱ्या, केशवसुतांची 'तुतारी '— हीं विविध वाङमयीन उदाहरणें या विशिष्ट काळाचीं प्रतिनिधि ठरतील. ह्या काळचा बहुजनसमाज जुन्याचा अभिमानी व सुधारणेस विरोधी असल्यामुळे सुधारकांची टवाळी व सुधारणेंतील दोष-दर्शन मोठ्या हिरीरीनें कांही नाटककारांनीं केलें असल्यास नवल नाही. त्यापैकीं उल्लेखच करावयाचा तर ना. बा. कानिटकर व ना. कृ. भागवत यांचा केला पाहिजे. कानिटकरांच्या नाटकांपैकी ' तरुणी शिक्षण नाटिका ' ( १८८६ ), ' संमति कायद्याचें नाटक ' ( १८९२ ), आणि भागवतांचीं

* १८७० मध्ये पुण्यांतील पुनर्विवाहाच्या प्रश्नावरील वाद. १८९० संमति वयाच्या बिलाचा वाद.

× प्रा. श्री. ना. बनहट्टी : प्रदक्षिणा पृष्ठ—१७१

' मोर एल्. एल्. बी प्रहसन ,' ' फॅशनेबल वाईफ ' हीं नाटकें रंगभूमीवर त्या काळांत विशेषच गाजलीं पण सुधारकहि कांहीं गप्प बसले नव्हते. अण्णा मार्तंड जोशी यांचें, पुनर्विवाहाची तरफदारी करणारें नाटक ' सौभाग्यरमा ' १८८५ मध्येच लिहिलें गेलें होतें. सारांश या काळांतील लोकांच्या ठिकाणीं, जुन्यानव्याच्या झगड्यामुळे, विलक्षण क्षोभ निर्माण झाला होता. घरोघरीं त्या क्षोभानें भरलेले संसार दिसत होते. याच संसाराचीं चित्रें तत्कालिन नाटककारांनीं आपापल्या मगदुराप्रमाणे नाट्यरूपानें रंगविण्याचें ठरवितांच अनेक सामाजिक नाटकें जन्मास आलीं.* अर्थातच हीं नाटकें मुख्यत्वें एकांगी प्रचाराच्या भूमिकेवरून लिहिलीं गेलीं असल्यामुळें त्यांत अभिजात कलाविलास फारसा आढळत नाही. १८९९ मध्यें देवलांनीं बालावृद्धविवाहाच्या प्रश्नावर ' शारदा ' नाटक लिहिलें तें मात्र त्यांतील नाट्यात्मक गुणांमुळे अमर झालें आहे.

वर उल्लेख केलेल्या महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनाशीं व त्या अनुरोधानें झालेल्या चर्चा–चळवळींशी कोल्हटकर तद्रूप झाल्यामुळे हे सामाजिक प्रश्न त्यांच्या वीरतनय, मूकनायक, गुप्तमंजूष, मतिविकार' प्रेमशोधन, वधूपरीक्षा, जन्मरहस्य, सहचारिणी – इत्यादि सामाजिक नाटकांतून पात्र व प्रसंग यांच्याद्वारें रंगभूमीवर आले आहेत. कोल्हटकरांच्या पूर्वी याच प्रश्नांवर सामाजिक नाटकें लिहिलीं जाऊनहि, देवल अपवाद मानल्यास, कोल्हटकरांनाच ' आद्य मराठी सामाजिक नाटककार , ' युगप्रवर्तक नाटककार ' अशा संज्ञेनें टीकाकार गौरवितात.

याचें कारण हें कीं सामाजिक प्रश्नाभोंवतीं कलाविलासाची चौकट निर्माण करण्यांत त्यांनीं प्रथम यश मिळवून दाखविलें आहे. मराठी नाट्यसृष्टींत शेक्सपिअर–मोलिअर पद्धतीची रम्य ( romantic ) व रहस्यप्रधान पण स्वतंत्र नाट्यरचना, चटकदार संवाद, सामाजिक प्रश्नांचा उहापोह, शैलीतील कल्पनाविलास, अभिजात विनोद, आणि रागदारीचीं

* प्रा. वि. पां. दांडेकर : मराठी नाट्यसृष्टि–सामाजिक–नाटकें पृष्ठ २५

संगीतयोजना " या त्यांच्या विशेषांमुळे माडखोलकरांनीं त्यांना ' युगप्रवर्तक " म्हटलें आहे, तर खांडेकरांनीं ' नव्या मनूचे प्रवर्तक ' ठरवलें आहे. प्रा. जोग यांची कवीच्या मोठेपणाची कल्पना ' स्वयंभूत्व व नाविन्याचें अनुकरण ' या मूल्यावरून ठरवली तर कोल्हटकर त्याहि कसोटीस उतरतील.

**५ " मतिविकार " : एक सामाजिक प्रश्न.**

' मतिविकार ' या सामाजिक नाटकाचा जन्म ' स्त्रीचा पुनर्विवाह ' ह्या प्रश्नाच्या चर्चेतून झाला आहे. प्रथम पत्नीच्या निधनानंतर पुरुष द्वितीय विवाह करूं शकतो; पण प्रथम पतीच्या निधनानंतर पांढरपेशा वर्गांतील स्त्री ही जन्मभर विधवाच ठरते; इतकेंच नव्हे तर सौभाग्यदर्शक चिन्हें दूर करून, केशवपनादि दुष्ट रूढींनीं ती विद्रूप केली जाऊन सामाजिक व्यवस्थेच्या वरवंट्याखाली ' उपेक्षित ' होते हें चित्र या नाटकांत रंगवून, पुनर्विवाहास जनतेचें मत अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न केलेला आहे.

आज पुनर्विवाह रूढ झालेला आहे. आगरकरांच्या हिरीरीच्या वैचारिक प्रचारानें आणि डॉ. धोंडो केशव कर्वे यांच्या दीर्घोद्योगामुळे पुनर्विवाहास समाजांत आज मान्यता लाभली आहे. त्यामुळे आजच्या व मुख्यत्वे उद्यांच्या पिढीस पुनर्विवाहाचा प्रश्न ' नाट्यविषय ' व्हावा याचा अचंबा वाटण्याचा संभव आहे. परंतु १९२० पर्यंतच्या महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनांत या प्रश्नानें खळबळ माजली होती हें ऐतिहासिक सत्य विसरून चालणार नाही. आणि त्यामुळेच हें नाटक तत्कालिन Problem Play ठरल्यास आश्चर्य नाही. याच विषयावर कोल्हटकरांच्या आधीं व नंतरहि नाट्यरचना झालेली होती असें आपणास ' पुनर्विवाह–दुःखदर्शन ' ( १८८५ ), ' स्वैरसकेशा ' ( १८७१ ), ' मनोरमा ' ( १८९१ ) ' रूढि दिग्विजय ' ( १८८५ ), ' सौभाग्यरमा ' ( १८८५ ), ' इंदिरा–माधव ' ( १८९५ ), ' रूढिविनाश ' इत्यादि आधींच्या व गडकऱ्यांच्या ' प्रेमसंन्यास ' ( १९११ ) या नंतरच्या नाटकांवरून म्हणावें लागेल. कोल्हटकरांच्या ' मतिविकार'च्या तुलनेनें आधींचीं नाटकें फारच कमी प्रतीचीं कलात्मक वाटतील. आणि गडकऱ्याचें प्रेमसंन्यास जरी मतिविकारा–

पेक्षां अधिक उत्कट व सरस वाटलें तरी कोल्हटकरांनीं रंगभूमीवर घडवून आणलेला पुनर्विवाह, गडकरी प्रत्यक्ष रंगवू शकले नाहीत ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे-

**६ मतिविकार–अभ्यासः—**

मतिविकार या नाटकाचा अभ्यास विविध दृष्टीनें करण्यास हवा. केवळ नाटकाचें बाह्यतंत्र घेऊन जसें विवेचन करावयास हवें तसेंच नाटककाराची पन्नास वर्षापूर्वींची मनोभूमिका अभ्यासूनहि नाटकाचें विवेचन झालें पाहिजे. तांत्रिक विवेचनाच्या दृष्टीनें मथळ्याचा प्रथम विचार करावयास हवा. कोल्हटकरांच्या सर्वच नाटकांचीं नांवें पांच अक्षरी आहेत असें सहजदर्शनीं आढळून येईल. पांच अंकीं नाटकाचा स्थूल आराखडा व त्यांस पांच अक्षरी अभिधान हें वैशिष्टय मान्य करून त्या नाटकाच्या नांवाची चर्चा करणें अगत्याचें ठरेल. पुनर्विवाहाच्या प्रश्नावरील नाटकास ‘ मतिविकार ’ हें नांव कां ठेवावें हें कळत नाही. ‘ रूढीग्रस्त समाजाच्या मतीस झालेला विकार हा, की बालविधवेच्या पुनर्विवाहास तो मान्यता देत नाही ’ असें एक स्पष्टीकरण देतां येईल. दुसरें असेंहि म्हणता येईल की या नाटकांतील बहुतेक पात्रांच्या बुद्धीस कांहीं ना कांहीं स्वरूपाचा दोष ( विकार ) लागलेला आहे. ती बुद्धि शुद्ध नाही; स्वार्थानें, रूढीनें किंवा परंपरागत अभिमानानें व दिखाऊ जीवनविषयक मूल्यांनीं दूषित झालेली आहे. सरस्वती, वेणू, चंद्रिका, तरंगिणी हीं स्त्रीपात्रें किंवा चकोर, आनंदराव, विहार, हरिहरशास्त्री–फार काय भेकडभट–हीं पुरुषपात्रें सरळ वैचारिक दृष्टीनें जीवनाची विशालता बघूं शकत नाहीत. आणि यामुळे मतिविकार ( मतीस झालेला विकार ) हें नांव दिलेलें असावें. संस्कृतमध्यें विकार याचा अर्थ मराठी अर्थापेक्षां भिन्न स्वरूपांत आढळतो. विकार म्हणजे ‘ इष्ट सुधारणा असा होऊं शकेल. * नाटकाचें प्रतिपाद्य व

* वा. शि. आपटे शब्दकोश पहा :

विकार 1 change of form or nature
2 a modification
3 change of mind or purpose

त्याचें अभिधान याचें संबंध अतिव्याप्त वाटतात. ' Apt , appropriate attractive, accurate (अर्थपूर्ण, आटोपशीर, आकर्षक, अचूक) हीं मथळयांचीं वैशिष्टयें आढळत नाहींत. खुद्द नाटकांतील चकोराखेरीज पात्रेहि, ' मतिविकार ' यादृष्टीनें स्पष्टीकरण करतांना आढळत नाहीत.

पुर्नविवाहाविरुद्ध असणाऱ्या आनंदराव, सरस्वती, विहार इत्यादि पात्रांच्या मतींत इष्ट तो बदल झाला म्हणून ' मतिविकार ' असा अर्थ घ्यावा लागेल. कै. न. चि. केळकरांनाहि या नांवाचें गूढ पडलेलें आहेच. ते म्हणतात ' या आधुनिक नाटककारास व कवीस विरोधाभासाइतका दुसरा कोणताच अलंकार आवडत नाही. वीरतनय, मूकनायक, गुप्तमंजूष, हीं नांवें व प्रतिपाद्य यांचा सुतराम् संबंध नाही. तीच गोष्ट मतिविकार या नांवाची. पुर्नविवाह ही चागली सुधारणा म्हटली तर वरील प्रमाणें मतांतर होणें हा मतीचा एक प्रकारें विकासच म्हणतां येईल.' *

या दृष्टीनें बघितलें तर मतिविकारापेक्षां मतिविकास हेंच नांव समर्पक ठरलें असतें.

**७ 'कथावस्तु':—**

कथावस्तूच्या दृष्टीनें बघतां असें आढळून येईल कीं हें कथानक उगाच गुंतागुंतीचें वाटत नाही (गुप्तमंजूष–प्रेमशोधन–वधूपरीक्षेसारखें) चकोर-चंद्रिकेचें लग्न ठरवलें गेलेलें असतें. परंतु चकोर उच्च शिक्षणासाठी जपानला गेला असतांना, चंद्रिकेचे वडील आनंदराव स्वत: उतार वयांत सरस्वती नांवाच्या एक अल्पवयीं कुमारिकेशी लग्न करून त्या मोबदल्यांत एका वृद्धाच्या गळयांत चंद्रिकेला बांधतात. पण वरातीच्याच दिवशीं हा वृद्ध दारुकामानें गुदमरुन् मरतो.. चकोर आल्यावर त्याच्या वडील भावा-कडून – ( मनोहर ) त्यास चंद्रिकेची हकीगत कळते.

चंद्रिकेचे वडील आनंदराव तरुण पत्नीच्या हातीं बाहुलें बनलेलें असतात. तिला घरकामांत मदत व्हावी म्हणून ते मुलीच्या केशवपनास सम्मति देतात परंतु त्यांचा मोठा मुलगा विहार याच्या रदबदलीमुळे हा

* समग्र केळकर वाङमय खंड १२ : साहित्य खंड–पृष्ठ९१६

प्रसंग तेव्हां टळतो. विहार व तरंगिणीचा संसार आनंदाचा असला तरी तरंगिणीचे भाऊ (मनोहर व चकोर) सुधारक म्हणून विहार त्यांना प्रतिस्पर्धी मानतो. यांतच हरिहरशास्त्री या दांभिक व दुष्ट मनुष्याची भर पडते. हरिहरशास्त्र्यानें वेणू नांवाच्या गतभर्तृकेची बेअब्रू केलेली असून आतां त्यांचें लक्ष सरस्वतीकडे व चंद्रिकेकडे वळतें; पण त्या दोघी त्याला वळत नाहीत हें पाहून तो 'खलपुरुष' बनतो. सरस्वती व मनोहर यांचे संबंध व चकोर चंद्रिका यांचे संबंध अनीतिमय आहेत असें भासवून तो या भावंडांविरुद्ध आनंदराव, विहार यांची एक विरोधी फळी उभी करतो. गुप्तपणें मारहाण करून व चंद्रिकेस समुद्रकाठीं नेऊन केशवपनप्रसंगीं भ्रष्ट करण्याचाहि डाव तो रचतो. परंतु या खलपुरुषाचे हे डाव अखेर उधळले जातात. विषम विवाहाची आनंदरावांना जाणीव होते, 'पुरुष विधुर राहूं शकत नाही मग स्त्रियानीं विधवा कां रहावें हा विचार विहारला स्वानुभवानें पटतो व अखेर चकोरचंद्रिकेचें लग्न ठरतें.

कथावस्तूचें परीक्षण केल्यास असें आढळून येईल की कथानकांत उगाच गाल्हाळ आणलेला नाही. चकोर हा बैराग्याच्या वेषानें चंद्रिकेच्या भेटीस जातो आणि विहाराला सोडून गेल्यावर तरंगिणी 'कल्याणी' या नांवानें बुरखा घेऊन मनोहरच्या आश्रमांत राहून विहाराची परीक्षा घेते (अंक ५) हे दोनच प्रसंग असे आहेत कीं जे वास्तवतेच्या मर्यादा सोडून कल्पनारम्यत्वांत जमा होतात. परंतु कोल्हटकरांवरील शेक्सपिअरच्या नाटयतंत्राचा हा परिणाम केवळ मतिविकारांत नव्हे तर त्यांच्या इतरहि नाटकांत दिसून येतो. ('दुटप्पी कीं दुहेरी' या कादंबरींतहि हेंच दिसून येईल.) हें नाटक अखेरीस 'सुखान्त' असलें तरी तें निव्वळ आनंदप्रधान या कोटींत जमा होणारें नाहीं. या नाटकाविषयीं वि. स. खांडेकर म्हणतात कीं "सामाजिक नाटकांतून करुणोदात्त कृतींची भव्यता दिग्दर्शित करणें एकंदरींत कठीणच असतें : त्यामळें सामाजिक नाटकें मुख्यत: आनंदप्रधान, हास्यप्रधान अगर करुणगंभीर होतात. मतिविकार हें सामाजिक करुणगंभीर नाटकाचें उदाहरण आहे." मतिविकाराचा शेवट चकोरचंद्रिकेच्या मीलनांत होतो. उलट गडकऱ्यांचे प्रेमसंन्यास नाटकाचा शेवट जयंत व लीला यांच्या दारुण विरहांत होतो

यामुळें असाहि एक विचार निर्माण होतो की मतिविकाराचा शेवट ' दुःखान्त ' असता तर हें नाटक अधिक प्रभावशाली ठरलें असतें काय ? प्रेमसंन्यासच्या तुलनेनें हें सुचणें स्वाभाविक आहे. या प्रश्नास उत्तर असें देतां येईल कीं कोल्हटकराच्या आरंभकाळीं मराठी रंगभूमीचा कल दुःखान्तिकेकडे नसून सुखान्तिकेकडे होता; दुसरें असें की या नाटकाचें उद्दिष्ट ' पुनर्विवाह घडवून आणणें व तो रंगभूमिवर दाखवून लोकमत अनुकूल करून घेणें ' हें होतें व त्यासाठी चकोरचंद्रिकेचें मीलन आवश्यकच ठरतें. या दृष्टीनें बघितल्यास हें संविधानक एका अंकातून दुसरा अंक निघत असतांना, सहज क्रमानें विकसत आहे असें आढळून येईल.

चकोरचंद्रिकेच्या मुख्य कथानकाच्या जोडीस आनंदराव–सरस्वती आणि विहार–तरंगिणी यांचीं दोन उपकथानकें गुंफलीं आहेत. पुनर्विवाहाच्या प्रश्नाबरोबर विषमविवाहाचें चित्र आनंदराव–सरस्वती यांच्या प्रवेशांतून रंगविण्यानें मुख्य कथावस्तूस तांत्रिक दृष्टया मदतच झालेली आहे. विधवाविवाहास प्रतिबंध असेल तर पुरुष लहान मुलींशींच लग्न करतील व त्यामुळे संसारांत विषमतेचें शल्य खुपूं लागेल हाच विचार येथें निर्माण होतो. परंतु या विषमविवाहाच्या उपकथानकास प्रमाणाबाहेर उठाव देण्याचा मात्र दोष कोल्हटकरांच्या नाटकांत आलेला आहे. विहारतरंगिणीचें उपकथानक मुख्य विषयास पोषक नसलें तरी त्यांतूनच कथानकाची गति पुढें पुढें सरकवत नेली आहे.

### ८ व्यक्तिदर्शन :

मतिविकार मधील संविधानक सरळ असलें तरी व्यक्तिदर्शन कमी प्रतीचें झाल्यामुळे एकंदर नाटकाचा सांगाडा भुसभुशीत पायावर उभा राहिलेला वाटतो. केळकर म्हणतात कीं, " कोल्हटकर यांचा हेतु व त्या हेतूच्या सिध्यर्थ त्यांनीं योजलेलीं साधनें यांचा मात्र पडावा तितका मेळ पडेल असें वाटत नाही. यांतील कथाभाग, रचना, मांडणी व युक्तिवाद यांनीं पुनर्विवाहाची इष्टता बिनतोड सिद्ध केलेली आहे असें म्हणणें म्हणजे अतिशयोक्तिच होईल. "

**खलपुरुष :**

खलपुरुष या दृष्टीनें आनंदराव किंवा विहार आपल्यासमोर फारसे उभे राहूं शकत नाहीत. आनंदराव केवळ स्वतःच्या मुलीच्याच पुनर्विवाहास प्रतिकूल वाटतात, इतरांच्या नाही असें त्यांच्या बोलण्यावरून वाटतें. फार तर तो ' बोलक्या सुधारकांचा ' एक प्रतिनिधि ठरेल. विहार हा पुनर्विवाहाचा विरोधी असला तरी खलपुरुष वाटण्याइतका तो दुष्ट व पाताळयंत्री रंगवलेला नाही. प्रामाणिक जुन्या जमान्याचा संस्कार झालेल्या संकुचित व रुढिप्रिय मनाचा तो प्रतीक आहे. त्यामुळे त्याच्याविषयीं कीव वाटते पण तिरस्कार वाटत नाही. ' विहार हा धर्माभिमानी, वक्ता, युक्तिवाद करण्यांत पटाईत, लोकांवर ग्रामण्यें करविणारा, सुधारकांचा हाडवैरी व प्रत्येक जुनी गोष्ट चांगली म्हणणारा आहे.' या दृष्टीनें पुनर्विवाहाला विरोध करणारा विहार अखेर पुनर्विवाहास अनुकूल होतो हें परिवर्तन लेचेंपेचें वाटतें. ' पुनर्विवाहास हा तयार होण्याची मदार बुद्धीच्या किंवा भावनेच्या विकासापेक्षा ' प्रतिज्ञाभंगावर ठेवल्यामुळे ' त्याची बैठक लंगडी वाटते असें केळकर म्हणतात. याशिवाय नाटकाच्या पूर्वार्धात रंगविलेला विहार नाटकाच्या उत्तरार्धात जो बहकलेला व फाजील उल्लू दाखविलेला आहे त्यामूळे पुनर्विवाहास अनुकूल मत करून घेण्याची उच्च पातळी सुटून जाते. या नादान मनुष्याच्या फसगमतीवर नाटकाची मदार उभी राहूं शकत नाही. हरिहरशास्त्री हा मात्र त्याच्या कुटिल कारस्थानांमुळें खलपुरुष वाटतो. परंतु हा इतका नीच व दुराचरणी रंगविलेला आहे कीं प्रत्यक्ष सनातनी लोकांनाहि त्याच्याबद्दल तिरस्कार वाटूं लागेल. जुन्या रूढींच्या बुरख्याखाली अनन्वित पापें करणारा आणि स्वत.ची विषयवासना ' येन केन प्रकारेण ' पूर्ण करण्याच्या मागे लागलेला हा दांभिक व कावेबाज पुराणिक आहे. कोल्हटकर हे सुधारणावादी होते आणि त्यामुळेंच अशा ' छद्मी सनातनी ' लोकांचें हें व्यंगचित्र त्यांनीं खलपुरुष म्हणून रगविलें असावें. हें पात्र अतिरंजित आहे असें फारतर म्हणतां येईल. परतु कोल्हटकरांच्या पूर्वीच्या नाटककारांनीं सुधारकांची अशीच विकृत व एकांगी व्यंगचित्रें काढलेलीं होती हें लक्षांत ठेवलें पाहिजे. याशिवाय

नाटकाचें प्रतिपाद्य पाहतां अशी काळी पार्श्वभूमि रंगविल्याखेरीज खऱ्या सुधारकांच्या चारित्र्याची शुद्ध शलाका खुलून दिसणें शक्य नव्हतें हें कबूल करावें लागेल.

**नायक :**

या नाटकाचा नायक कोण ? चकोर कीं मनोहर ? सकृत् दर्शनीं चकोर हाच नाटकाचा नायक आहे असें वाटतें, कारण त्याचें लग्न चंद्रिकेशीं व्हावयाचें असतें आणि तोच हरिहरशास्त्र्याचें कपट उघकीस आणतो. परंतु सबंध नाटकाच्या दृष्टीनें विचार केला तर स्वतः बैराग्याच्या वेषानें चंद्रिकेस भेटणें व नंतर ' तरंगिणीच्या वेषपरिवर्तनाचें रहस्य ' तयार करून विहारला फसगमतीनें पुर्नविवाहाला अनुकूल करून घेणें याशिवाय तो कांहीच करीत नाही. जपानहून शिकून आलेल्या या तरुणाची कर्तबगारी, प्रारंभीच्या व्याख्यानापलिकडे आणि अखेरीच्या विलापांपलिकडे, गेलेली दिसत नाही. वेषपरिवर्तनांत तो पोरकटपणानें स्वतःचेंच उलट हसें करून घेतो. याउलट विधुरावस्थेंत राहून जनसेवा करणाऱ्या मनोहरची पवित्र व्यक्तिरेखाच डोळ्यांत भरते. मनोहर शुद्ध चारित्र्याचा पुतळा, अनाथ स्त्रियांचा मार्गदर्शक व चकोरचा प्रेमळ भाऊ म्हणून रंगविलेला असला तरी संविधानकांतील घटना पुढें सरकावण्याच्या दृष्टीनें तो निष्क्रीय वाटतो. यामुळे या नाटकांत जोरदार नायकच आढळत नाही. याची जाणीव खुद्द कोल्हटकरांनाहि असावी असें त्यांच्या पुढील उद्गारावरून, वाटतें,

' माझ्या नाटकांतील नायकांपेक्षां नायिका अधिक सचेतन व चित्ताकर्षक वाटतात असें म्हणतात.-" आत्मवृत्त पृष्ठ ५८

**नायिका :**

मतिविकारांतील नायकाप्रमाणेंच नायिकेचीहि स्थिति आहे. चंद्रिका सहानुभूति वळवून घेत असली तरी तिचें स्वभावचित्र क्रियाशून्यच आहे. कदाचित हिंदु बालविधवा अशाच असतात हें नाटककारांस दाखवणें असल्यास न कळे ! तरंगिणी शेवटी ' रहस्य ' चालवीत असली तरी तिचा ' बोलविता धनि वेगळाचि ' आहे. त्या मानानें सरस्वतीची भूमिकाच

अधिक उठावदार झाली आहे. श्री. पु. रा. लेले सरस्वतीस ‘ नायिकांची नायिका ’ म्हणतात आणि तिच्या निष्पाप व्यभिचाराचें समर्थन करितात. शृंगारानें मुसमुसलेल्या तरुण स्त्रीच्या मनाचें, विषमविवाहांतील हें चित्र रमणीय ठरलें असलें तरी त्यामुळे एक दोष निर्माण झाला आहे. सरस्वती व आनंदराव, सरस्वती व मनोहर यांचे सरस व नाटयपूर्ण प्रवेश पाहून प्रेक्षकांना एकादे वेळीं असें वाटेल की नाटयविषय पुनर्विवाहापेक्षां विषम विवाह हाच आहे की काय ? आणि असाच रास्त आक्षेप कै. केळकरांपासून आजच्या टीकाकारांपर्यंत घ्यावासा वाटेल. व्यक्तिरेखांना सामाजिक प्रश्नात्मक नाटकांत ( Social problem play ) फारसें महत्त्व नसलें तरी चालेल हें खरें कारण मतिविकार ही कांही एकाद्या व्यक्तीची दारुण शोककथा किंवा सुखान्तिका नाही. त्यांतील प्रश्नासच महत्त्व आहे आणि तें महत्त्व ठसावें याचें पात्र हे साधन आहे. तथापि तें साधन ‘ विषयाचें महत्त्व, ठसण्याइतकें ’ तरी भरदार हवें हें विसरून चालणार नाही. या दृष्टीनें मतिविकारांतील प्रति-पाद्य व पात्रयोजना अनुरूप नाहीत.

**९ प्रतिपाद्य**

पुनर्विवाहास लोकमत अनुकूल करून घेणें हें या नाटककर्त्याचें प्रति-पाद्य येथें तपासण्यास घेतलें म्हणजे पुन्हां टीका उत्पन्न होते. पुनर्विवाहाची तरफदारी मनोहर, व चकोर, यांच्या तोंडून कितपत झाली आणि विधवांनी वैधव्यांतच राहणें इष्ट कां याची तरफदारी हरिहरशास्त्रीबुवाच्या तोंडून कितपत झाली याचें मोजमाप केलें तर एकादे वेळीं सामान्य जनतेंत पुनर्विवाहास विरोधीच मत तयार होण्याचा संभव आहे, हें एक मोठेंच न्यून वाटतें.

**१० ‘ मतिविकार ’ मधील दोषस्थळेंः——**

‘ मतिविकार ’ वर टीकालेखन करतांना कै. केळकर व इतर टीकाकारांनीं जे आक्षेप घेतलेले आहेत त्यांचा विचार केला पाहिजे.

विहारच्या प्रतिज्ञाभंगावर पुनर्विवाहासाठी होणारें मतपरिवर्तन हें करारी, नीतिमान, धार्मिक पण प्रेमळ अंतःकरणाचें दाखवलें असतें तर परिणामकारक झालें असतें. विहारच्या परिवर्तनांत ‘ हास्य ’ निर्माण होतें : त्या ऐवजीं ‘ उत्कट कारुण्य ’ हवें होतें. विहार विधुरावस्थेंत

' स्वत: ' विषयीं विचार करतो परंतु विधवा बहिणीविषयी नाही, यामुळें विहारचें परिवर्तन दुर्बल वाटतें. या विहारच्या लंगड्या स्वभावरेखनामुळे तरंगिणीच्या तेजस्वी भूमिकेलाहि अखेर स्वाभिमानशून्यतेचें लांछन प्राप्त झालें आहे.

चंद्रिका गरीब—दरिद्री—कुटुंबांतील गांजलेली स्त्री दाखवली असती तर पुनर्विवाह ही आवश्यक घटना ठरली असती. परंतु हा आक्षेप जोरदार नाही. दारिद्र्यविमोचन हा पुनर्विवाहाचा हेतु ठरत नाही.

करुणरसाचा अधिक आश्रय घेऊन नाटक परिणामकारक व्हावयास पाहिजे होतें. त्याचप्रमाणें ' शोकान्त ' नाटक असतें तर सहानुभूति वाढली असती असा आक्षेप कांही टीकाकार घेतात. एकंदर नाटकांत करुण रस बेताचाच आहे ही गोष्ट खरी. करुण रसोत्कट प्रसंग अधिक असते तर परिणामकारकता आली असती हें खरें. परंतु नाटक शोकान्तच हवें हें म्हणणें योग्य ठरणार नाही. पुनर्विवाह न होतां चकोरचंद्रिका दुःखानें नाश पावतात असें ' प्रेमसंन्यास'च्या धर्तीवर दाखवलें असतें तर पुनर्विवाह प्रत्यक्ष दाखवण्यास कोल्हटकर घाबरले असेंहि टीकाकार म्हणाले असते.

कलेच्या दृष्टीनें कांही प्रसंग व त्या प्रसंगांतील भाषा अस्वाभाविक व कृत्रिम वाटते. अगदीं प्रारंभीचाच प्रवेश पहा. त्यांत कल्पनेच्या भराऱ्यांकडे अधिक लक्ष गेल्यामुळे प्रसंगांत कृत्रिमता आली व सहजोत्कट रसाचा भंग झाला आहे.

हेतुप्रधान सामाजिक नाटकास कलेची अधिक जोड हवी होती. देवलांचें शारदा नाटक हेतुप्रधान असलें तरी कलात्मकतेनें सरस व उत्कट वाटतें. तसें येथें वाटत नाही.

मतिविकारांत वरील कांही दोष दाखविले गेले तरी त्या दोषांनाहि मराठी रंगभूमीच्या इतिहासांत महत्त्व प्राप्त झालें आहे. ह्या दोषांना टाळण्याचें निग्रहपूर्वक कार्य त्यांच्या शिष्यांनीं केलें आहे असेंच गडकरी, अत्रे इत्यादि नाटककारांच्या यशस्वी कृतींवरून म्हणावें लागेल.

२१ मतिविकार : गुणविशेष :

कोल्हटकरांचीं सर्वच नाटकें प्रयोगक्षमतेपेक्षां, वाङमयीन मूल्यावरच आज बघितलीं जातात. नाटक हें 'दृश्य' आहे तसेंच तें 'काव्य' हि आहे. त्यामुळेंच केळकर म्हणतात- " रंगभूमीवर आलें व फार दिवस टिकलें, तरच तें नाटक असें कोणी मानोत; पण, नाटक हें स्वतंत्र रीतीनें वाङमय आहे. म्हणून तें रंगभूमीवर असलें किंवा नसलें, तरी वाङमयदृष्ट्या त्याची किंमत अबाधितच राहते.—आणि कोल्हटकरांच्या नाटकांचा विचार करितांना भावी पिढीनें तरी त्यांचा विचार मुख्यतः नाट्यवाङमय या दृष्टीनेंच करणें उचित होईल." *

कोल्हटकरांच्या मतिविकार या नाटकाला आतां चाळीस वर्षे होऊन गेलीं आहेत. चाळीस वर्षांपूर्वी असलेला सामाजिक प्रश्नाचा जिव्हाळा आज आपणास वाटणें शक्य नाही. त्याचप्रमाणें नाट्यरचनेच्या तंत्रांतहि फार बदल पडलेला आहे. या बदललेल्या दृष्टीनें कोल्हटकरांच्या नाटकांचें परीक्षण करणें चुकीचें ठरेल. त्यासाठीं आजचीं मूल्यें न बघतां, कोल्हटकर काळांत असलेलीं मूल्येंच बघितलीं पाहिजेत आणि कोल्हटकराचें विशेष ठरविले पाहिजेत. कोल्हटकरांवर शेक्सपिअर व मोलिअर याच्या नाट्यतंत्राचा परिणाम झाल्यामुळे, करुणगंभीर व विनोदी प्रवेशांचें एक वस्त्र निर्माण करण्याचा कोल्हटकरांचा प्रयत्न मराठी रंगभूमीला नाविन्यामुळे आकर्षक वाटल्यास आश्चर्य नाहीं. एका अंकांतील विविध रसांचे प्रवेश, रहस्यासाठीं वेषपरिवर्तन, नायक व खलनायकांचीं स्वगतें, वास्तवतेवरील रम्यतेची झांक, पांच अंकी नाट्यरचनेची करामत, कल्पनाप्रचुर भाषा, काव्यात्मक पद्यरचना व स्वतंत्र कथानक हीं कोल्हटकरांचीं खास वैशिष्ट्यें होत : व त्यांचाच मागोवा त्यांच्या नंतरच्या नाटककारानीं घेतलेला आहे.

कोल्हटकरांची रम्य भाषाशैली हें एक प्रमुख वैशिष्ट्य आहे. मराठी रंगभूमीवर भाषाशैलींतील कल्पकता व कोटिबाजपणा यांचें दर्शन प्रथम कोल्हटकरांनींच घडवून आणलें. कोटीक्रम, श्लेष, अलंकार यांनी मंडित झालेल्या व सुभाषितांच्या सदरांत बसलेल्या भाषेंतील कांहीं उदाहरणें पहा:-

---

* ( कोल्हटकरांचा लेखसंग्रह : प्रस्तावना )

त्यांच्या पायांवर पाणीं घालायला गेलें पाहिजे. नाहीतर नोकरी-वरच पाणी पडायचें. पृ. २१

चित्राहुतींपेक्षा प्राणाहुति नेहमी मोठ्या असायच्या. जिचीं पंचद्रियें म्हणजे केवळ पंच पक्वान्नें अशी ती सुवर्णस्थाली प्रमाणें सुंदरी या पंचप्राणास गार करणार नाही तर मी खरोखर पंचत्वाप्रत जाईन. पृ. २३

त्याच नळ्यांच्या बोळक्यांतला पूर त्याच्या तोंडाच्या बोळक्यांत शिरून स्वारीनें राम म्हटला. पृ. २५

सुग्रास अन्न मिळाल्यावर शिळ्या भाकरीची काय पर्वा असणार पृ. २४ अधेल्याच्या चोरीला कोणता सूज्ञ फांशीची शिक्षा देईल बरें? पृ ३० तिकडे जपानी नरसिंह परकीय अस्वलांचीं नरडीं फोडीत आहेत, तर इकडे आमचे ग्रामसिंह आपसांत यादवी माजवून इ. पृ- ३२

प्रेमाच्या बाजारांत जमेकडील व खर्चाकडील रकमा सारख्या आहेत अशीं खातीं फारच थोडीं सांपडतील. पृ. ३९

तो केस म्हणजे स्वर्गद्वाराचा अडसरच म्हणावयाचा पृ. ४३ वैद्यलोक कडूगोळ्या शर्करावगुंठित करून विकतात आणि वाणी शर्करा कटुपदार्थांत्र गुंठित करून विकतात. पृ.४४ त्याच्या प्रांणांबद्दलचा संशय फेडून घेण्याला इथच थांबलों तर माझे प्राण संशयांत पडावयाचे! पृ. ७६

तिच्या केसांची आम्ही गय केली कीं येथील कुटाळ लोक आमच्या डोक्यावरचे केस राहूं देणार नाहीत पृ. ११३

भुसभुशित जमिनींत बीं तेव्हांच रुजतें असा नियम आहे पृ. ११८. तुला एका अनाथ मुलीची वेणी पाहिजे होती ना ? मग वेणीनें तुझा गळा कापिला यांत काय वाईट केले ? पृ. ११२. बावन कशी सोन्याला अग्नीची भीति कुठून असणार ? पृ. ११४ प्रेमांत आणि युद्धांत सर्व कांहीं क्षम्य असतें. पृ. १३५

कल्पनारम्य भाषाशैलीप्रमाणेंच, मराठी रंगभूमीवर अभिजात स्वरूपाचा विनोद प्रथम आणण्याचें श्रेय कोल्हटकरांनाच द्यावें लागेल. विदुषकी थाटाच्या विनोदाला रजा देऊन शब्दनिष्ठ, स्वभावनिष्ठ, व

प्रसंगनिष्ठ विनोदाची स्थापना कोल्हटकरांनीं सहेतुक केलेली आहे. या विनोदाच्या बाबतींत त्यांनीं मोलिअरचें अनुकरण अनेक प्रकारांनीं केलेलें आढळेल. मानवी दुर्गुणावर विनोद निर्माण करून समाजजीवन अप्रत्यक्ष शुद्ध करण्याचें कार्य कोल्हटकरांच्या विनोदानें केलेलें आहे. भेकडभटाचा भ्याडपणा हा प्रासंगिक विनोदाचा एक महत्त्वाचा भाग असला तरी आनंदराव व सरस्वती यांच्या संवादांतील नर्मविनोद व कोटीक्रम उच्च दर्जाचा ठरल्याशिवाय रहाणार नाही. त्याचप्रमाणें आश्रमांतील मुलींना विहार सीताहरणानंतरचा कथाभाग सांगत असतांना त्याच्या तोंडून सीतेबद्दल सहजगत्या येणारा ' कल्याणी ' हा शब्द व त्यामुळें उत्पन्न होणारा विनोद मार्मिक वाटतो. गंभीर घटनांच्या जोडीस विनोदी प्रवेश आणून प्रेक्षकांच्या मनोवृत्तीवरील ताण सैल करण्याचें तंत्र कोल्हटकरांनींच सहेतुक ' मराठी नाटचसृष्टी ' मध्यें आणलें आहे. कोल्हटकरांनंतर गडकरी व अत्रे यांनीं मराठी रंगभूमि हास्यरसानें दुमदुमून टाकली असली तरी त्यांना कोल्हटकरच गुरुस्थानीं होते हें विसरून चालणार नाही.

कोल्हटकरांच्या मतिविकारांतील नाटचगीतांकडे ओझरती नजर टाकली तर असें आढळून येईल कीं त्यांच्या पदांत काव्य आहे, रागदारीनुसार रचना आहे, कल्पनाविलास आहे, परंतु कांही ठिकाणीं प्रसादाची उणीव आहे. नाटकांतील पदें म्हणजे भावनेच्या पोटीं सहज-स्फूर्तीनें निर्माण झालेलें काव्य नव्हे हें खरें, त्यांच्या भोंवती नटांच्या रागदारीच्या आवडीनिवडीचीं बंधनें असतात. तथापि त्यांच्या पदांत दुर्बोधता आहे हें नाकबूल करून चालणार नाही. " नच दे दोष कुणी, " तनु ही स्वीकारुनी," " हृदय मम रमण हा नेत," " विकल करिती तव बोल " हीं पदें सुरस आहेत पण त्यांच्या निर्मितीचें श्रेय कोल्हटकरांना नसून गुर्जरांनाच द्यावें लागेल, *

* कोल्हटकरांचें आत्मवृत्त पृष्ठ ६०

तथापि ' आपण दोघे रथांत बसुनी जात जणूं मार्गें ' (पृष्ठ १५,) ' लग्न अम्ही लाविलें गडे ग ।' (पृ. २६) ' हें असें प्रणयधन इतर धनाहूनि मोठें ।' (पृ. ३५), ' भेटसि कां भिन्न अंगिं मजसि जानकि,' (पृ. ५७), ' दीन वेष दीनेकरितां घेतला वृथा हा.' (पृ. ५८), ह्या पदांत मात्र प्रसाद व माधुर्य यांच्या जोडीस भावनोत्कटता आलेली आहे. तथापि नाट्यगीतांबाबत कोल्हटकरांचा कल भावनोत्कट सोपेपणापेक्षा कल्पनाविलासाकडेच अधिक आहे. त्यामुळें आज जरी त्यांतील दुर्बोधत्व जाणवत असलें तरी ४० वर्षांपूर्वीच्या रंगभूमीवर ' नाविन्यपूर्ण कल्पकतेमुळे ' हीं पदें आवडलीं जात असत.' तसा निर्वाळा खुद्द कै. रा. ग. गडकरी यांनीं कोल्हटकरांच्या मतिविकारांतील ' विश्व अखिल चल सदाहि. ' ' नाट्य सृष्टि भासे,' ' चंद्र दूरस्थहि पसरि निजकरांसी '– इत्यादि पदांचें रसग्रहण करतांना दिला आहे.*

मतिविकारमध्यें १०८ पदें आहेत. आजच्या प्रेक्षकांस ही संख्या पाहून अचंबा वाटेल; तथापि हा कालमहात्म्याचा परिणाम आहे. किर्लोस्कर–त्रिलोकेकर यांनीं तत्कालिन मराठी रंगभूमीवर संगीताचा जबरदस्त पगडा बसवून ठेवलेला होता. आणि स्वतः कोल्हटकरांनाहि संगीताचा जबर व्यासंग होता. या दोन गोष्टी लक्षांत घेणें अगत्याचें आहे. कोल्हटकरच काय पण १९२५–३० पर्यंतचे मराठी नाटककारहि– अत्यंत प्रगमनशील असणारे वरेरकर धरून–यांस अपवाद नव्हते.

### १२ कोल्हटकरांचे युगप्रवर्तकत्व ?

कोल्हटकरांना मराठी नाटकसृष्टींतील ' युगप्रवर्तक ' ही संज्ञा देण्यांत कितपत औचित्य आहे अशी शंका आली तर गैर नाही. केवळ ' मतिविकार ' हेंच एक नाटक अलग काढून वाचलें किंवा आज बघितलें तर युगप्रवर्तकत्वाचा साक्षात्कार होणार नाही. आजच्या नव्या तंत्राच्या व मंत्राच्या दृष्टीनें न बघतां, जुन्या दृष्टीनें बघितलें तरी देवलांच्या शारदेबद्दल किंवा गडकऱ्यांच्या प्रेमसंन्यास वा 'एकच प्याला' याबद्दल जें वाटेल तें 'मतिविकार' बद्दल वाटणार नाही हें खरें; तथापि कोल्हटकरांची खरी योग्यता देवल

* रा. ग. गडकरी–' सुंदर उतारे '

व गडकरी यांच्या तुलनेनें करणें योग्य नाही. मराठी नाटयसृष्टि जेव्हां पौराणिक व शेक्सपिअर पद्धतीच्या नाटकांत दंग झाली होती तेव्हां तिला ‘ बुकिश नाटकांच्या ’ जन्मकाळीं संस्कृत नाटयतंत्राच्या चाकोरीबाहेर व विदुषकी विनोदाच्या संकुचितपणाबाहेर काढून पाश्चात्य तंत्रानें पण स्वतंत्र सामाजिक कथानकानें वळण लावण्याचें कार्य कोल्हटकरांनीं केलें आहे. आणि तें केवळ एकच नव्हे तर, ‘वीरतनय मूकनायक, गुप्तमंजूष, मतिविकार, सहचारिणी, जन्मरहस्य, प्रेमशोधन, वधूपरिक्षा—’अशा अनेक स्वतंत्र सामाजिक नाटकांनीं ! कोल्हटकरानंतर खाडिलकरांनीं नाटयनिपुणतेनें व ओजस्वी भावनोत्कट गद्यशैलीनें नाटयसृष्टि दिपवून टाकली किंवा गडकरी यांनीं गुरूवर मात करून कल्पनाविलास, विनोद व भावनोत्कटता यांनीं नाटयसृष्टि भारावून टाकली तरी त्या सर्वांना वळण लावण्याचें श्रेय कोल्हटकरांनाच द्यावें लागेल. त्यांच्याविषयीं प्रा. बनहट्टी म्हणतात कीं—“ कोल्हटकरांनीं काल्पनिक नाटयाच्या प्रकारास उच्च वाङमयगुणांची व आपल्या सौंदर्य-दृष्टीची जोड देऊन त्यास सन्माननीयतेच्या पदावर नेऊन पोंचविलें. कल्पनेचा रम्य विलास, कोटिबाजपणा, कलात्मक औचित्य या गुणविशेषां-मुळेच त्यांचीं नाटकें महाराष्ट्र—वाङ्मयांत चिरंजीव होतील. ”*

वाङमयीनदृष्टया सुरस असणाऱ्या कोल्हटकरांच्या नाटकांचा गौरव करितांना खांडेकर म्हणतात, “कल्पकता, कला व विनोद या तीन प्रभावी वाङमयगुणांमुळे जों जों वाचकवर्ग सुसंस्कृत होत जाईल तों तों त्यांचीं नाटकें अधिक आवडीनें वाचलीं जातील.” × खांडेकरांचा हा अपेक्षित सुसंस्कृत समाज तयार होण्यास लागणारा अवधि नजरेसमोर आला की, ‘ कोल्हटकर शंभर वर्षें आधीं जन्माला आले ’ हे गडकऱ्यांचे उद्गार सार्थ वाटतात.

श्री माडखोलकर, श्री. खांडेकर यांनीं दिलेलीं मतें घेऊनहि कोल्हट-करांना ‘ युगप्रवर्तक नाटककार ’हें श्रेय देण्यास मन तयार होत नाही. युगप्र-

*( प्रदक्षिणा : पृष्ठ १७६ )

× खांडेकर : मराठीचा नाटयसंसार

वर्तकत्वाची कल्पना संकुचित करून कोल्हटकरांना ' युगप्रवर्तक ' ठरवणें खुद्द त्यांनाच पक्षपाताचें वाटेल.

हरिभाऊ आपटे व देवल या ललितलेखकांचें नांव व त्यांच्या शंकरमामंजी, यमुना किंवा श्रीमंत, शारदा, कांचनभट या व्यक्तिरेखा जशा ठसठशीतपणें आजहि मनासमोर उभ्या राहतात तशा व्यक्तिरेखा कोल्हटकरांनीं निर्माण केल्या काय ? सौभद्र.] शारदा, एकच प्याला, स्वयंवर यांतील पदें आजहि कानांवर येतात त्याप्रमाणें कोल्हटकरांचीं किती पदें श्रवणावर राहिलीं आहेत ? देवलांची साधी सोपी नाट्यपूर्ण भाषा किंवा गडकऱ्यांची कल्पनेच्या भराऱ्या मारणारी प्रमत्त भाषा यापैकीं कोणता एक संस्कार कोल्हटकरांच्या भाषेचा कायम टिकून राहील काय ? या प्रश्नांचीं उत्तरें देणें कठीण आहे. आणि म्हणूनच कोल्हटकरांचे इतर सर्व गुण— ( सामाजिक प्रश्न, स्वतंत्र संविधानक रहस्यमयता, कोटीबाजपणा, अभिजात विनोद, अलंकारिक भाषा, कल्पनाप्रधान संगीतरचना— ) एकसमुच्चयानें प्रथमच रंगभूमीवर, त्यांच्या नाट्यांतून आले असले तरी, उत्कटतेच्या अभावीं, हीं नाटकें आज मागें पडलीं आहेत; त्यांतील ' नाविन्य ' मात्र त्या काळांत नाट्य-सृष्टीला भूषणावह वाटलें व तरूण नाटककारांना मार्गदर्शक झालें !

———

संगीत

# मतिविकार नाटक

( ईशस्तुति )

( दावरदादार०— या चालीवर )

नमित ईश पदसरोज यदीय झणि निरसित पापपंक कुविघ्न-
तमासि हरि कृपेक्षणाप्रकाश ॥ ध्रु० ॥ कुंभयोनिपाति बघुनि
जलनिधि । करुण होइ चित्तें । स्वीकारि जाह्नवीतें । हरि-
पदस्रुत तरि शिरिं तिज धरि करि तदसुखविनाश ॥ १ ॥

( श्रीरामचंद्र कृपाल०— या चालीवर )

तो नीलकंठ दयालु शुभकर हो तुम्हां भवसागरीं । भजकांसि
मंगल वितरुनी अशिवा स्वयें जो स्वीकरी ॥ ध्रु० ॥ गज-
दानवा निवटोनि तद्वधदोष घेई निज शिरीं । शुभधाम गजमुख
अवनकर भुवना तदा निर्मी करीं ॥ १ ॥ मलिना विभूतिसि
चर्चितो निज तनुसि सकलहि तो जरि । परि भूति दे प्रणतां-
प्रती बहु तुष्ट होउनि अंतरीं ॥ २ ॥ सुजनांसि जी अति कंपदा
भय ही अभिधा धरी । भवमुक्त परी करुनी तयांतें भय
महा करितो दुरी ॥ ३ ॥

## अंक पहिला : : प्रवेश पहिला

( मनोहर व चकोर. )

**मनोहर**— बाळा चकोरा, तुला भेटण्याला मी किती उत्कंठित झालों
होतों म्हणून सांगूं ! गलबत जसजसें किनाऱ्याजवळ येऊं लागलें तसतसा
माझा आत्मा डोळ्यात एकवटून माझ्या लाडक्याचें दर्शन घेण्याकरिता उत्सुक

होऊन बसला ! अनेक उतारू लोक आपापल्या इष्टमित्रांची भेट घेण्याकरिता गलबतावर उभे होते; ते दुरून पोळ्यावरील मधमाशांप्रमाणे दिसत होते, परंतु त्या सर्वांतून तुझी मूर्ति माझ्या प्रेमानें नेमकी दाखविली. तेव्हांपासून मी तुजकडे सारखा पाहात होतों. माझ्या नयनरज्जूंनींच जणु काय गलबताबरोबर तुला हळूहळू आकर्षून किनाऱ्याशीं आणिलें ! माझे बाहू तुला आलिंगन देण्याला इतके उतावीळ झाले होते की मध्यंतरींचा वेळ त्यांना युगाप्रमाणे वाटला ! व त्या अवकाशात तुला प्रथम स्पर्श केल्याबद्दल ते डोळ्यांची जणु काय स्पर्धा करीत होते ! एकदा कडकडून आलिंगन दिल्यावर अतिसांनिध्य व आनंदाश्रु यांमुळे डोळयांना दिसेनासें झालेलें पाहून, बाहूंना डोळ्यांवर विजय मिळून धन्यता वाटली ! या क्षणीं तर तुझा देह नखशिखान्त पाहून डोळयांचें पारणें फेडूं की, गाढालिंगन देऊन या शरीराला सुखवूं, असें मला झालें आहे ! दोन्ही सुखांचा लाभ एकदम करून घेतां येत नाही हा केवळ नरदेहाचा कमीपणा आहे !

( तुने क्या किया मुजे०– या चालीवर )

**मम हर्षभरें हें हृदय भरे न दिसे दुसरें तुजवीण खरें । नयनाश्रु-जलें मुख हें भिजलें पुलकें खचिलें सगळें प्रचुरें ॥ ध्रु० ॥ सुख-दुःख समान जगीं असती निकटीं वसती नच भिन्नगति । हे श्वासहि दीर्घ जवें निघती हृदयांतुनि हा प्रेमौघ झरे ॥ १ ॥**

**चकोर**— दादा, किनाऱ्यावर जमलेल्या मंडळींतून तुम्हाला अचूक शोधून काढल्यानंतर तुम्हाला भेटण्यापूर्वींची व नंतरची माझी जी स्थिति झाली, तिचें तुम्हीं इतकें हुबेहूब वर्णन केलें की मला त्यापेक्षा अधिक कांहीच सांगावयाचें नाही. आजपर्यंत तुमचें दर्शन काय तें पत्रद्वारा होत असे. तुमचें पत्र आलें की मी त्यास हृदयाशीं धरून प्रेमालिंगन देत असें. त्यानें मला तुमच्या भेटीपासून होणाऱ्या आनंदाचा अल्प अंश अनुभविण्यास सांपडे ! तुमच्या पत्रांनीं परस्परसहवासांत घालविलेला आनंदाचा काल व पुढे पुनर्दर्शन झाल्यावर होणारा आनंद हीं एकदम डोळयांसमोर उभीं राहून मन कावरेंबावरें होई ! आज तो पुनर्दर्शनाचा आनंद केवळ मनोराज्यांत न राहतां प्रत्यक्ष अनुभवाला आला, हें माझें केवढें भाग्य ! दादा,

( यमिमायमि जैसि०— या चालीवर )

**जगीं परिमित आप्तवृंद ज्या । वदति दीन त्या ॥ ध्रु० ॥ केंद्रीकृत परी प्रेम । लाधे त्यातें निरुपम ॥ १ ॥ प्रेमोद्भव सुखहि त्यास । इतरांहुनि अधिक खास ॥ २ ॥**

**मनोहर**—चकोरा, दहा वर्षांपूर्वी बाबा आपणांस सोडून परलोकीं गेले तो प्रसंग आज माझ्या डोळ्यांसमोर उभा राहिला आहे. तूं तेव्हा बराच लहान होतास. त्यांनीं डोळ्यांत पाणी आणून तुला माझ्या हातीं दिलें आणि

( नहि मानी श्याम तेरो०— या चालीवर )

**गहिवरें वदति वाणी । तव वदनाचें चुंबन घेउनि ॥ ध्रु० ॥ थोर वय निरखण्याचें याचें दैविं नसे या नयनीं ॥ १ ॥ जनक होई शिशुपणिं या सुहृद तसा वर्ते तरुणपणीं ॥ २ ॥**

तो सर्व प्रकार पाहून म्लान झालेलें तुझें मुखकमल आठवलें म्हणजे मला भडभडून येतें ! आज तुला विद्यासंपन्न झालेला पहाण्याला बाबा असते तर त्यांना किती आनंद झाला असता !

**चकोर**—तुम्हीं बाबांना जें अभिवचन दिलें तें त्यांच्याहि अपेक्षेपलीकडे पाळल्यामुळेच मी हे दिवस पहात आहें ! दादा, मी तुमचा उतराई कसा होऊं ?

( मेरे गिरिधर गोपाल०— या चालीवर )

**प्रेमें मम शिशुपणांत संगोपन केलें । जननी जशि पोषि बाळ निज उदरीं ठेलें ॥ ध्रु० ॥ तिमिरांतुनि जशि माता त्यासि योग्यकालीं । मोहतमामधुनि तेविं मजसि सोडवीलें ॥१॥**

**मनोहर**—मीं जें कांहीं अल्पस्वल्प तुजकरितां केलें तें माझें कर्तव्यच होतें. परंतु कर्तव्याला प्रेमाचें बळ असल्यामुळे तें माझ्या मनाप्रमाणे पार पडत गेलें. बरें, आता येथेच किती वेळ उभें राहावयाचें ? मीं मुद्दाम माझ्या एका मित्राची जागा जवळच तयार करून ठेविली आहे, तिकडे जाऊं. ( दोघे चालल्यासारखें करितात. स्वतःशीं ) आता चकोराला ती दुःखवार्ता कशी सांगावी बरें ? दुसऱ्याकडून ती त्याला कळूं नये म्हणून मीं याच्या येण्याची बातमी कोणाला न कळविता एकटाच आलों. बंदराजवळ मुद्दाम निराळी जागाहि याकरिता

पाहून ठेविली; पण ती बातमी फोडण्याची वेळ जवळ येऊं लागली तसें मला कांहीच सुचेनासें झालें आहे.

**चकोर**—( एकीकडे ) मघापासून दादा कष्टी कां दिसत आहेत ? त्यांनीं सांगितल्याप्रमाणे सुखदुःखांचीं लक्षणें कितीहि सारखीं असलीं तरी दोहोंतील मर्यादा याप्रमाणे पूर्ण नाहीशी होऊन जाऊं नये. त्यांना कोणतेंहि दुःख असो, तें हलकें करण्याचें माझें कर्तव्य आहे. (उघड) या आपल्या परतंत्र भूमातेचा स्पर्श जपानच्या स्वतंत्र भूमीपेक्षा मला किती तरी सुखकर वाटत आहे !

**मनोहर**—योग्यच आहे.

( साकी )

**धनपतिवनिता दीन स्त्रीचा घे जरि बाल कडेला । परता-**
**यातें उत्सुक परि तो लक्षी मातृसुखाला ॥ जरिच्या शालु-**
**हुनी । वस्त्र जुनें प्रिय तन्नयनीं ॥ १ ॥**

**चकोर**-दादा, आपला गतभर्तृकाश्रम येथून कांहीं फार लांब नाहीं. असें असतां या स्थलीं येण्याचें काय प्रयोजन ? आश्रम ठीक चालला आहे ना ?

**मनोहर**—या भयंकर तापाच्या सांथीमुळे आपल्या महाराष्ट्रांत असंख्य गतभर्तृका निर्माण होत आहेत ! असें असतां हा आश्रम शून्य कसा रहाणार ? हल्लीं त्यांतील स्त्रियांची संख्या शंभरावर गेली आहे.

**चकोर**—आपली मित्रमंडळी सर्व खुशाल आहेत ना ?

**मनोहर**— ( एकीकडे ) आता चंद्रिकेच्या लग्नाचें व वैधव्याचें वर्तमान याला कसें सांगावें ? ( उघड ) चकोरा, या विपन्न व दुर्दैवी देशांत खुशाल, सुखी, या शब्दांना कांहीं तरी अर्थ आहे का ? लोक दिवसें दिवस दरिद्री व परतंत्र होत चालले आहेत. आणि दारिद्य्र व पारतंत्र्य यांबरोबर वास करणारे दुर्गुणहि आमच्यामध्यें फैलावत चालले आहेत ! आम्ही शरीरानें कृश व मनानें अनुदार होत चाललों आहोंत ! आम्ही श्रेष्ठांशीं लुब्रेपणानें व कनिष्ठांशीं उद्दाम-पणानें वागतों ! आम्ही घराबाहेर राजकीय हक्कांबद्दल निकरानें भांडतों, आणि घरांत आमच्याच बहिणींशीं अन्यायाचें वर्तन करितों ! आम्ही सुधारक असलों की परकीयांच्या निंद्य चालीहि कवटाळतों, आणि जुन्याचे अभिमानी असलों की बालविवाहादि अनिष्ट चालींचाहि अंगीकार करितों. भ्याडपणासच सारासार

विचार आणि हेकेखोरपणास आम्ही उच्च मनोवृत्ति म्हणतों ! अशा स्थितींत खरी खुशाली किंवा खरें सुख कोठून असणार ?

**चकोर**—आपले सर्व स्नेही शरीरानें तर खुशाल आहेत ना ?

**मनोहर**–नुस्ते खुशालच काय, वाढत्या प्रमाणावर आहेत. सहा महिन्यांपूर्वी आपल्या आनंदरावांचे दोन हातांचे चार हात झाले, हें तुला माहित नसेल ?

**चकोर**—म्हणजे ! त्यांनीं पुनर्विवाह केला वाटतें ?

**मनोहर**—छे छे ! एका पंधरा वर्षांच्या कुमारिकेशीं लग्न केलें ! आणि तेंहि स्वतःचें वय पन्नास वर्षांचें असतां ! मुलगा बरोबरीचा असून, व एक पंधरा वर्षांची मुलगी...( चांचरतो. )

**चकोर**—म्हणजे ? त्यांचीं सर्व मनुष्यें क्षेम आहेत ना ?

**मनोहर**—चकोरा, चंद्रिकेवर जो प्रसंग गुदरला आहे, तो तुला कोणत्या तोंडानें सांगूं ? परंतु अशा प्रसंगीं स्वदेशाच्या विपन्नावस्थेच्या विचारांत आपलें खाजगी दुःख बाजूला ठेविलें पाहिजे.

**चकोर**–दादा, खरा प्रकार काय असेल तो सांगून टाका. मला संशयामुळे प्रत्येक क्षणास यमयातना होत आहेत. त्यापुढे अत्यंत दुःखकारक बातमीहि पुरवली ! ती ऐकण्याला मी मनाचा घडा करून चुकलों आहें. काय म्हणतां ? चंद्रिका भयंकर रोगानें अत्यवस्थ आहे का ?

**मनोहर**—ती शरीरानें सुखरूप आहे.

**चकोर**—तर मग तिच्या मनास धक्का बसण्यासारखें दुःख तरी तिजवर कोणतें आलें आहे ?

**मनोहर**—दुसरें कोणतें असणार ? वैधव्य !

**चकोर**—वैधव्य ? आणि तें लग्न होण्याच्या पूर्वींच ?

**मनोहर**—तो सगळाच प्रकार चमत्कारिक आहे. ज्या मुलीशीं आनंदरावांनीं लग्न केलें तिच्याच एका म्हाताऱ्या नातेवाइकाशीं चंद्रिकेचा विवाह झाला. लोकांत तर अशी वदंता आहे की आनंदरावांनीं आपली मुलगी म्हाताऱ्यानें आपणांस जी नववधू अर्पण केली तिचें मोल म्हणून दिली. त्या म्हाताऱ्या नवरदेवास मात्र चांगलीच शिक्षा झाली. वरातींत उडविलेल्या नळे चंद्रज्योतींच्या धुरानें दम कोंडून त्या दमेकऱ्याची प्राणज्योति तेथल्या तेथेच

मालवून गेली. चकोरा, हें काय असें ? हें वृत्त ऐकून तुझी अशी स्थिति कां झाली ?

( मैवारी मैवारी०—या चालीवर. )

**सुधीरा गभीरा तुझी वदनकांति । कशी लोपली निमिषमात्रें वदे ती ॥ ध्रु० ॥ मुख श्वासरोमांचबाष्पें गमे हें । हिमें आर्द्र कंपित गुलाब प्रभातीं ॥ १ ॥**

**चकोर**—दादा,

( ओदनदीं तनन०—या चालीवर )

**त्याजुनि भीड वदतों पदसंनिधि । उघडुं हृदय मम हें तुम्हां विण इतर कवण जनिं । त्यजुनि सरिदुदक हृद्गत निर्झर करितें खुलें कधिं ॥ ध्रु० ॥ हा प्रमाद घ्या पदरिं तुम्हि । अजाण बालक चुके कधी भ्रमिं । घ्या करुणेमधिं ॥ १ ॥**

**मनोहर**— बोल, बाळा, काय बोलायचें असेल तें.

**चकोर**— बाबांचा आणि आनंदरावांचा किती स्नेह होता हें तुम्हांस माहितच आहे. चंद्रिकेच्या जन्मकाळीं तुम्हांला सून झाली आहे असें आनंदराव बाबांना म्हणाले हें मला ऐकून, पण तुम्हांला प्रत्यक्षच माहित आहे. आम्ही वयानें वाढत चाललों, तसतसा आमचा परस्परांचा स्नेहभावहि वृद्धिंगत होत चालला. पुढे मी परदेशीं जातेवेळीं मी तेथून परत येईपर्यंत चंद्रिका अविवाहित राहील असें आनंदरावांनीं मला बोलून दाखविलें. भावि स्वर्गसुखाच्या आशेनें मी विलायतेकडे श्रम करून शेवटची परीक्षा उत्तीर्ण झालों व स्वदेशीं येऊन पोहोंचतों तों माझ्या लहानपणच्या मैत्रिणीबद्दल ही दुःखवार्ता कानीं येते ! ज्या माझ्या भावि चरित्रनाटकाचें मंगलाचरण इतकें अमंगळ झालें आहे त्याचें भरतवाक्य काय होणार हें दिसतेंच आहे ! अरेरे ! बिचारी चंद्रिका !

( संसारीं आजि सुख वाटेना०— या चालीवर )

**मायेचें नच कुणि जगिं उरलें । काय करावें बालेनें ॥ ध्रु० ॥ सोडुनि गेली जननी शिशुपणिं । उरला तात; परी तो स्वमनीं । निर्दयता अत्यंत धरोनी । कापि गळा खर करवालें ॥ १ ॥**

म्हाताऱ्याशीं लग्न व वैधव्य या दोन्ही संकटांनीं तिच्या शिरावर एकदम आघात केला, तेव्हां त्या बिचाऱ्या मुक्या प्राण्यानें काय करावें ? दादा तिच्या शिरावर पडलेल्या या डोईजड संकटाचा भार लवमात्र कमी करण्याचा प्रयत्न तिच्या मायाळू-मायाळू कसले ? मायावी-नातलगांकडून झाला असेलच ?

**मनोहर**— दुःखांत सुख एवढेंच की अजून त्यांजकडून केशवपनाचा प्रयत्न झाला नाहीं !

**चकोर**— झाला नसेल तर लवकरच होईल ! ज्या नीचानें अशा सुंदर देहाची वैधव्याग्नींत आहुति देण्यास मागेपुढे पाहिलें नाहीं, तो तिच्या केसांची पर्वा करील काय ? दादा, तिच्या निष्ठुर वडिलानीं तिच्या सुखाची माती केली हें ठीकच झालें. पण तुम्हीं येथे असून कसाबाच्या पोटीं आलेल्या या गाईचा गळा कसा हो नाहीं सोडविलात ? तुमच्या भूतदयेबद्दल सर्व जग तुमची वाखाणणी करीत आहे. ती भूतदया तुमच्या आवडत्या चकोराच्या वाग्दत्त वधूविषयीं मात्र उदासीन राहावी ना ?

**मनोहर**—चकोरा, मी आश्रमासाठीं पैसा गोळा करण्याकरितां फिरत होतों तो तुला भेटण्याकरितां कालच परत आलों. माझ्या पश्चात् ज्या गोष्टी झाल्या त्यांचा मी प्रतिकार कसा करावयाचा बरें ?

**चकोर**—बरें, दादा, ही बातमी तुम्हांला पूर्वी कळली असून मला कां बरें तुम्हीं कळविली नाहीं ?

**मनोहर**—चकोरा, याचें ज्ञान तुला आधीं झालें असतें तर तुझ्या ज्ञानाची सांगता तुला करितां आली असती का ?

**चकोर**—खरेंच ! तुमच्या प्रत्येक कृत्याच्या मुळाशीं मजवरचें प्रेम दिसून येतें. मी तुमच्या प्रेमाकडे कोणत्याहि बाजूनें पाहिलें तरी तें पूर्ण स्वरूपांतच आढळून येतें ! मीं मात्र आपस्वार्थीपणानें तुम्हांला असे प्रश्न केले याची क्षमा करा.

**मनोहर**—बरें आता पुढचा विचार ?

**चकोर**— चंद्रिकेचा भाऊ आणि आपला मेव्हणा विहार हा तर पक्का जुन्याचा अभिमानी आहे. शिवाय तो बापापासून वेगळा झाला आहे असें तुम्हींच मला कळविलें होतें. तेव्हां त्याजकडून चंद्रिकेच्या विपन्न स्थितींत काय मदत होणार आहे हें दिसतेंच आहे. तिचे वडील नांवानें जरी कट्टे

सुधारक आहेत तरी त्यांच्या आणि तिच्या विवाहावरून त्यांची कृति शब्दांप्रमाणे कितपत असते हें सिद्ध झालेंच आहे. आता चंद्रिकेला तुमच्यावांचून व मजवांचून कोणी स्नेही उरला नाही. तुमची परवानगी असेल तर मी तिला आजचे आज जाऊन भेटतों. पण माझ्या भेटीनें तिचें दुःख हलकें होईल कीं दुणावेल याचीहि शंकाच वाटते.

**मनोहर**— चकोरा, आनंदरावांच्या संमतीवाचून तिची भेट घेणें शक्य नाही व इष्टहि नाही. तेव्हा मीच आज आनंदरावांस भेटतों. त्यांच्या मनाचा कल पाहून नंतर चंद्रिकेच्या भेटीबद्दल काय तें ठरवितां येईल. आता प्रथम आपल्या आश्रमांत चल, तेथे भोजन करून विश्रांति घेतलीस म्हणजे तुला जरा हुशारी वाटेल. तुझें सामान तिकडेच परस्पर गेलें आहे.

**चकोर**—आता कसचें भोजन ! आपण सांगितलेली वार्ता ऐकल्यापासून माझे पंचप्राण कंठाशीं आले आहेत. ते अन्नोदक कंठाखालीं कसें उतरूं देणार ? तरीपण तुमची आज्ञाच असेल तर न्याल तिकडे येतों आणि सांगाल तसें करितों.

( जातात )

---

## प्रवेश २ रा.

### ( आनंदराव व सरस्वती. )

**आनंदराव**— काय ही दागिन्यांची गर्दी ! या सर्पाकार वेणीवर गुलाब, केतक इत्यादि फुलांनीं छाया केली आहे. बगीच्यांत फुलांवर सर्प बसलेले असतात. पण येथे सर्पांवर फुलें येऊन बसलीं आहेत ! तसाच हा बिंदीबिजवरा ! खरें म्हटलें तर बिजवराच्या डोक्यावर त्याची स्त्री असावी. पण येथे पहावें तों स्त्रियेच्या भालीं बिजवराचा वास ! नथ, बाळ्या, बुगड्या या मेघांनीं तर तुझ्या मुखचंद्राची प्रभा बरीच हरण केली आहे. तादळीपोत, जोंधळीपोत यानीं साहजिकच कंठाच्या ठिकाणीं आपलें ठाणें बसविलें आहे. त्यांच्या जोडीला या ठुशा, पेट्या व सरी चमकत आहेतच. कोपरांशींहि वांकी व बाजूबंद झळकत आहेत. इतकें दागिन्याचें ओझें बायकाच सोसू जाणत ! त्या आपल्या पतींना वांकवितात, आणि दागिने त्यांना वांकवितात.

( पेहरी चोळी ० – या चालीवर )

**असती वैरी। खचित पतीचे जन्मांतरिंचे। नग हे भारी। पन्नगसम कीं असति विषारी। आलिंगनसमयीं दंशा। घेऊनि करिती त्यांचि दशा। नाशाया अविकारि ॥ ध्रु० ॥ पति भूषण हें पत्नीचें। कंठालिंगनपात्र तिचें। साचें। परि शठ हे कठिन मनाचे। स्पर्शसुखा हरुनि विखापरि असुखा रचिति अरि ॥ १ ॥**

**सरस्वती**—बायकांनाच एकट्यांना हसायला नको कांही !

( धीमा धीमा चालो०– या चालीवर )

**नरां नारींसम हौस फार अंतरीं। प्रकट होई ती देहावरि परोपरी। नटति सजति नटांपरी। ते घरोघरीं ॥ ध्रु० ॥ बोटीं घालुनि मुद्रिका हातिं कडें जडसें। कर्णी बाळी ठेविती गोफ गळां विलसे ॥ ( चाल ) नयनसे उपनेत्र सतेज जे। हृदयची घटीयंत्र जणूं दुजें शिर तरी तया शृंखलाहि सजे। ती खरोखरी ॥ १ ॥**

आपणहि पूर्ववयांत दागिन्यांचे मोठे भोक्ते होतां असें मी ऐकतें. कानांत भिगबाळी, हातांत सलकडीं व बोटात अंगठ्या असल्यावांचून आपलें बाहेर पडणें होत नसे म्हणतात.

**आनंदराव**—पण हे दागिने बायकांनींहि पटकाविले आहेतच ! त्यांच्या कानात बाळी असते; आणि हातांत पाटल्यातोडे असून बोटांतही आंगठ्या असतात. शिवाय पाटल्यातोड्यांच्या पंक्तीला बांगड्यांची व बिलवरांची एक पलटण असते ती निराळीच ! बिलवरांचीं नांवें तरी किती विलक्षण ! एक म्हणे चटकचांदणी, तर दुसरी राणीचा बाहुटा ! तिसरी राजवर्खी, तर चौथी आतषबाजी ! याप्रमाणे स्त्रियांनीं सर्व चराचर जग हस्तगत करून घेतलें आहे.

**सरस्वती**—पुरुषांच्या दागिन्यापैकी चष्मा, घड्याळ आणि त्याचा शेडा हींसुद्धा बायका वापरीत असतीलच ?

**आनंदराव**— नाही त्यापरीत खऱ्या. पण हे दागिने कसचे ! (घड्याळ दिवसांतील आणि चाळिशी आयुष्यांतील गतकाल दाखविते.) बायकांच्या दागिन्यांचा व्यंगें लपविण्यांत जसा उपयोग होतो, तसा पुरुषाच्या या दागिन्यांचा होत नसून उलट व्यंगें उघडीं पाडण्यांत मात्र होतो !

**सरस्वती**— असें सगळ्या पुरुषांना खरोखरीच वाटत असतें तर पुष्कळांना रस्त्यानें चष्मा वर करून किंवा सांखळीकडे पहात पहात चालण्यात धन्यता वाटते ती वाटती का ? मग त्या सांखळीला एखादें चुनाळ असलें तरी चालतें !

**आनंदराव**— सदभिरुचीचा प्रश्न बाजूला ठेविला आणि अर्थशास्त्राच्या दृष्टीनें विचार केला तरीसुद्धा दागिन्यांचा सोस चांगला नव्हे. या दागिन्यांत पुरुषांचें चित्त जसें गुंतून जातें तसें देशांतील भांडवलही गुंतून राहातें. सोन्यानें मढविलेल्या प्रत्येक स्त्रीची किंमत एका लोखंडी कारखान्याच्या बरोबर असते !

**सरस्वती**— तें मला नाही कांही समजत !

**आनंदराव**-तसेच हे बिलवर सारे बेटे परदेशी ! याप्रमाणे आपल्या देशांतील पैसा परदेशांत जाऊं लागला तर देश हां हां म्हणतां निर्धन होऊन जाईल.

**सरस्वती**— बिलवर परदेशी, आणि दारू ?

**आनंदराव**-(एकीकडे) हिनें तर माझे दांत माझ्याच घशांत घातले ! पण हिला माहित नाही की कधी कधी दारू निवळ औषधाकरिता घ्यावी लागते.

**सरस्वती**— त्यांतून बिलवर परदेशांतूनच आणिले पाहिजेत असा कांही शास्त्रार्थ नाही. आपल्या देशांत केले म्हणजे झालें. आपली वस्तु आपल्या घरांत ठेवण्याची हिकमत आणि सामर्थ्य नसलें म्हणजे हें असेंच व्हावयाचें !

**आनंदराव**— बरें, तें राहूं दे. माझें म्हणणें इतकेंच की बायकांनीं दागिने घालूं नयेत असें नाही. मात्र सणावाराला घालावे, इतर प्रसंगीं अगदी साधेपणानें राहावें.

**सरस्वती**— आपणांला साधेपणा आवडत असेल तर आवडो बिचारा ! मला तो साफ आवडत नाही. तरुणपणीं जर हे दागिने घालावयाचे नाहीत तर घालावयाचे केव्हा ? म्हातारपणीं शरीर आपोआपच वांकल्यावर त्याला आणखी वांकविण्याकरिता घालावयाचे कीं काय ? डोक्याला टक्कल पडल्यावर त्यावर केतक-राखडी चिकटवायची वाटतें ?

**आनंदराव**— बरें बोवा, मी आपलें बोलणें परत घेतों मग तर झालेंना ?

**सरस्वती**— आता नुसतें बोलणें परत घेण्यावर थोडेंच सुटावयाचें आहे !

**आनंदराव**— म्हणजे ? आणखी कांही तगादा लावायाचा आहे वाटतें ?

**सरस्वती**—कांही फार नाही. आणि मी तरी आपणाला उगीच त्रास कशाला देऊं ? मऊ पाहिलें की कोपरानें खणीत जाणें मला अगदी आवडत नाही.

**आनंदराव**— तूं आहेसच तशी शहाणी ! सोडलास ना मग आपला हट्ट ?

**सरस्वती**—तसें नव्हे. हा माझा गळा अलीकडे चंद्रहारावांचून कसा अगदी ओका ओका दिसतो. म्हणून म्हटलें—

**आनंदराव**— (एकीकडे) इच्या चंद्रहारानें माझ्या अंगाची कशी तलखी होऊं लागली आहे !

**सरस्वती**—– म्हणून म्हटलें की तो सोनाराकडून एकदा लवकर घडवून आणावा. म्हणजे आपणाला पुन्हा तसदी द्यावी लागणार नाही. आपणाला त्रास देण्याचें माझ्या गडे अगदी जिवावर येतें. पण जरूरीच्या गोष्टी केल्याच पाहिजेत ना ?

**आनंदराव**—– ही गोष्ट जरूरीची कशी तें नाही मला समजत. चंद्रहार गळ्यांत नसला तर अन्न गळ्याखाली उतरत नाही असें थोडेंच आहे ?

**सरस्वती**— उतरलें तरी अंगीं लागणार नाही हें खचित !

**आनंदराव**— तुला दागिन्याचा मोठा सोस बुवा ! असे खंडीभर दागिने कर कर करावे, आणि एक दिवस ते चोरानें आयतेच पळवावे म्हणजे सर्वच ग्रंथ आटपला !

**सरस्वती**— असेंच म्हणूं लागलें तर स्त्रीधर्म तरी बायकांनीं कां पाळावा ? एखादे दिवशीं एखाद्या निर्लज्ज मनुष्यानें तो जुलमानें हरण केला म्हणजे आटपला सगळा कारभार !

**आनंदराव**—पुरे पुरे ! कबूल केलें तुझें मागणें !

**सरस्वती**—खरेंच, अगदीं विसरलें ! चंद्रहाराच्या जोडीला तन्मणी नसला तर तो करून न करून सारखाच !

**आनंदराव**—–तुझ्या मागण्या फारच वाढत चालल्या !

**सरस्वती**—हें पहा, मी हें सर्व मागतें तें कशाकरिता बरें ? आपणालाच सुख व्हावें म्हणून ना ?

**आनंदराव**—पण मला त्यापासून मुळीच सुख होत नाहीं हें तर मी तुला आधीच सांगितलें.

**सरस्वती**—मला नाहीं तें खरें वाटत. आपणाला शोभेपेक्षा साधेपणाच आवडतो तर आपण मुलाचें नांव विहार, सुनेचें तरंगिणी आणि मुलींचीं चंद्रिका, हंसिका अशीं नांवें कशाला ठेविलीं असतीं ?

**आनंदराव**— तीं नांवें मी तरुण असतां बंगाली धर्तीवर ठेविलीं.

**सरस्वती**–मी तरी तरुणच आहे ना ? मग मला कां बरें शोभा आवडूं नये ?

**आनंदराव**–बरें, तुझें म्हणणें इतकेंच ना की तुला चंद्रहाराबरोबर तन्मणी-हि पाहिजे ? कबूल ! पण आता तरुणपणा आणि वृद्धपणा यांबद्दल ब्र काढा-यचा नाहीं, समजलीस ?

**सरस्वती**–मी कांहीं इकडच्या आज्ञेच्या बाहेर नाहीं. माझा यत्न नेहमी आपल्या इच्छेप्रमाणे वागण्याचा असतो, हें आपण पहातच आहां. गेले चार पांच दिवस हा मेला स्वैंपाक पाठीमागे लागला नसता तर हे दिवससुद्धा आपल्या सेवेंतच गेले असते. पण काय करूं ? जोंपर्यंत आचारी मिळणार नाहीं आणि चंद्रिकाबाईसाहेबांवर शास्त्राप्रमाणे संस्कार घडणार नाहीं तोंपर्यंत त्यांच्या हातचा स्वैंपाक देवब्राह्मणांना किंवा नैवेद्यवैश्वदेवाला थोडाच चालणार आहे ?

**आनंदराव**–तूं आपणांवरूनच पहा. तुला दागिन्यांची किती हौस आहे बरें ? चंद्रिका झाली तरी तुझ्यासारखी पोरच ! केशकलाप हा तिचा स्वाभाविक अलंकार ! तो आपण हिरावून घेऊं लागलों तर तिला कसें वाटेल बरें ?

**सरस्वती**–काय वाटायचें आहे त्यांत ! ती कांहीं जगांत एकटीच अशा प्रकारची नाहीं.

**आनंदराव**–दुसऱ्याविषयी विचार करावयाचा तो नेहमी आपण त्याच्या स्थितींत आहोंत असें कल्पून केला पाहिजे.

**सरस्वती**— पुरे मेलें हें अभद्र भाषण ! बरें चंद्रिकेचें एक असो; पण स्वैंपाकी तरी मिळविण्याचा कांहीं प्रयत्न ?

**आनंदराव**–काय सांगूं तुला ? आपला मागचा आचारी सोडून गेल्या-पासून मी सारखा त्याच खटपटींत आहें. आचारी तर नाहींच पण बाईसुद्धा मिळत नाहीं.

**सरस्वती**–बोललें तर इकडे राग येईल. पण या सुधारकांनीं पुनर्विवाहाचा प्रचार सुरू करून स्वैंपाकिणी अगदी महाग करून टाकिल्या आहेत !

**आनंदराव**— आचारी तरी किती चढून गेले आहेत म्हणतेस ! आणि बेट्यांचा पोषाख तरी असा भपकेबाज असतो की त्याजकडे पहातच रहावें ! आपला नुक्ताच सुटलेला आचारी जेव्हा पहिल्यानें रहाण्याकरिता मजकडे आला, तेव्हा त्याची बूटपाटलोण पाहून त्यास सामोरा गेलों, आणि त्याला खुर्चीहि दिली.

**सरस्वती**–मेला ढोंगीहि कांही कमी नव्हता ! आपण त्याचा पगार ठरवितांना निषिद्ध पदार्थ तयार करशील कीं काय असें त्याला विचारलें होतें ना ?

**आनंदराव**–केव्हा ? मला माहितसुद्धा नाही.

**सरस्वती**–त्यानेंच मला सांगितलें. पण तें सांगतांना तो असेंही म्हणाला की मी प्रथम कबूल नव्हतों, परंतु मला दहाचे पंधरा रुपये द्याल तर मी वाटेल तो पदार्थ तयार करून देत जाईन, आणि अठरा द्याल तरा खातसुद्धा जाईन.

**आनंदराव**– काय लुच्चा माणून पहा !

**सरस्वती**– किती ढोंगी तरी !

**आनंदराव**– एखादा चांगलासा आचारी किंवा बाई पाहाण्याबद्दल मीं हरीहरशास्त्र्यांना सांगितलं आहे. ते बहुतकरून एक दोन दिवसांतच आणतील, असें त्यांच्या भाषणावरून दिसलें. त्यांनाहि कोणी नाही मिळालें तर माझ्या स्नेह्यांना लिहून व मोठ्या पगाराचें आमिष दाखवून मी ही तुझ्या मागची कटकट कायमची नाहिशी करून टाकितों. प्रिये ! तुझ्या जिवाकरिता मी वाटेल तें करण्याला तयार आहें. पण हें जें माझें तुजवरचें खऱ्या भावाचें प्रेम तसें तुझेंहि मजवर आहेना ?

**सरस्वती**–– माझेंही तसेंच आपणांवर असावें म्हणून मी आपणांकडून कितीतरी प्रयत्न करितें.

**आनंदराव**– म्हणजे तुझें मजवर अजून चांगलेंसें प्रेम कांही नाही ? पण त्यांत मला कांही नवल वाटत नाही. प्रेमसुद्धा अभ्यासानें वाढविलें पाहिजे. मी तुला स्त्रीधर्मावर एक उत्तम पद्यात्मक निबंध वाचावयास दिला होता, तो तूं वाचला नाहीस वाटतें ?

**सरस्वती**–– आपली आज्ञाच होती म्हणून मीं त्याचीं एक दोन पानें लागलेच वाचून पाहिलीं पण पुराणांतल्या किंवा कादंबरींतल्या गोष्टीप्रमाणे तो

मनोरंजक न वाटतां उलट मला झोंप येऊं लागली. तेव्हापासून मी रोज निजावयाच्यापूर्वी त्याचें एक पान वाचावयाचा परिपाठ ठेविला आहे. त्यामुळे माझी झोंपेची कुरकुरहि नाहींशी झाली व आपल्याहि आज्ञेप्रमाणे वागल्यासारखें झालें !

**आनंदराव**–निबंधापेक्षा गोष्टी आवडणें हें कांहीं प्रगल्भ बुद्धीचें लक्षण नव्हे.

**सरस्वती**— आपणाप्रमाणे मलासुद्धा पुष्कळदा वाटतें की मी मुळींच आपल्याजोगी नाही. आणि जर स्वतःला शोभेशी प्रगल्भ वयाची व बुद्धीची गतभर्तृकाच बायको केली असती तर किती चांगलें झालें असतें ?

**आनंदराव**– थांब, तुला या निबंधातील एक उत्तम भाग वाचून दाखवितों. ( वाचतो. )

( अर्जुन तर संन्यासी०–या चालीवर )

**स्त्रीचें दैवत पतीवीण नसे कोणि जगीं दुसरें । पतिव्रता स्त्री तदितर विषयां पूर्णपणें विसरे ।। बघुनी दुःखिं पति खिन्न वदन करि सुखि पाहुनि हंसरें । दुःख विभागुनि सौख्य दुणावुनि पतिचें भान हरे ।। संसृति वाहन या चक्रांविण भासतसे अपुरें । एक दुज्याहुनि उणें तरी रथ तिळहि पुढे न सरे ।।**

ही चक्रांची उपमा पाहिलीस का कशी समर्पक आहे ती ?

**सरस्वती**-- म्हणजे दोन्ही चाकें सारखीं असली पाहिजेत असाच ना याचा अर्थ ?

**आनंदराव**– तें पुढे स्पष्ट केलें आहे.

( चाल ) **हीं चक्रें असलीं पाहिजेत सारखीं । अंतरीं असावा स्नेह तयांच्या मुखीं । नातरि परस्परां होतिल तीं पारखीं । त्यांच्या कलहें रथ मोडुनियां पडे क्षणावसरें । निवडावी अनुरूप वधू निज म्हणुनी चतुर नरें ॥ १ ॥**

( सरस्वतीला झोंप लागलेली पाहून ) अरे ! हिला तर गाढ झोंप लागली ! तर आपणालाहि आपला रथ येथे थांबविला पाहिजे. प्रिये, ऊठ ऊठ !

**सरस्वती**—( जागी होऊन ) काय चमत्कारिक तरी स्वप्न मला पडलें !

**आनंदराव**—काय पडलें ऐकूं दे.

**सरस्वती**—मीं असें पाहिलें कीं,

( कैकयिनें जें वचन०—या चालीवर )

**आपण दोघें रथांत बसुनी जात जणूं मार्गे। सुरम्य नाना वदत कथांसी परस्परांसिंगें॥ अशा समयिं शकटांतुनि निघुनी एक चक्र वेगें। समीपिंच्या कवणा पुरुषावरि जाउनिया लागे॥ त्या चतुरें तें दृढ धरुनि करीं आणियलें मागे। रथासि जोडुनि पुनरपि करि तो पूर्ण तया अंगें॥**

( **मनोहर** प्रवेश करितो. )

**आनंदराव**—बहुतकरून त्या निबंधांतील रथच तुझ्या स्वप्नांतील रथाचा जनक असला पाहिजे. कोण? मनोहरपंत? आंत या. असे बाहेर उभे कां? ( सरस्वतीस ) हे आपल्या तरंगिणीचे आतेभाऊ व येथील गतभर्तृकाश्रमाचे उत्पादक मनोहरपंत. मनोहरपंत, हें माझें द्वितीय कुटुंब.

**मनोहर**—आपला नवीन संबंध आपणांस मुखकर होवो!

( देखोरी न माने श्याम०—या चालीवर )

**दुजि ना मनीं आस। अपुलें असो प्रेम ऐसेंचि दृढपाश॥ ध्रु०॥ शुक्लेंदुवत् प्रीति। वाढावि, हो अंतिं। पूर्णेंदुसम, कांति। पावो न कधिं नाश॥ १॥**

**सरस्वती**— ( खालीं पहात ) आजपर्यंत मी आपल्या औदार्याबद्दल फार कीर्ति ऐकत होतें, पण प्रत्यक्ष पाहण्याचा योग आला नव्हता.

( दरसन कैसे पाऊं०—या चालीवर )

**शुभ दिन अजि भासे मम मना। नयनयुग सुखजलमय तरि तृषितचि निरखुन॥ ध्रु०॥ सुकृताचि जननांतरींचें। सफल मम अजि गमत खचित बघुनि अवचित या। उदारचरित मूर्तिसि वचन मधुसम परिसुन॥ १॥**

आपणांसारखे पुरुष या भूमंडलास अलंकारच आहेत.

**आनंदराव**—( एकीकडे ) महात्म्यांच्या अंगीं वशीकरणाची अजब शक्ति

असते म्हणतात, तें खोटें नाही. यावरून माझ्या मनांत एक विचार येत आहे.

**मनोहर—** सरस्वतीबाई, माझ्यासारख्या ज्या पुरुषांच्या मागे फारसा व्याप नाही, त्यांनीं सत्कार्यीं आपली संपत्ति वेंचल्याची प्रौढी ती कोणती ?

**सरस्वती—**परंतु एक कुटुंब निवर्तलें असतां ऐन तारुण्यांतहि दुसरें कुटुंब न करण्याइतकें आत्मसंयमन असणें हीसुद्धा हलकीसलकी गोष्ट नव्हे.

**मनोहर—** या आपल्या दुर्दैवी देशांत तरी विधुराला प्रेमाची तहान भागविण्याला विवाहाकडेच धांव घेतली पाहिजे असें नाही.

( दातानें राखि जरा मग०–या चालीवर )

**सुख नरा मिळत पद जरि विहरण्या मिळे हृदया । मग तो प्रियजन अगतिक जन असो महीवरी या ॥ ध्रु०॥ स्वजन दैवें नुरविले । तरि हतबल गतधन जनिं मिळत विपुल अवसर निज हृदिं दयेसि या समया ॥ मग तो० ॥ १ ॥**

**आनंदराव—** मनोहरपंत, आज फार दिवसांनीं भेटलांत; तेव्हा आज येथेच फराळ झाला पाहिजे.

**सरस्वती—** खरेंच यांना फराळाला ठेवून घेतलेंच पाहिजे.

**मनोहर—**मी आपणा उभयताच्या बाहेर थोडाच आहें !

**आनंदराव—**( सरस्वतीस ) तर मग तुझी तयारी झाली म्हणजे आम्ही येतोंच. ( सरस्वती जाते. एकीकडे ) सरस्वतीच्या शिक्षणाची मीं आजपर्यंत उपेक्षा केली त्यामुळे तिला अजून स्त्रीधर्माची चांगलीशी ओळख पटली नाही. आता तिला नवीन व जुन्या अशा दोन्ही प्रकारचें शिक्षण एकदम चालू केलें पाहिजे, म्हणजे ही उणीव भरून येईल. तें तिला कंटाळवाणें वाटणार नाही अशी खबरदारी घेतली म्हणजे झालें. तिला पुराण फार आवडतें, तें हरिहरशास्त्र्यांकडून सांगविण्याची तजवीज करितों. तसेंच मनोहरपंतांची अध्यापनाबद्दल फार ख्याति असून तिचीहि भक्ति त्यांजवर असल्यामुळे नवीन शिक्षण देण्याच्या कामीं यांचा चांगला उपयोग होईल. ( उघड ) मनोहरपंत, तुमचें मला एका कामीं साह्य पाहिजे.

**मनोहर—**माझे बाबा आणि आपण यांमध्ये असलेला स्नेह सहज विसर-

ण्यासारखा नाहीं तेव्हां अकार्य नसल्यास मजकडून वाटेल तें काम करून घेण्याचा आपला अधिकारच आहे.

**आनंदराव**-छेः छेः ! अकार्य आणि मजकडून ? फार कशाला ! आता उगीच पाल्हाळ न लावतां सांगूनच टाकतों एकदम, म्हणजे तुमची ताबडतोब खात्री होईल. माझें द्वितीय कुटुंब की नाहीं अलीकडे फार हट्टी होत चाललें आहे. आणि तिला स्त्रीधर्माचेंहि अजून चांगलेंसें ज्ञान नाहीं. शिवाय तिच्या व माझ्या मतांत व रुचींत पदोपदीं अंतर दिसून येतें. मला साधेपणा आवडतो, तर तिला भपका आवडतो. मी सुधारक, तर ती दुर्धारक. मला गंभीर पुस्तकें आवडतात, तर तिला चटकदार कांदंबऱ्या पसंत पडतात. असें एक कीं दोन, काय काय म्हणून सांगावें ?

**मनोहर**—आता आपणच ज्या अर्थी हा विषय काढिला आहे त्याअर्थी मीहि आपणांस विचारतों, अशा विषम जोडप्यांत प्रेम उत्पन्न तरी कसें व्हावें ? प्रेम असतें तेथे वैषम्य असलें तरी तें नाहीसें होतें; परंतु वैषम्य असलें म्हणजे आधीं असलेलें प्रेमही विलय पावूं लागतें ! अपणांकडून अकार्य कसें संभवेल असा आपण मला प्रश्न विचारला. मी म्हणतों याहून अकार्य तें काय असावयाचें आहे !

( येजि तुम बिन जियरा०—या चालीवर )

**बिजबर जरि परिणी नव कन्या । उचित न करणी गमत अनुदिनीं निंद्य जना ॥ ध्रु० ॥ कलिका जीर्ण पल्लवापाशीं । रम्य हर्म्य नव जीर्ण गृहाशीं । नव नवरी प्रौढवरासरशी । बघवेना ॥ १ ॥**

माझा आपण या कामीं सल्ला घेतला असता तर फारसें बिघडलें नसतें.

**आनंदराव**- तुम्ही गेलां होतां वर्गणी गोळा करण्याला. आणि माझ्या लग्नाचा प्रकार कांहींसा प्रीतिविवाहासारखाच झाला. मीं तिला पाहिलें मात्र आणि माझ्या मनाचा धडा लागलीच तिच्याशीं विवाह करण्याचा झाला. प्रीतिविवाह हासुद्धा आपल्या इष्ट सुधारणांपैकींच आहे.

**मनोहर**-हा कसचा प्रीतिविवाह ! तशा विवाहास दोन अंगें असतात.

आपलें प्रेम वधूवर जडलें खरें, पण तिचें आपणावर होतें अशाबद्दल आपण कांहीं चौकशी केली का ?

**आनंदराव**–तिचें प्रेम सहवासानें बसेल ही माझी खात्री होती.

**मनोहर**–अशा प्रकारें एका अर्भकाच्या इच्छेविरुद्ध तिच्याशीं लग्न लावून सहवासानें तिचें प्रेम संपादन करण्याची दुराशा बाळगण्यापेक्षा आपणच जर एखाद्या पोक्त गतभर्तृकेबरोबर विवाह केला असता तर ? सहवासानें आपलें नसतें का प्रेम तिजवर बसलें ? आपण आजपर्यंत सभांतून किती वेळांतरी पुनर्विवाहांवर व्याख्यानें दिलीं असतील. आणि तीं सगळीं एका क्षणांत विसरून गेलांत ? आपल्यासारखीं माणसें जर असा अवसानघात करूं लागलीं तर भरंवसा धरावा तरी कोणाचा ?

**आनंदराव**— पुनर्विवाह न करण्याला मला एक बलवत्तर कारण झालें.

**मनोहर**–तें कोणतें ?

**आनंदराव**–आमची एक जवळची नातेवाईक वृद्ध बाई त्याच्या विरुद्ध होती; व याप्रमाणे सामाजिक व खाजगी कर्तव्यांत लढा पडून शेवटीं खाजगी कर्तव्याचा विजय झाला. माझें वर्तन कर्तव्याला सोडून नव्हतेंच.

**मनोहर**–कोणती बरें ती नातेवाईक ?

**आनंदराव**–अहो, आमच्या मावसकाकाच्या मेव्हण्याच्या सावत्र आईचा मामा माहित आहे का तुम्हाला ?

**मनोहर**–बरें मग ?

**आनंदराव**– त्याच्या चुलत चुलत पुतण्याची सख्खी आजी. अगदी सख्खी बरें ! हें मी शपथेवर सांगूं शकेन.

**मनोहर**– बरीच जवळची आहे म्हणावयाची !

**आनंदराव**– फार जवळची नाही हें खरें; पण तशी फार दूरचीहि नाहीं.

**मनोहर**– इच्यापेक्षा पलीकडची म्हणजे आपले अगदी अव्वलचे आर्यबंधु इराणी वगैरे लोकातच हुडकावयास पाहिजे. बरें, माझें साह्य आपणांला पाहिजे म्हणतां तें कोणत्या कामांत ?

**आनंदराव**– माझ्या कुटुंबाला स्त्रीधर्म शिकवून तिची जात्याच असलेली शुद्धवृत्ति दृढ करावयाची. ती वयानें तुमच्या सख्ख्या बहिणीसारखीच आहे. तेव्हा इतके कष्ट घेण्याला तुम्ही मागेपुढे पाहाणार नाही ही माझी खात्री आहे.

**मनोहर**- हें तर काय ! परंतु ज्या ज्या आर्यस्त्रियांना माझ्या माह्याची अपेक्षा आहे, त्या सर्वांना मी माझ्या सख्ख्या बहिणीच समजतों. पण मला वाटतें माझ्या उपदेशापेक्षा आपल्याच उपदेशाचा तिच्यावर चांगला ग्रह होईल.

**आनंदराव** – तो तुमचा भ्रम आहे. माझाहि तुमच्यासारखाच भ्रम होता. पण मघाशी मी तिला बोध करीत असता त्या बोधाचा तिजवर पगडा बसावा तें राहून झोंपेचाच अंमल तिजवर बसला. तें पाहून माझ्या भ्रमाचा भोपळा पार फुटून गेला.

**मनोहर**--माझ्याहि बोधाचा परिणाम तसाच होणार नाहीं कशावरून ?

**आनंदराव**- तें मी सांगतों. माझ्या बोधाचा परिणाम पालथ्या घागरीवर पाणी याप्रमाणे कसा झाला हें मीं तुम्हांला सांगितलेंच. त्यानंतर लागलीच तुम्ही आलात. आणि ताबडतोब सरस्वतीचें अंतःकरण प्रसन्न दिसूं लागलें. तुमच्यासारख्या उदारधींच्या चेहऱ्यातच अशी कांही मोहिनी असते की प्राणिमात्र केवळ दर्शनानें गोगलगाय बनून जातो. मग माझ्या कुटुंबाचा काय पाड ?

**मनोहर**- माझा कांही उपयोग होईल असें वाटत नाहीं. आणि आपल्या स्तुतीला तर मी मुळींच पात्र नाहीं. परंतु कांहीं उपयोग होईल असें आपणांला वाटत असल्यास प्रयत्न करण्याला माझी तयारी आहे.

**आनंदराव**-- त्या प्रयत्नाला हटकून यश येणार ! तुम्हांला सोपें जावें म्हणून मीं हरिहरशास्त्री नांवाच्या इसमाचीहि पुराण सांगण्याच्या कामीं योजना केली आहे. या जोडगोळींतून एकीस तरी विजय मिळालाच पाहिजे.

**मनोहर**- मीसुद्धा आपणांला एका बाबतींत शब्द टाकणार आहें.

**आनंदराव** — बोला काय असेल तें. एखाद्या सभेंत पुनर्विवाहासारख्या आवडीच्या विषयावर भाषण करावयाचें असेल तर मी तुमच्याकरिता रात्रंदिवस खपून असें सुंदर भाषण तयार करितों की श्रोत्यांनीं गारीगार व्हावें.

**मनोहर**-- ( एकीकडे ) वर्तणुकींतला थंडपणाच तसें करण्याला पुरेसा आहे ! ( उघड ) एका वराला छानदार वधू पाहून द्यावयाची आहे.

**आनंदराव**- कुमारी कीं गतभर्तृका ?

**मनोहर**—( एकीकडे ) प्रथमच आपला हेतु न सांगतां यांचें मत काय आहे तें काढूं या. ( उघड ) असें घटकाभर समजा की गतभर्तृकेशीं विवाह करण्याचें त्याला धैर्य नाहीं.

**आनंदराव**– मग अशा भागूबाईला नवरा पाहायचा सोडून नवरी कशाला पाहतां ?

**मनोहर**–( एकीकडे ) माझ्या बेताला यांचा अडथळा येईलसा दिसत नाही. (उघड) अपल्या बोलण्यावरून आपणांला एकदम खरें सांगण्याला कांही हरकत दिसत नाही.

**आनंदराव**–मुळीच नाही. मनोहरपंत, माझ्याशीं आणि इतका संकोच !

**मनोहर**– ऐका तर. आमचा चकोर, आजच जपानाहून परत आला.

**आनंदराव**–वाः ! मोठी आनंदाची गोष्ट ! त्याचें अभिनंदन करण्याला एक सभा जरूर भरविली पाहिजे.

**मनोहर**–सभेची कांही जरूर नाही. त्याचा बेत पुनर्विवाह करण्याचा झाला आहे.

**आनंदराव**–मोठी संतोषाची गोष्ट आहे ! मग उशीर कशाला उगीच आपण आहोंतच त्याला पाठिंबा देण्याला तयार.

**मनोहर**–त्याला योग्य वधू पाहिजे आहे.

**आनंदराव**–मग आपल्या आश्रमांत नाही का सांपडणार ?

**मनोहर**–पण त्याचें प्रेम एका मुलीवर बसून चुकलें आहे.

**आनंदराव**–लहान मुलाचें कसलें प्रेम घेऊन बसलांत ? आपणांला पसं पडेल त्या मुलीशीं टाकावा उरकून विवाह !

**मनोहर**–पण चकोर कांही आता तितका लहान नाही !

**आनंदराव**–बरें, कळूंद्या कोणत्या मुलीवर त्याचें प्रेम आहे तें ?

**मनोहर**–ती मुलगी आपणांलाहि माहित आहे. तिचें एका म्हाताऱ्याशी लग्न झालें होतें.

**आनंदराव**–कांही लक्ष्यांत येत नाही बुवा अजून ?

**मनोहर**–आपणच तिला चकोराला देऊं केली होती.

**आनंदराव**–माझ्या शेजाऱ्यांपैकी कोणाची मुलगी आहे का ती ?

**मनोहर**–अजून नाही लक्ष्यांत येत ? अहो, आपली चंद्रिका !

**आनंदराव**–हं, आता आठवलें. जपानास जाण्यापूर्वी चकोराच्या डोक्यां असें कांही वेड होतें खरें ! पण मला वाटलें होतें की हा वेळपर्यंत तो पार विसरून गेला असेल.

**मनोहर**—अलीकडच्या मुलींचीं मनें अशीं विसराळ नसतात.

**आनंदराव**—तें सगळें खरें; पण चंद्रिकेचा मानस कुठे आहे पुन्हा लग्न करण्याचा ? आणि एकाच पक्षाचें मत घेऊन लग्न करण्याच्या मी अगदी विरुद्ध आहें.

**मनोहर**—( एकीकडे ) स्वतःची गोष्ट खेरीज करून !

**आनंदराव**— तिचा पति गत झाल्यापासून तिनें जी हाय घेतली ती अजून सोडली नाही.

**मनोहर**—काय म्हणता ! तिचें त्या म्हाताऱ्यावर प्रेम होतें ?

**आनंदराव**—आमची चंद्रिका किती प्रेमळ मुलगी आहे याचा तुम्हांला अजून अनुभव नाही. शिवाय तिचा नवरा काही फारसा म्हातारा नव्हता. तजपेक्षा सारा पांचसहा वर्षांनीं वडील !

**मनोहर**— चंद्रिकेची भेट होईल तर आपण तिचें मन वळवूं अशी वकीलाला उमेद आहे.

**आनंदराव**—आमच्या अर्धांगीचें मत या बेताला अनुकूल पडलें पाहिजे. तिनें आखडतें घरलें म्हणजे मी अर्धांगवायु झालेल्या रोग्याप्रमाणे अगतिक होऊन जातों. तरी पण मी त्या दोघांची गांठ पडावी अशी योजना करण्याचा प्रयत्न करण्याच्या मार्गाला लागण्याचें मनापासून वचन देतों, अगदी अंतःकरणापासून !

**भेंकड**— ( प्रवेश करून ) रावसाहेब, पात्रें वाढून तयार आहेत. चला भोजनाला. ( दोघे जातात. स्वतःशीं ) रावसाहेबांनीं माझ्या स्वभावावरून माझें नांव भेंकड ठेविलें आहे आणि स्वतः पाहिले तर माझ्याहूनहि ताण ! आम्हां दोघांमध्ये अंतर इतकेंच की ते एखादी गोष्ट उजेडात करावयास भितात व मी अंधारांत जाण्याला भितों ! ते भितात जिवंत माणसांना आणि मी भितों भुतांना ! एखाद्या यक्षिणीनें कांडी फिरवून नोकराचा धनी आणि धन्याचा नोकर केला तर तें कोणाच्या लक्ष्यांत येणार नाही. आणि मग मी रावसाहेबांनाच माझ्या पायांवर पाणी घालावयास लावीन. अरे, पण ते पाहा रावसाहेब आणि पाहुणे कपडे काढून पाय धुण्याला चाललेच. तर त्यांच्या पायांवर पाणी घालायला गेलें पाहिजे. नाहीतर नोकरीवरच पाणी पडायचें.

( जातो. )

——

## प्रवेश ३ रा

( हरिहरशास्त्री आणि वेणू )

**हरिहर**– हं, वेणूबाई, सांगा तुमचा निश्चय एकदाचा. माझ्या म्हणण्याला रुकार दिलात तर जन्माच्या सुखी व्हाल आणि जर का नकार दिलात तर मी तुमच्या नावाचा बोभाटा केलाच म्हणून समजा ! वैधव्य आल्यानंतर वर्षाच्या आंतच तुमचें वाकडें पाऊल कसें पडलें, नंतर तुम्हीं आपल्या पापाचा पोट उकला त्या सुइणीपाशीं कसा केलात, आपला पोटचा गोळा दुसऱ्याच्या हातानें अनाथगृहात सोडून द्यायला तुम्ही कशा तयार झालात......

**वेणू**– नकाहो असें बोलूं ! तो प्रसंग आठवला म्हणजे पोटात कशी कालवाकालव होते ! माझ्या बाळाचा मीं शेवटचा मुका घेतला, आणि त्या अजाण अर्भकानें आपलें गोड आणि निष्कपट हास्यमुख मजकडे फिरविलें, तेव्हा मला त्रिभुवन आठवून रडता भुई थोडी झाली. शास्त्रीबुवा, खरेंच काहो माझ्या बाळाचा त्या अनाथगृहात अंत झाला ?

**हरिहर**– मी कशाला खोटें सांगूं ? तुमच्या आणि माझ्या पापाचा साक्षीदार या जगातून नाहीसा झाला.

**वेणू**– मीं चांडाळणीनें जर त्याला दृष्टीआड केला नसता तर माझ्या लाडक्यानें जगांतील काही तरी सुख पाहिलें असतें !

**हरिहर**– त्याला आपल्या मातुश्रीबद्दल फारच आदर वाटला असता !

**वेणू**– तुमची जीभ झडून जात नाही असें बोलतांना ? मला पापाचरणाला कोणीं लाविलें ? पुराणांतलीं वाग्मीं पुराणात विसरून एका अनाथ स्त्रीच्या जन्माचें मातेरें कोणी केलें ? आपल्या हिडिस पापाचें फळ जें माझें गोड बाळ त्याची आणि माझी ताटातूट कोणीं केली ?

**हरिहर**– मीं केली, मीं ! पण आम्हां पुरुषाना काय भय आहे वाटेल तें करण्याचें ? जर आमच्या अंगात मर्दपणा आहे तर आम्ही वाटेल त्या स्त्रीस बिघडवून टाकूं. स्त्रियाना मात्र तशी मोकळीक ठेविली नाही. " न स्त्री स्वातंत्र्यमर्हति !"

**वेणू**– म्हणजे पुरुषानीं वाटेल तिच्याशीं स्वेच्छाचारानें वागावें, आणि तिनें जीभ उचलली की तिला बोलायचीहि चोरी, असेंच की नाही ?

**हरिहर**– अस्सेंच ! अस्सेंच ! आटप लवकर. मला आता जास्त बोलायला फुरसत नाही.

**वेणू**– फुरसत असेल कुठून ! धर्माच्या पांघरुणाखालीं दुसऱ्या अबलांचे गळे कापायचे कीं नाही ?

**हरिहर**– संधि सापडल्यावर कोण तसें करीत नाही ? मोठे धर्मात्मे सुद्धा आधी पोटोबा आणि मग विठोबा असें वर्तन करितात. चित्राहुतींपेक्षा प्राणाहुति नेहमी मोठ्या असावयाच्याच ! पण हें फालतू बोलणें राहूं दे तूर्त एकीकडे. मी पांच अंक मोजतों, त्याच्या आंत जर तुझा रुकार आला तर बरी गोष्ट आहे; नाहीतर तुझें नाव चव्हाट्यावर आलेच म्हणून समज ! सोडणार नाही ! हं. एक.

**वेणू**– कराल, तुम्ही वाटेल तो मात्रागमनीपणा कराल.

**हरिहर**– दोन.

**वेणू**– अभक्ष्यभक्षणाबद्दल सुधारकाना वाळींत टाकून आपण त्यावर यथास्थित ताव माराल.

**हरिहर**– तीन.

**वेणू**– अपेयपानाबद्दल तिरस्कार दाखवून ओकारी येईपर्यंत त्याचें सेवन कराल.

**हरिहर**– चार.

**वेणू**–विधवांच्या मुंडनाचें मंडन करून सकेशा विधवेला कुमार्गाला लावाल.

**हरिहर**– पा–

**वेणू**—कबूल आहें मी तुमच्या म्हणण्याला.

**हरिहर**—लवकर ताळ्यावर आलात म्हणून बरें झालें.

**वेणू**—मात्र हें सारें एका अटीवर हो !

**हरिहर**—पुन्हा कांही तरी विघ्न उपस्थित केलेंत वाटतें ? हं, कोणती अट ?

**वेणू**—की मीं त्या बाईची प्राप्ति तुम्हांला करून द्यावयाची आणि तुम्हीं मजवरचा हक्क सोडावयाचा.

**हरिहर**—या तुमच्या म्हणण्यापैकी अर्धा भाग तर मी तावडतोब कबूल करितों.

**वेणू**—तो भाग म्हणजे त्या बाईच्या प्राप्तीबद्दल असेल ? वाः ! मोठे उदारच कीं नाही तुही !

**हरिहर**—बरें बोवा ! दुसराही भाग कबूल करितों. मग तर झालेंना ? आता तुम्हाला ज्या घरीं स्वैपाकाला ठेवणार तेथली थोडीशी माहिती तुम्हांला असली पाहिजे. यजमानाचें नांव आनंदराव. त्याच्या तरुण बायकोचें नांव सरस्वती. नवराबायकोचें प्रेम यथातथाच आहे. त्या अर्थी बायकोचें प्रेम मजकडे वळेल असें करणें तुम्हाला फारसें जड जाणार नाही. एकदा ती हस्तगत झाली की मग तुम्ही वाटेल तिकडे जाण्यास मुखत्यार आहांत.

**वेणू**—ही अट पाळणें तुम्हाला मोठेंसें कठिण जाणार नाही. कारण सुग्रास अन्न मिळाल्यावर शिळ्या भाकरीची काय पर्वा असणार ?

**हरिहर**—सुग्रास अन्न तर खरेंच ! जिचीं पंचेंद्रियें म्हणजे केवळ पंचपक्वान्नें अशी ती सुवर्णस्थालीप्रमाणें सुंदरी या पंचप्राणास गार करणार नाही तर मी खरोखर पंचत्वाप्रत जाईन.

**वेणू**—( एकीकडे ) तसें होईल तर मी साखर वांटीन !

**हरिहर**—पण वेणूबाई, कसेंही झालें तरी तुमच्यावरचें माझें प्रेम कांही कमी नाही. चला, तिकडेच जाऊं. ( जातात. )

---

## प्रवेश ४ था

**( चंद्रिका, हंसिका, तारा, कमला** आणि **विमला. )**

**हंसिका**—ताई, सहा महिने झाले तूं कोपऱ्यांत बसून सारखी रडत असतेस. आमच्यांत मिळत नाहीस, मिसळत नाहीस, मी हट्ट धरून तुला खेळांत बोलावूं लागलें म्हणजे तूं अधिकच रडतेस. हें काय बरें असें ?

**चंद्रिका**—बाळे हंसिके, तुझा खेळ एखादे दिवशीं आईनें एकदम मोडून टाकिला तर तुला नाही का रडें येत ?

**हंसिका**—पण तूं मुळी खेळ खेळतच नाहीस, मग खेळ मोडणार कुठून ?

**चंद्रिका**—हंसिके, माझ्या दुर्दैवानें माझ्या संसाराचा खेळ अवेळीं मोडून टाकला नाही का ?

( राग आला ना फार माधवा०—या चालीवर )

**खेळ संसृतिचा मांडिला न तों । देव कोपें भंगोनि टाकितो । दुःखिं बाळेच्या सौख्य मानितो ॥ ध्रु० ॥ मूर्ति धरिं जी प्रेमें हृदंतरीं । ईश वैषम्या तिजविशीं धरी । करुनि दुर्लभ तिज मर्मिं हाणितो ॥ १ ॥**

**हंसिका**—तें कांही मला समजत नाही. पण तूं जर त्या म्हाताऱ्याकरिता इतकी रडत असशील तर तसें कांही करायला नको. मोठा मेला आला होता तुझ्याशीं लग्न लावायला तोऱ्यानें ! पण धिंडका वरातींतूनहि धडपणें पार पडली नाही !

**तारा**— मेल्याला पालखींतून मिरवायला पाहिजे होतें. पण ज्या पालखींत स्वारी बसायला गेली ती अखेरीस तिरडीच ठरली !

**कमला**--तसेंच नळेचंद्रज्योतींच्या प्रकाशांत आपली धिंड काढण्याची त्या वांदराला भारी हौस होती. पण त्याच नळयांच्या बोळक्यांतला धूर त्याच्या तोंडाच्या बोळक्यांत शिरून स्वारीनें राम म्हटला! इच्छामरणीच म्हणावयाचा !

**विमला**— वाईट वाटतें तें इतकेंच की मेला स्वतः जिवानिशीं गेला तो गेला आणि आमच्या चंद्रिकेला जन्मभर आपल्या नांवानें रडत बसविलें.

**कमला**—तारे, विमले, तुम्हांला आठवतें का ग आपण एक दिवस चकोराबरोबर खेळत असतांना त्याचें आणि चंद्रिकेचें लगिन लावलें होतें तें ?

**तारा**— कसें नाही आठवणार ? मी आणि विमलेनें भटांप्रमाणे मध्ये अंतरपाट धरून मंगलाष्टकें म्हटलीं होतीं.

**विमला**—हो ग हो ! मलाही आठवतें; मी म्हणतें, मग याप्रमाणे आपण एकदा लग्न लाविल्यावर त्या थेरड्याला आणि त्या भटुरग्यांना काय अधिकार होता चंद्रिकेचें पुन्हा लग्न करण्याचा ?

**चंद्रिका**—सख्यांनो, तुम्ही माझी कड घेत आहांत तें पाहून मला किती बरें वाटतें म्हणून सांगूं ! पण तुमच्या मंत्रांना भटांच्या मंत्रांची बरोबरी कशी होईल ?

**हंसिका**—कांही नाही ! त्यांचे मंत्रसुद्धा आपल्या मंत्रांप्रमाणेच पोपटपंची असते, नाहीतर काय ?

**कमला**–इतकेंच नाहीं, तर आम्हीं शुद्ध भावानें लाविलेलें लग्न भटानीं दक्षिणेच्या लोभानें केलेल्या लग्नापेक्षा हजारपट बरें! आणि तें देवाच्या घरींहि खास रुजू होईल.

( सत्य आहे गुरुची खुण०—या चालीवर )

**लग्न अम्हीं लाविलें । गडे ग । तें खऱ्याहुनिहि चांगलें ॥ध्रु०॥ त्या अंतरपाटाहुनी । हा अंतरपाट मैत्रिणि । शुद्ध विमल खचित आढळे ॥ १ ॥ त्या नीरस मंत्राक्षता । त्यांहुनि अमुचे तत्त्वतां । मिथ्या करविक्षेप भले ॥ २ ॥**

**चंद्रिका**–तुम्हांला माहित नाही तुम्ही या गोड शब्दांनीं माझें अंतःकरण कसें पोळीत आहांत तें.

**हंसिका**–ताई, तुला रुचत नसेल तर आम्हीसुद्धा गप रहातों हो! आज तुला आमच्या खेळांत घेतल्यावांचून बरीक कांहीं सोडणार नाही.

**चंद्रिका**–तुम्हांला बरें वाटत असेल तर मीहि तुमच्या म्हणण्याबाहेर नाही.

**हंसिका**–आता कसें आमच्या जिवाला समाधान वाटतें! बरें, आता खेळ खेळायचा तरी कोणता? छपापाणी की फुगड्या?

**कमला**–छे बाई! हे दोन्ही धागडधिंग्याचे खेळ काढलेस! चंद्रिकेच्या कैकेयी आईसाहेबांच्या कानांवर जर का इकडचा ब्र गेला तर त्या आकाश-पाताळ एक करून सोडतील.

**तारा**–खरें पाहिलें तर त्या आपल्याच बरोबरीच्या! पण रावसाहेबांच्या अर्धांगी झाल्यापासून नाकावर माशी कशी ती टिकत नाही!

**विमला**–आणि दागिन्यांनीं कशी सजली असते पाहिलीतना? गौरीसारखी.

**हंसिका**–असें असून आमच्या ताईचे केंस बरीक तिच्या डोळ्यांत कसे खड्यासारखे खुपतात.

**चंद्रिका**–पुरे झाल्या बाई आईवरच्या तुमच्या टीका! ती वयानें बरोबरीची असली म्हणून काय झालें? मानानें तर वडील आहे ना? ठीकच आहे!

( ऐसा शंभु साजणी०—या चालीवर )

**स्थानें एका वस्तुसि ये भिन्ना महती । नियम असा हा अप्रतिहत दिसतो जगतीं ॥ घन-जल वर्षे हिमनगतालें**

**पंकचि हो तें। परि तें शिखरीं होई हिम मनोज्ञकांति ॥१॥**
**विजनीं विपिनीं सुंदरशीं कुसुमें फुलती। कालें सगळीं**
**कोमेजुनि विगलित होती। उपवनिं सुमनें लतिकावलि परि**
**जीं प्रसवे। सुरमूर्तींच्या शिरिं भक्तार्पित तीं वसती ॥ २ ॥**

**तारा**–बरें बाई, तुझ्या आईचें गौरीप्रमाणे सजणें आणि तुझ्या अंगावर फुटका मणिहि न ठेवणें, दोन्ही गोष्टी तिला शोभतातच !

**कमला**–हं, मग खेळ कोणता ठरला खेळायचा ?

**हंसिका**–तर मग गौर गौरच खेळूं या.

**सर्वजणी**—खरेंच गडे ! कसा पण योग्य खेळ काढलास शोधून ! तरी नावाची हंसिका आहेस ! ( हंसतात )

**कमला**–हंसिके, आण तुझी बाहुली. तिला आपण गौर करूं.

( सर्वजणी गौर मांडतात. )

**सरस्वती**– ( प्रवेश करून एकीकडे )–बाई बाई ! पोरींनीं घर अगदी डोक्यावर घेतलें ! आमच्या ताईसाहेबांच्या डोक्यावर तर छप्पर आहेच ! त्यांना आणखी निराळें घर डोक्यावर घ्यायला नकोच ! बरें पाहूं तर खरें काय खेळ चालविले आहेत ते.

**हंसिका**–आता बायाना कूंकूं कोण लाविणार ? मीच लावितें नाहीतर. ( इतर मुलींना लाविल्यावर चंद्रिकेस कूंकूं लावूं लागते. )

**चंद्रिका**— हंसिके, असें काय वेडयासारखें करावें बरें ? ज्या गोष्टीचा मला अधिकार नाही तिच्याबद्दल हट्ट धरून काय लाभ होणार ?

**हंसिका**–ताई, तूंच नाही का मघाशीं कबूल केलेंस मी तुमच्या खेळांत मिसळेन म्हणून ?

**चंद्रिका**–म्हणून काय झालें ? जें उघड उघड दिसण्यांत गैर तें मी कसें करूं ? तूच सांग, जें सौभाग्य माझ्या कपाळीं नाही त्याचें चिन्ह कपाळावर मुद्दाम लाविल्यानें झालेली गोष्ट थोडीच चुकवितां येणार आहे ?

**तारा**— आम्हीं सगळ्याजणींनीं मघाशींच तर ठरविलें की तुझें लग्न चकोराशीं बरिक लागलें, त्या म्हाताऱ्याशीं मुळींच लागलें नाही.

**हंसिका**–ताई, माझा हट्ट तूं नाहीस पुरविणार तर पुरविणार तरी कोण ?

मी तुला कुंकूं लावणारच. सोडणार म्हणून नाही. (चंद्रिका चुकविते, हंसिका कुंकू लाविते. चंद्रिका पुसून टाकिते. )

**सरस्वती**-(पुढे होऊन) लाज वाटते का कांही असलें अमंगळ कृत्य करायला ? (चंद्रिका हंसिकेशिवाय इतर मुलींस जाण्यास खुणावते. त्या जातात.) इतक्या साळकाया म्हाळकाया जमल्या होत्या, त्यांतून एकीनें तरी असा भ्रष्टाचार करायला हरकत करायची होती ! पण सगळ्या मेल्या सुधारकांच्या मुली, आणि एका माळेंतल्या ! घ्या म्हणावें ही आपली सुधारणा ! आमच्या वेळीं कांही बाई ही तऱ्हा नव्हती !

**हंसिका**-( एकीकडे ) आपण आजीबाईच कीं नाही !

**सरस्वती**—हंसिके, काय ग पुटपुटते आहेस ? वडीलधाऱ्या माणसांचा मान चांगला ठेवतेस अं ! आणि जुनी रीतभातही चागली पाळतेस ! पण मुस्कट इकडचें तिकडे फिरवून टाकिन ठाऊक नाही अजून ?

**चंद्रिका**—आई, त्या बिचारीकडे काय दोष आहे ? सगळा दोष माझा आहे. मी पाहिजे तर तुझ्या पायां पडतें; नाक घासतें. ( पायां पडते. )

**सरस्वती**— या आल्या आजीबाई कैवार घ्यायला !

( एकीकडून **आनंदराव** व दुसरीकडून **विहार** प्रवेश करितात. )

**आनंदराव**-काय झालें काय येवढा गहजब करायला ?

**सरस्वती**— आपल्या शहाण्या ताईसाहेबांनाच विचारा काय झालें तें ! आता कशी गप बसली आहे. करून सवरून वर संभावित ती संभवित ! कोणी म्हणेल किती मर्यादशील आहेहो !

**विहार**-चंद्रिके, काय झालें तें कळूं दे तरी एकदांचें.

**चंद्रिका**-दादा हंसिकेनें अजाणपणानें सहज माझ्या कपाळीं कुंकू लाविलें, इतकेंच काय तें.

**सरस्वती** — जसें कांही विधवांनीं कुंकू लावणें म्हणजे कांहीच नाही ! कशी चुरुचुरु बोलत आहे पहा !

**चंद्रिका**- आई, मी गप बसलें तरी तुझा राग आहे, आणि बोललें तरी आहे. मी कसें वागूं तें सांग तरी !

**सरस्वती**- तूं येवढी शहाणी सुरती असून मी काय बाई तुला शिकविणार ? कसें वागावें याचा मासला नुक्ताच आम्हाला पाहायला सांपडला ! विधवांनीं राजरोस ढालीयेवढें कुंकू लावून मिरवावें !

**विहार**–(एकीकडे) आणि सवाष्ण बायांनीं दिसूं नये इतकें बारीक लावावें !

**सरस्वती**– सवाष्णपणचे सर्व सुखसोहळे पाहिजेत. आणि स्वैपाक करायला मात्र आई !

**आनंदराव**– झालेल्या प्रकारात शिष्टाचाराच्या उल्लंघनापेक्षा कांही फारसा मोठा गुन्हा होत नाही.

**सरस्वती**– हे आले विधवांचे कनवाळू ! हें पाहा, आपण विधवेशीं लग्न लाविलें असतें म्हणजे आपणांला घरांत वाटेल तसें वागायला मोकळीक असती. पण देवानें मला आपल्या पदरीं बांधिलें आहे तेव्हा मी जिवंत आहें तोंपर्यंत असा भ्रष्टाकार होऊं देणार नाही. कां ? मी म्हणतें तें पटतें आहे का कांही ?

**आनंदराव**– तूं म्हणतेस यात बरेंच तथ्य आहे खरें.

**चंद्रिका**– बाबा आईच्या पायांवर मीं कपाळ घांसलें, तरी तिनें मला क्षमा केली नाही. हें बरें का ?

**आनंदराव**– खरेंच, क्षमा न करण्यासारखा कांही हा आपराध नाही.

**सरस्वती**—काय म्हणतां ? क्षमा न करण्यासारखा नाही ? आपलीच अशी फूस मिळाल्यावर तिनें तरी कां वाटेल तसें नाचूं नये ? आज कपाळीं कुंकूं लाविलें, उद्या झगा घालील; परवां एखाद्याचा हात धरून जाईल. कां ? मी म्हणतें हें खरें आहे ना ?

**आनंदराव**– तसें होण्याचा संभव आहे खरा.

**चंद्रिका**– बाबा, तुमचाही मजवरचा विश्वास पार उडाला ना ? अथवा कां उघडणार नाही ?

( बलजोरि करत मैं न जाऊं०–या चालीवर )

**हतदैव जिचें फिरलें तिजवरि । कोण भरंवसा धरील लव-**
**भरि ॥ ध्रु० ॥ अनुभव बालपणापासोनी । अनुकूलचि आला**
**हृदया जरि ॥ १ ॥ असत्य वर्तन मिथ्या भाषण । स्वप्नींही**
**कधिं नच घडलें तरि ॥ २ ॥**

**विहार**– चंद्रिके, गतभर्तृकांच्या धर्माचें तूं उल्लंघन केलेंस ही तुझ्याकडून मोठीच चूक झाली.

**सरस्वती**– मला वाटलेंच तुमचें मत माझ्यासारखेंच पडणार म्हणून .

**विहार**— परंतु आईसाहेब, या अपराधाबद्दल आपण तिला जो वाग्दंड चालविला आहे तो मात्र फार जबर आहे यांत शंका नाही. अधेल्याच्या चोरीला कोणता सुज्ञ फांशीची शिक्षा देईल बरें ?

**सरस्वती**— अलीकडच्या पिढींतील पोरींप्रमाणे पोरामध्येहि मर्यादा उरली नाही.

**विहार**—असें आपल्या भाषणावरून दिसतें खरें ! आईसाहेब, मी नात्यानें आपला मुलगा खरा पण आपणांपेक्षा मी दहापांच पावसाळे जास्त पाहिले आहेत. तेव्हा मी म्हणतों याचा पोक्त विचार करा. आपण आणि बाबा जर चंद्रिकेला अशा रीतीनें वागवूं लागलात तर तिला सुख कसें मिळावें ? आपणावाचून तिला आता कोण आहे ?

**सरस्वती**— तुम्ही आहातना बंधुराज मायेचे !

**विहार**—ठीक आहे. आपण सुचविल्याप्रमाणे मी तिला आपल्या घरीं घेऊन जातों. चंद्रिके, चल. ज्या घरांत आपला मान राहात नाही त्या घरीं राहाण्यांत काय प्रेम ?

**हंसिका**— दादा, मीही येतें तुझ्याबरोबर.

**सरस्वती**— जाऊं द्या तुमचीहि धिंडका बाहेर एकदांची !

( विहार, चंद्रिका व हंसिका जातात. )

ऐकिलींतना आपल्या सुपुत्राचीं कशीं मुक्ताफळें पडत होतीं तीं ? आजपर्यंत आपण फार मऊपणानें वागलांत त्याचा हा परिणाम बरें ! मी आपल्या घरात नाकापेक्षा मोती जड कधी होऊं नाही देणार. मग घरांतील सगळी मंडळी जाऊन मी एकटी उरलें तरी हरकत नाही.

**आनंदराव**— झाला हा प्रकार एकंदरीनें चांगलाच झाला. ( एकीकडे ) चंद्रिका गेल्यामुळे पुनर्विवाहाबद्दलचा मनोहरपंतांचा लकडा आपोआप मागचा चुकला. ( उघड ) आता तुजवर कामाचें मात्र फार ओझें पडेल.

**सरस्वती**— मी तरी त्याच विवंचनेंत आहें.

( हरिहरशास्त्री व वेणूबाई येतात. )

**हरिहर**—रावसाहेब, ही पहा बाई आणिली आहे. स्वभावानें फार गोड आणि मनमिळाऊ, आणि कामाला खंबीर. आपण वाटेल तें काम सांगितलें

तरी एका पायावर तयार; याचा मला स्वतः अनुभव आहे. पगार सारः जेवून पाच रुपये.

**सरस्वती**—पण बाई यांच्या हातचा स्वैंपाक कसा चालणार ?

**हरिहर**—मला रावसाहेबांनीं तसें सुचविलें नाही. नाहीतर मीं तशीही व्यवस्था केली असती. पण अलीकडे सोंवळ्या बायाही मिळेनाशा झाल्या आहेत. बाकी अडीअडचणीचा प्रसंगीं अशा बायांच्या हातचें सुद्धा खाण्याला शास्त्राचा निषेध नाही. हा आपद्धर्म आहे.

**सरस्वती**—( एकीकडे ) मी तरी कामाला अगदी कंटाळून गेलें आहें. ( उघड ) शास्त्रीबुवा, तुम्ही जर हें पाप आपल्या शिरावर घेत असला तर मीहि आता फारसें ओढून धरीत नाही.

**हरिहर**–बाईसाहेब, आपल्या जिवाकरिता हेंचसें काय पण याहिपलीकडचें पाप शिरावर घेण्याला हा देह तयार आहे.

**आनंदराव**–ठरलें तर ? ( सरस्वती मानेनें 'होय' म्हणते ) शास्त्रीबुवा, तुम्हीसुद्धा आजपासून आमच्या मंडळींना पुराण सांगायला येत जायचें बरें का ?

**हरिहर**–मी आपल्या बाहेर नाही.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ५ वा.

### ( चकोर. )

**चकोर**–( स्वतःशीं ) काय अंधेर आहे पहा ! एक थेरडा स्वतःला सुंदर व तरुण नवरी मिळवून दिल्याबद्दल आपली सुंदर व तरुण मुलगी बक्षिसादाखल दुसऱ्या थेरड्याला अर्पण करितो. या दोन्ही नीच कृत्यांना निरक्षर भटांच्या अर्थशून्य मंत्रपठनानें विवाहाचें स्वरूप येतें. तो दुसरा थेरडा लग्नाच्याच दिवशीं आपल्या महापातकाचें प्रायश्चित्त भोगण्याकरिता यमलोकीं चालता होतो. त्याची मुग्ध व निष्कपट वधु कपाळाचें कुंकूं पुसून व अंगावरचे अलंकार काढून कोपऱ्यांत रडत बसते. आणि तिच्या डोळ्यांसमोर तिचा निर्लज्ज बाप आपल्या नवपरिणीत वधूशीं शृंगारचेष्टा करीत बसतो. यांतील प्रत्येक गोष्ट अंगावर कांटा उभा करण्यासारखी आहे. याचा समुच्चय तर मनाला वेड लावण्याला समर्थ आहे. असें असतां याबद्दल कोठे

सहानुभुति, चर्चा, सभा दिसून येते काय ? उलट आपल्या आवडत्या देशाची मजकडून अल्प सेवा व्हावी म्हणून दादानीं मला धंदेशिक्षण मिळविण्याकरिता जपानांत पाठविलें, आणि तें संपादन करून मी परत आलों, या अपराधाकरिता मजवर ग्रामण्य करण्याची कडेकोट तयारी चालली आहे ! तिकडे जपानी लोक आपल्या अतुल पराक्रमानें, स्वदेशभक्तीनें आणि सुधारणेनें पाश्चात्यांस चकित करून पौर्वात्यांचे माथे उजळ करीत आहेत आणि इकडे आमचे समाजाग्रणी नेभळेपणानें, देशद्रोहानें व हजारो वर्षांपूर्वीच्या व तत्कालीन समाजास धरून लिहिलेल्या ग्रंथास प्रमाण मानून व त्यांतील शब्दांवर बालिश कोट्या करून परकीयांच्या तिरस्कारास पात्र होत आहेत, व आपल्या मुखास कालिमा आणीत आहेत! तिकडे जपानी नरसिंह परकीय अस्वलांचीं नरडीं फोडीत आहेत, तर इकडे आमचे ग्रामसिंह आपसांत यादवी माजवून आपल्या देशहितेच्छूंवर ग्रामण्य काढीत आहेत ! आपल्या देशबंधूंशीं व भगिनींशीं अमानुषपणानें वागणारे हेच नरपशु परकीयांशीं हक्कासाठीं भांडू लागले म्हणजे धर्माचे अवतार बनतात आणि अगदी ताज्या राज्यविषयक ग्रंथातील प्रमाणें आणि दाखले पुढे करितात ! विहार हा याच वर्गांपैकी आहे. आणि हल्ली चंद्रिका त्याच्या देखरेखीखाली आहे. अशा अडचणींत तिची भेट कशी व्हावी ? मी जपानांतून परत आलों हें कळल्यापासून तर विहारानें तिला सक्त नजरकैदेंत ठेविली आहे; आणि शास्त्री, पुराणिक, भटभिक्षुक, महंत, तापसी यांवांचून इतरांचें मुखावलोकन करण्याची तिला बंदी केली आहे. बरें, मी महंताच्याच वेषानें गेलों तर तिची भेट होणार नाही का ? हो, हा एक मार्ग मोकळा आहे खरा— चला तर, त्याच्याच तयारीला लागूं.

( काना छांड बैया०— या चालीवर )

**नच दे दोष कोणी। सुज्ञ उचितपण चित्तीं प्रणयिं न आणी ॥ ध्रु० ॥ किति अजवरि बुध मानी, कुटिल वेष ललनार्जनिं वरिति जनां अवगणुनी, लाज तरि न मी मानीं लव तदनुकरणिं ॥ १ ॥**

( पडदा पडतो. )

---

## अंक दुसरा : : प्रवेश पहिला

( मनोहर व सरस्वती. )

**मनोहर**—( स्वतःशीं ) आनंदरावांनीं सरस्वतीबाईस शिक्षण देण्याचें मजवर सोंपविलें खरें, पण हिच्या वृत्तीवरून हें काम दिवसेंदिवस मला अधिकाधिक बिकट वाटूं लागलें आहे. हिचा स्वभाव जात्याच विलासी असल्यामुळे माझ्या उपदेशाचा पुष्कळदां माझ्या अजमासाहून निराळाच परिणाम होतो.

**सरस्वती**—( एकीकडे ) यांच्या सहवासात मला अनुपम सुख वाटूं लागलें आहे. गुरूविषयीं इतकें प्रेम असल्यावांचून विद्या साध्य होत नाहीं म्हणतात तें खरें असलें पाहिजे. गेल्या चारपाच दिवसात केवळ या प्रेमामुळे मला केती तरी गोष्टी कळूं लागल्या आहेत.

**मनोहर**— सरस्वतीबाई—

**सरस्वती**—मला आता या हांकेला ओ देण्याची लाज वाटूं लागली आहे. मी आपली शिष्यीण ना ?

**मनोहर**— बरें तर; तसें का होईना ! सरस्वति, आज आकाश निबिड मेघाच्छादित झाल्यामुळे काय शोभा दिसत आहे पाहिलीसना ?

( बलमा बहार आई०—या चालीवर )

**जमले जलद पाहीं ! निकषिं रेषा सुवर्णाची तैशी त्यांवरि**
**चपला ही ॥ ध्रु० ॥ चंद्रकळा जरिकांठा तशि घनमाला**
**चपला पाहीं ॥ १ ॥ चंद्रकलेसी लोपवि जणुं खल नाशी**
**निजजन मोहीं ॥ २ ॥**

ही पाहा, कृष्णमेघरूपी राक्षसांची सेना विद्युद्रूपी राळेच्या प्रकाशांत आरोळ्या ठोकीत क्षितिजरूपी पडद्याच्या बाहेर सपाट्यानें पडत आहे. या भूमंडळरूपी कटाहास विद्युद्रूपी कथिलानें विश्वंभर कल्हईच देत आहे असें वाटतें. विजेच्या प्रकाशांत क्षणभर हें जग कल्हई दिल्याप्रमाणे दिसून डोळे दिपून जातात. हे मेघसुद्धा तिजपासून होणाऱ्या धुराप्रमाणेच दिसत आहेत. भूमीवरील असंख्य वृक्षांनींहि वाऱ्यानें प्रेरित होऊन आपल्या सहस्रकरांनीं थैमान मांडलें आहे व सूंसूं असा शब्द चालविला आहे. हा पाहा पर्जन्यहि जोरानें आलाच !

( क्या कमा अबरूने०—या चालीवर )

**मनुजीं या समयीं सारि अहंता लोपे । लघुता थोर चमत्कारिं भरे ती कंपे ॥ध्रु०॥ हा झंझावात गमे श्वास असे ईशाचा । अवनि व्योमासह यद्गतिनें थरकांपे ॥ १ ॥ नास्तिक नर कितिहि असो चपलेपुढती रसना विरमे क्षणिं त्यांची जल्पना घनालापें ॥२ ॥**

**सरस्वती—** मला या काळीं गंभीर विचार सुचण्याऐवजी प्रेमाचे विचार मात्र सुचतात. कारण,

( सावरियाने जियरा लगाये०—या चालीवर )

**पदार्थमात्र करि या प्रेमोपदेश कालीं । परस्परीं प्रसारि घडवोनि विजयशाली ॥ ध्रु० ॥ भिववितसे ही चपला दिपावितसे नयनयुगा । झोंबतसे शीत वात पीडितसे बहु अंगा । गर्जत हे जलद परुष, प्रणयकलहवेगा । शमवीति हीं अकालीं ॥ १ ॥**

निर्जीव सृष्टींतील निष्प्रेम वस्तु जों जों अस्ताव्यस्त स्वरूप धारण करूं लागतात तों तों सजीव सृष्टींतील प्रेमळ हृदयें परस्परांकडे अधिकाधिक आकर्षिलीं जातात.

**मनोहर—**तुझ्या आणि माझ्या कल्पनांत हें जें अंतर दिसून येतें त्याचें कारण माझी विधुरावस्था आणि तुझी विवाहित स्थिति हेंच होय.

( नंनु ब्रोवराधा०— या चालीवर )

**बाह्यसृष्टि भासे । अंतरंग जैसें ॥ विषय एक भावे। भिन्न चित्तदोषें ॥ ध्रु० ॥ चित्त मुकुर नोहे कीं ज्यामाजि विषय बिंबे। उलट विषय दर्पण मन हें क्रांत ज्यांत खासें ॥ १ ॥**

तुझे विचार प्रेमळ पत्नीला शोभण्यासारखेच आहेत.

**सरस्वती—** एकूण माझी सांसारिक स्थिति फार सुखाची आहे असाच आपला ग्रह आहेना ?

**मनोहर—**तो तसा कां नसावा बरें ? आनंदरावांसारखा उंच दर्जाचा व धनवान् पुरुष पति असल्यावर कोणाहि स्त्रीस कुरकुर करण्याला जागा नसावी.

**सरस्वती**–आपण उंच दर्जाची व धनाची फारशी मातब्बरी समजत नाही ो माझी खात्री आहे. कारण त्यांची किंमत आपणाला वाटली असती तर आपण त्याच्यावर लाथ मारून साधुवृत्ति स्वीकारलीच नसती.

**मनोहर**–जी माझी दृष्टि तीव्र स्त्रियांची असली पाहिजे असें तर नाहीना?

**सरस्वती**–पण आपल्या सहवासानें माझी अभिरुचि सामान्य स्त्रियापेक्षा सुधारली असली तर त्यांत नवल नाही.

**मनोहर**–बरें, तुझ्या पतीचें तुझ्यावर निःसीम प्रेम आहे हें तर तूं कबूल करशीलना?

**सरस्वती**–आहे खरें! तें इतकें की मला त्याबद्दल कधी कधी फार वाईट वाटतें.

**मनोहर**–तें कां?

**सरस्वती**–कारण मी त्यांजवर आपणाकडून कितीहि प्रेम केलें तरी त्यांच्या प्रेमाशीं तुलना करितां तें अपुरेंच पडणार. प्रेम ही अशी वस्तु नाही की ती कोणीं आपणाला अर्पण केली म्हणजे उलट त्यासारखीच वस्तु ऋणमोचनादाखल त्याला देतां येईल. कधी कधी दुसऱ्याचें आपणावर प्रेम नसतां आपलें त्याजवर बसतें आणि पुष्कळदा त्याच्या उलट प्रकार होतो. प्रेमाच्या बाजारांत जमेकडील व खर्चाकडील रकमा सारख्या आहेत अशी खातीं फारच थोडीं सांपडतील. कोणत्या तरी बाजूला रकम घालून तोंडमिळवणी करावी लागते. स्त्रीपुरुषांच्या तोंडमिळवणीचा हाच प्रकार आपणांस बहुतेक ठिकाणीं दिसून येईल.

( छंदाच्या चालीवर )

**हें असे प्रणयधन इतर धनाहुनि मोठें। जग मूल्य दिलें तरि मिळे न कवण्या वाटे॥ १ ॥ कुणिं चोरियलें तरि खेद न धनिका वाटे। आनंद मानसीं उलट तयाच्या दाटे ॥ २ ॥ एकाहुनि अधिक न चोर तयाला भेटे। जरि भेटे तरि तें धन समजावें खोटें ॥ ३ ॥ जरि फेड न झाली तरी दुणावे नेटें। परि फेड झालिया मनीं उरे बहु कष्टें ॥ ४ ॥**

**मनोहर**-- सरस्वति, या अपूर्ण जगांत कुठे ना कुठे तरी व्यंग्य हें

आढळायचेंच. म्हणून मनुष्यानें थोडक्यात संतोष मानून आत्मत्याग करण्याची संवय जडवून घेतली पाहिजे. या आत्मत्यागांत किती आनंद आहे याची तुला अजून चांगलीशी कल्पना नाही. ईश्वराच्या दयेनें तू लवकरच माता झालीस म्हणजे तुला आत्मयज्ञाचा ब्रह्मानंद अनुभवण्यास मिळेल. आम्हा पुरुषांना तो आनंद स्त्रियांइतका मिळत नाही हें एक आमचें दुर्भाग्य आहे. आपण कोणत्याहि प्रकारचें प्रेम करायला शिकायचें तें मातृप्रेम कित्याखातर समोर ठेवून शिकलें पाहिजे. अहाहा !

( गोपाल गिरधार०– या चालीवर )

**माता करी प्रीति । निजबालक.वरति । उपमान तिस जगतिं ।**
**कधिं नच मिळे सुदति ॥ ध्रु० ॥ सोशी श्रम अपार । करी**
**परी सदुपकार । संसारीं निःसार । हरि असुख दे शांति ॥१॥**
**जणुं दुजें प्रभुनाम । मातृमानिचें प्रेम । पुरवी सकल काम ।**
**भुवना वितरि भूति ॥ २ ॥**

**सरस्वती**– आपणांला यासंबंधानें एक प्रश्न विचारावासा वाटतो. मात्र तो विचारण्यांत थोडासा अतिप्रसंग होणार आहे.

**मनोहर**— विचार, खुशाल विचार.

**सरस्वती**–आपल्या गतपत्नीपासून आपणाला सुख कितपतसें झालें ?

**मनोहर**– ती रूपानें फारशी सुंदर नव्हती; तसेंच मनाचा अनुदारपणा इत्यादि कांही मानसिक दुर्गुणहि तिच्यांत होते. परंतु आमचें जोडपें एकंदरीत चांगलें सुखी होतें असें म्हणण्यास हरकत नाही. इतकेंच नाही तर तिच्या व्यंगामुळे मला तिची कींव येऊन माझें तिजवरचें प्रेम द्विगुणित होत असे.

**सरस्वती** — आपलें जें जें ऐकावें तें तें अघटितच ! बरें, आपण द्वितीय संबंध कां नाही केला ? आपल्या जागीं दुसरा कोणी असता तर त्यानें रूपवान् व अनुरूप पत्नीबद्दलची आपली हौस दुसऱ्या लग्नांत तरी फेडून घेतली असती.

**मनोहर**— बरा प्रश्न विचारलास. मला माझ्या पत्नीबद्दल प्रेम आणि जी दया वाटत असे ती हळू हळू पसरत जाऊन शेवटीं प्रत्येक अनाथ प्राण्याबद्दल त्या मनोवृत्ति उचंबळूं लागल्या ! पत्नीच्या मरणानंतर माझ्या प्रेमाला एक व्यक्ति पुरेनाशी होऊन माझें सर्व जगावर प्रेम जडलें. संसारापासून परमार्थाचा

लाभ होतो असें म्हणतात, त्याची ही पहिली पायरीच मी समजतों. माझी अशी प्रेममय वृत्ति झाल्यामुळे कधी कधी लोक अगदी जवळच्या आप्तांशींसुद्धा निष्ठुरतेनें वागतांना मी पहातों तेव्हा मला साश्चर्य विषाद वाटतो.

**सरस्वती**— ( एकीकडे ) माझें चंद्रिकेशीं जे वर्तन असतें त्यावर तर हा टोमणा नसेल ना ? ( उघड ) कधी कधी आपला अशा माणसाशीं प्रसंग पडतो की तें माणुस आपली गांठ पडल्याक्षणापासून आपला द्वेष करूं लागतें. असें झाल्यास त्यात आपला काय दोष आहे ?

**मनोहर**— आपण प्रेम ठेवीत गेलें म्हणजे दुसऱ्याचा द्वेष किती वेळ टिकणार ? मात्र आपलें प्रेम अंतःकरणापासून असलें पाहिजे.

**सरस्वती**— तर मग आपण प्रेम केलें म्हणजे दुसऱ्याच्याहि मनात तोच भाव उत्पन्न होतो असें आपलें म्हणणें ?

**मनोहर**— यांत काय संशय ?

( शामरे मोरि बयां०— या चालीवर )

**प्रेम हो परिं निजानुरागें । दृढानुरागें कदा न भंगे ॥ ध्रु० ॥ कोणि दिसेना विशाल भुवनीं परुष न रंगे जो प्रेमरंगें ॥ १ ॥**

मनुष्यामध्ये असें असतें यांत नवल नाही. पण निर्जीव सृष्टींतहि हाच प्रकार दिसून येतो.

( दिंडि. )

**चंद्र दूरस्थहि पसरि निजकरांसी । दृढालिंगन सागरा द्यावयासी ॥ गहनवृत्ति तदा अमधुरांतरात्मा । वीचिकर वरि करि दावि निज प्रेमा ॥ १ ॥**

**सरस्वती**—(एकीकडे) अहाहा ! हें ऐकून माझ्या वृत्ति उचंबळूं लागल्या !

( मारा तनमा मनमा०— या चालीवर )

**हें श्रवण करुनि वचन तरल हृदय भरुनि येई। गहन सौख्यजलधिंत मन सकल बुडुनि जाई ॥ ध्रु० ॥ प्राण येति उडुनि वरी शिकविति जणुं हे । कंठिं लग्न व्हावया प्रियाप्रति लवलाही ॥ १ ॥**

(उघड) आपलें बोधामृत ऐकतांना मी तन्मय होऊन जातें. महाराज, आपल्या उपदेशाप्रमाणे शब्दशः चालणें हें या जन्मीं तर अशक्यच दिसतें. पण त्याप्रमाणे वागण्याचा मजकडून अल्प प्रयत्न जरी झाला तरी मी स्वतःस धन्य समजेन,

**मनोहर**–ईश्वर तुला निश्चयाचें बल देवो ! सरस्वति, आता आपलें संभाषण आपणाला आटपतें घेतलें पाहिजे. कारण या पाहा ! पावसाच्या सरींवर सरी कोसळूं लागून त्याच्या तारस्वरात आपला आवाज एकमेकांस ऐकूंहि येईनासा झाला आहे.

**सरस्वती**–प्रेमळ मनुष्यांस नुस्त्या डोळयांनींहि संभाषण करितां येतें. तरी पण आता जेवणाचीहि वेळ झाली तेव्हा आपला निरोप घेतला पाहिजे.

**मनोहर**–मलाहि माझ्या आश्रमाची वाट धरिली पाहिजे.

**सरस्वती**– अशा पावसात ?

**मनोहर**– अंगीं काटकपणा आणण्यास यासारखा चांगला मार्ग सांपडणार नाही. ( निघून जातो. )

**सरस्वती**–अहाहा ! खिडकींतून पावसाचे तुषार आंत येऊन अंग ओलें-चिंब करीत आहेत.

( कोऊ मन भावन० - या चालीवर )

**सुखविति किती शीत अनंत हे व्याकुल शरीरा तुषार ॥ शम-**
**विति सुबोधामृतबिंदु ते तप्त हृदयातें अपार ॥ १ ॥** (जाते )

---

## प्रवेश २ रा

### ( मनोहर व तरंगिणी. )

**तरंगिणी**–तर काय चकोर येऊन इतके दिवस झाले ? आणि मला अजून भेटला नाही ?

**मनोहर**–तरंगिणी, तो येथे आला आहे हें विहारानें तरी तुला सांगितलें का ?

**तरंगिणी**–नाही खरें.पण कामाच्या गडबडीमुळे राहिलें असेल सांगायचें.

**मनोहर**–तूं आपल्या नवऱ्याची तरफदारी कर पाहिजे तर. पण न सांगण्याचें कारण निराळेंच आहे.

**तरंगिणी**– तें कोणतें ?

**मनोहर**—अग, चकोरावर हल्ली ग्रामण्य करण्याचें कारस्थान चाललें आहे.

**तरंगिणी**— हें कांही बाई माझ्या गांवींहि नव्हतें.

**मनोहर**—त्या ग्रामण्याचा पुढारी विहारच आहे. हें सगळें समजून उमजून चकोरानें या घरीं पाय टाकावा तरी कसा? मला जरी विहारानें येथे येण्याची परवानगी ठेविली आहे तरी मीसुद्धा तो घरीं नाही हें पाहून चोरट्यासारखा आलों आहें.

**तरंगिणी**— दादा, तुला माहित नाही तिकडचा स्वभाव किती प्रेमळ आहे तो. आपल्या घरीं आलेल्यांचा आदरसत्कार असा त्यानींच करावा. तूं त्यांच्या-देखत जेव्हा येतोस तेव्हा तुझ्या बहुमानांत कांही अंतर तुला दिसून येतें का? आता येवढें खरें की मनांत फेर असल्यामुळे दोघाचीं अंतःकरणें मात्र एक-मेकाविषयी असावीं तशीं शुद्ध नाहीत.

**मनोहर**— मतभेदाची मजल कोठवर न्यायची याचा कांही विचार? मला त्यानें आपलें घर यायला जायला मोकळें ठेविलें आहे, तसा माझा आश्रम तुला मोकळा ठेविला आहे का? त्या बिचाऱ्या विधवांनीं असें काय पाप केलें आहे? मनुष्याचा प्रथम प्रथम एखाद्या गोष्टीविषयी दुराग्रह असतो पण ती समक्ष पाहिल्यावर तो नाहीसा जरी झाला नाही तरी त्याची तीव्रता कमी होते.

**तरंगिणी**— मी किती वेळां तरी त्यांच्या मागे लागलें असेन तुझा आश्रम दाखविण्याकरिता. पण त्यांनीं दर खेपेस कोणतीना कोणती तरी अडचण पुढे करावी. पहिल्यानें तर त्यांना विधवांनीं केस ठेविलेलेहि खपत नसत. पण आमच्या बिचाऱ्या वन्संचें हें असें झाल्यापासून त्या गोष्टीपुरतें बरीक त्यांनीं अलीकडे आपलें म्हणणें माघारी घेतलें आहे.

**मनोहर**— स्वतःवर प्रसंग आला म्हणजे अभिमान आणि दुराग्रह गळून जातात.

**तरंगिणी**—हल्ली त्या मेल्या हरिहरशास्त्र्याचा जरी त्यांच्यामागे याबद्दल गेल्या पंधरा दिवसांपासून लकडा आहे तरी त्यांचा निश्चय अणुभरहि ढळला नाही.

**मनोहर**— हा हरिहरशास्त्री कोण? अलीकडे दुसऱ्यानें त्याचें नांव ऐकिलें.

**तरंगिणी**—- आहे असाच एक नामधारी शास्त्री! मोठा पाताळयंत्री आणि सुतानें स्वर्गाला जाणारा दिसतो.

**मनोहर**— अशीं माणसें एखाद्या दिवशीं एखाद्या लचांडात सांपडून खरो-खरच सुखानें स्वर्गाला जातात. या शास्त्र्याचें आनंदरावांच्या घरीं जाणें येणें आहे का ?

**तरंगिणी**— आहे, पण अजून फारसा घरोबा नाहीं.

**मनोहर**— त्याला अलीकडे त्यांनीं घरांत पुराण सांगण्याकरितां ठेविलें आहे.

**तरंगिणी**— अगबाई ! ही घराला घूसच लागली म्हणावयाची ! काल मी त्याच्याबद्दल काही भलत्याच गोष्टी ऐकिल्या.

**मनोहर**— तूं स्वस्थ ऐस. मी त्याला काढण्याची आजच व्यवस्था करितों.

**तरंगिणी**— आमच्याहि घरून त्याची उचलबांगडी केली पाहिजे. पण तिकडचा स्वभाव किती भोळा आहे हें तुला ठाऊकच आहे. त्यांना चांगला प्रत्यय आल्यावांचून ते त्याला दूर करणार नाहीत. अगबाई ! येणें झालें वाटतें घरीं ! बरोबर तो शास्त्रीहि आहे.

**मनोहर**— मग मी सुद्धा तुझा निरोप घेतों. ( जातात. )

---

## प्रवेश ३ रा

### ( विहार व हरिहरशास्त्री )

**हरिहर**— दादासाहेब, आपल्यासारखे धर्मात्मे आज आमच्यांत आहेत म्हणून कांहीं तरी निभाव लागतो आहे. आजच्या पुनर्विवाहाच्या सभेंत जर आपण धर्माची कड घेऊन बोलला नसतां तर त्याची कांहीं धडगत नव्हती. काय तो आपला धर्माभिमान व आवेश !

**विहार**—( हसून ) मला लहानपणापासून जरा धर्मवेड आहे खरें.

**हरिहर**—अहो, याला वेड कोण म्हणेल ? हें जर वेड तर मग शहाणपणा कोणता ? आपल्या अंगीं लीनपणा फार, दुसरें काय ? तसेंच आपलें वक्तृत्व पाहून तर मी आज थक्कच होऊन गेलों. बोलण्यांत निर्भीडपणा तरी किती !

**विहार**— धर्मवेडाबरोबर माझ्या अंगीं फटकळपणाचाहि दोष आहे हें मी कबूल करितों. आणि मुत्सद्दीपणाचा गुण तर माझ्या अंगीं कसा म्हणतां कसा तो नाहींच !

**हरिहर**—पुन्हा तेंच ! अहो, असा फटकळपणा नाही आणि मुत्सद्दीपणा आहे म्हणूनच आमच्या देशाचें आज हंसें होण्याची वेळ आली आहे. असे सद्गुण अंगीं असून ते दुर्गुण समजण्याइतकी लीनता दुसरीकडे कुठे सांपडायची नाही.

**विहार**—बरें, घटकाभर हे सद्गुण धरून चाललों तरी ते जाणण्याइतके तुमच्यासारखे रसिक पाहिजेत ना ?

**हरिहर**— कसचें ! कसचें ! मी आपला सामान्य मनुष्य. आपल्यासारख्यांच्या सहवासानें जरा कांही कळतें इतकेंच. बाकी, आपणाखेरीज इतरांना मी सहसा दाद देण्यासारखा नाही.

**विहार**— नाही खरेंच ! आज त्या सुधारक शास्त्र्यांचीं तोंडें कशीं तुम्हीं क्षणांत बंद करून टाकलीं ! पति शब्दाचा अर्थ जो तुम्ही बेमालूम फिरवून टाकलात त्यामुळे तर फारच बहार झाली !

**हरिहर**—हा सगळा आपल्या पायांचा प्रभाव ! तरी पण आपण जें बोललांत की, 'पुरुषहि एक बायको मेली असतां आजन्म व्रतस्थ राहूं शकेल; मग विधवांनींच कां नये राहूं ?' त्यानें माझ्या भाषणावरहि ताण केली.

**विहार**—माझा या मुद्द्यावरच जोर होता याचें कारण आपले इतर मुद्दे जरा लटपटीचे होते. पुनर्विवाहास जुन्या ग्रंथात शास्त्राधार आहे हें आपणहि कबूल केलेंच पाहिजे. तुमची पतिशब्दावरील कोटी म्हणजे शब्दच्छलच म्हणावयाचा. येथे आपण दोघेच आहोंत. खरें सांगा मी म्हणतों तसेंच तुम्हाला वाटतें ना ?

**हरिहर**—मनांतून मलाहि तो वितंडवादच वाटतो. कारण पालकालाच पति म्हटल्यावर प्रत्येक कुटुंबाचा अधिपति आपल्या मुलींचा, सुनांचा, बहिणींचा पतीच होऊं लागेल. पण आणीबाणीच्या वेळीं अशाच कोट्या पुढे करून आणि त्यांचा कमीपणा चर्येनें व हावभावांनीं भरून काढून विजय मिळविला पाहिजे. मघाशीं मी सभेंत भाषण करितांना रागाचा कसा आविर्भाव आणिला होता पाहिलातना ? डोळे फाडून, नाक फेंदारून चेहरा असा बदलून टाकिला की सुधारक भेदरूनच गेले. असें सोंग प्रसंगीं आणावें लागतें.

**विहार**—आता तुम्हीच होऊन ज्या अर्थी इतक्या मोकळ्या मनानें बोलत आहांत त्या अर्थी मी सुद्धा आपल्या भाषणांतील कांही खुब्या तुम्हांला सांगून ठेवितों. मी भाषण सुरू केल्यावर दोनचार वाक्यांत जर श्रोत्यांच्या टाळ्या पडल्या नाहीत तर हलके हलके मायदेश, आर्यभूमि, सुवर्णभूमि, सनातन-

धर्म हे शब्द वाक्यांत आणूं लागतों; म्हणजे टाळयाचे गजर सुरू झालेच म्हणून समजावें. एखादे वेळीं कानटळया बसविणाऱ्या टाळया मिळवाव्याशा वाटल्या तर शिवाजीमहाराजांचें नाव घ्यावें लागतें. त्या महात्म्यास याप्रमाणे वेठीस धरण्याचें माझ्या जिवावर येतें; आणि त्याचें नांव उठल्या-बसल्या उच्चारल्यानें त्यांजविषयींचा पूज्यभावहि कमी होतो. पण मग आपल्या भाषणास टाळ्या कशा मिळाव्या ? त्या महात्म्यानें जिवंतपणी जसे आपल्या देशावर अगणित उपकार केले त्याप्रमाणे आपल्या पश्चात् सुद्धा आम्हांसारख्या वक्त्यांना टाळ्या मिळवून देऊन त्यानें आपले उपकार चालू ठेविलेच आहेत.

**हरिहर**–शिवाजीमहाराजांचा वारंवार नामोच्चार केल्याचें आपणाला जितकें वाईट वाटतें तितकें वास्तविक पाहात। वाटावयास नको. ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी, हा शिरस्ताच आहे. मग शिवाजीमहाराजांसारख्या अन्नदात्यांची टाळी श्रोत्यांकडून वाजविण्यांतच चुकतें कोठे ? बरें, तें असो. तूर्त आपणाला प्रस्तुत कामाचाच विचार केला पाहिजे. चकोर परदेशाहून परत आला त्याबद्दल त्याजवर ग्रामण्य करण्याचें ठरलें ना मग ?

**विहार**–आता काय ठरायचें राहिलें आहे त्यांत ? जाहीरसभेबद्दल जाहिरातही फिरली.

**हरिहर**–पण हें वर्तमान वहिनीसाहेबांना मात्र कळतां नाही उपयोगी बरें.

**विहर**–ऊंः ! कळलें म्हणून काय होणार आहे ? मी कांहीं असा कच्च्या मातीचा घडलेला नाहीं. सुधारक लोक बायकांना पुढें करून आपण घेतलेल्या शपथा मोडतात. तसेंच आपणाहि करूं लागलों तर त्यांना हंसण्याचा आपणांला काय अधिकार राहिला ?

**हरिहर**– ग्रामण्याबद्दल जसा आपला ठाम निश्चय झाला आहे, तसा एकदा वपनाबद्दल झाला असता म्हणजे बरें झालें असतें. चकोर आल्यामुळे तर चंद्रिकेस तशी ठेवण्यापासून एक नवीनच भय उपस्थित झालें आहे. माझीं इतर कारणे राहिलीं बाजूला, पण निदान या कारणाकडे आपण लक्ष्य पुरवावें. हें त्यांच्यापेक्षाही सबळ आहे.

**विहार**–म्हणजे तींसुद्धा सबळच आहेत असें तुमचें म्हणणें ?

**हरिहर**–आपण पोक्त विचार केल्यास त्याच्या सबळतेबद्दल आपलीहि

खात्री होईल. पति मृत झाल्यावर पत्नीनें डोक्यावर केस ठेविले तर तो नरकांत कुचंबत रहातो असें शास्त्रवचन आहे.

**विहार**–ही नुस्ती पोरांना सांगण्याची गोष्ट झाली. सुशिक्षित समाजांतील लोक अशा थापांनीं थोडेच फसणार आहेत ! शिवाय यास अनुकूल शास्त्रवचन आहे तसें निषेधार्थीहि आहे. तुमच्या शास्त्रवचनाप्रमाणे ईश्वर फारच न्यायी म्हटला पाहिजे की अति पुण्यवान् पुरुषासमुद्धा त्याच्या विधवेच्या मस्तकावर एखादा केंस दिसल्याबरोबर त्यानें स्वर्गांत प्रवेश करण्याला मज्जाव करावा ! तो केस म्हणजे स्वर्गद्वाराचा अडसरच म्हणावयाचा !

**हरिहर**–बरें, तें राहूंद्या. विधवांना विद्रूप केल्यानें त्यांची नीति सुधारते हें तर आपण कबूल कराल ?

**विहार**–तिला नापिकाबरोबर घटका घटका कोंडून ठेविल्यानें तिची नीति कितपत सुधारणार तें दिसतेंच आहे ! आणि ती सुधारली असें घटकाभर धरून चाललों तरी अशा जबरीच्या नीतिमत्तेंत प्रौढी ती काय राहिली ? उद्या मी तुमचें नाक कापलें तर तुमच्याकडे कोणी तरी ढुंकून पाहील का ? नाही. पण तेवढ्यानें तुम्ही शुकाचार्य बनलां असें कसें म्हणतां येईल ? म्हणतां आलें तर प्रत्येक वृद्धानारीस पतिव्रता का म्हणूं नये ?

**हरिहर**–तर काय, आपला निश्चय कधीहि फिरायचा नाही ?

**विहार**–कल्पांतीहि नाही फिरायचा. मग चंद्रिकेच्या केसामुळे तो थेरडा जरी नरकात कुचंबत पडला तरी मला चालेल ! मी येथे नाही अशी संधि साधून, नीचानें लग्न उरकून घेतलें त्याबद्दल त्याला कांही शिक्षा पाहिजेच की नाही ?

**हरिहर**–हं, वहिनीसाहेब आल्या !

**तरंगिणी**–( प्रवेश करून ) हें काय ऐकतें मी आज ! माझ्या चकोरावर म्हणे ग्रामण्य होणार ?

**विहार**–तूं आमचें बोलणें आडून ऐकतेस कीं नाही हें पहाण्याकरिता मी शास्त्रीबुवाजवळ उगीच मौजेनें तसें बोलून गेलों.

**तरंगिणी**–ऐकायलाच कशाला पाहिजे ? वर्तमानपत्रांतूनसुद्धा आलें; आता ग्रामण्य होण्याला काय बाकी राहिली आहे ?

**विहार**–मी एकूणएक वर्तमानपत्रें बंद केलीं असतां कोणत्या हरामखोरानें

तुला वर्तमानपत्र आणून दिलें ? आज पांच दिवस बाहेर पडतांना माझ्या वाचावयाच्या खोलीला मी कुलूपसुद्धा लावून जात होतों. इतका कडेकोट बंदोबस्त केला असतां तुझ्या हातीं वर्तमानपत्र येतें म्हणजे नवल नाहीं का !

**तरंगिणी**–सरकार वर्तमानपत्रांच्या तोंडांना कुलूप लावितें तेव्हा चोहों-कडून एकच हांकाटी होते. आणि आपण बरीक तीं खुशाल कुलुपांत ठेवावीं ना?

**विहार**–( जवळ जाऊन ) सांग बरें तुझ्या हातीं पत्र कसें लागलें तें ?

**तरंगिणी**–मघाशीं वाण्याकडून साखरेचा पुडा आणविला; आणि तो फोडून पहातें तों साखरेभोंवताली गुंडाळलेल्या कागदांतून ही विषापेक्षाहि कडूजहर बातमी दिसून आली.

**हरिहर**–ठीकच आहे ! वैद्यलोक कडू गोळ्या शर्करावगुंठित करून विकतात आणि वाणी शर्करा कटुपदार्थावगुंठित करून विकतात.

**तरंगिणी**–या ग्रामण्याचे पुरस्कर्ते आपणच आहांत वाटतें ?

**विहार**–चांगली गोष्ट करायला कोणाची भीति आहे ?

**तरंगिणी**–हें ग्रामण्य चांगलें कसें तें मी नाहीं समजलें.

**हरिहर**–आपल्या देशाची सीमा ओलांडल्याबद्दल शास्त्रांत प्रायश्चित्त आहे.

**विहार**–त्या शास्त्राची नाहीं मी पर्वा करीत ! कूपमंडुकाप्रमाणे देशांतल्या देशांत बसून रहाण्याचे ते दिवस गेले. आता देशाचा अभ्युदय करायचा असेल तर देशांतर करून कला व शास्त्रें संपादन केलीं पाहिजेत.

**तरंगिणी**–मग आता हरकत कुठं राहिली ?

**विहार**–जे आपले लोक विद्यार्जनाकरिता परदेशीं जातात ते तिकडे आपल्या चालीरीति व भाषा विसरून आणि परकीय शिकून परत येतात; यामुळे देशाचें फार नुकसान होतें.

**तरंगिणी**–माझा चकोर कधीं नाहीं असे वेडेचार करणार !

**विहार**–आतापर्यंत तूं ग्रामण्य करण्याचीं धार्मिक आणि सामाजिक कारणें ऐकलींस. त्यांच्या जोडीला एक खाजगी कारणहि आहे.

**तरंगिणी**–कळूं द्या कोणतें तें.

**विहार**–चकोर परदेशीं जाण्यापूर्वी चंद्रिकेचें आणि त्याचें लग्न करण्याचें ठरलें होतें; आठवतें का तुला ?

**तरंगिणी**–हो. पण त्याचें काय राहिलें आता ? दुष्ट दैवानें मध्येच बिब्बा

घालून आणि दुसऱ्याशींच लग्न घडवून, त्याही लग्नाचें एकच फळ म्हणजे वैधव्य हल्लीं बाकी ठेविलें आहे.

**विहार**—चकोर येथे परत आल्यापासून हें साद्यंत वर्तमान ऐकून कसा बावरल्यासारखा झाला आहे. आणि त्याचा चंद्रिकेशीं पुनर्विवाह करण्याचा मानस आहे असेंहि ऐकतों. तेव्हा त्यास बहिष्कार घातला म्हणजे वैतागून जाऊन तो हा नाद खास सोडून देईल.

**तरंगिणी**—जो पुनर्विवाह करण्याला सरसावणार तो बहिष्काराला फारच भीक घालणार आहे ! बहिष्काराचा झालाच तर उलट मात्र परिणाम होईल. म्हणजे चकोर हट्टाला पेटून वन्सेशीं हटकून लग्न लावील. ते दोन्ही भाऊ आपणांला अजून माहित नाहीत.

( नव यौवन सुंदरता ही०—या चालीवर )

**ते बंधु निश्चयी दोघे । झगडती संकटांसंगें ॥ करिताति झटुनियां अंगें । विपदेसि संपदा वेगें ॥ तद्धैर्य कधींहि न भंगे । धृति जनिं ये तत्संसर्गें ॥ ( चाल ) विपत्ति गणुनी साहस-शाला । आदरिती प्रेमें ते तिजला । तन्मति भीति न घे ॥१॥**

दादानें आपला आश्रम काढिला तेव्हा त्याला थोडीं का विघ्नें आलीं ? पण त्यानीं त्याचा उत्साह दुणावून शेवटीं त्यानें खासें यश मिळविलें.

**हरिहर**—त्यांना यश कसें मिळतें कुणास ठाऊक ! कारण त्यानीं कोण-ताहि बेत केला तरी तो अमलांत येण्यापूर्वी त्यांना शेंकडों विधवांचीं अप-शकुनी तोंडें दिसावयाचीं !

**विहार**—तूं म्हणतेस तसाहि परिणाम कदाचित् होईल. नाही कोणी म्हणावें! पण म्हणून असे तर्कवितर्क काढून प्रयत्न कां सोडून द्यावा ? शिवाय चकोर एकदा पतित झाला म्हणजे आमची चंद्रिकाहि त्याजकडे पाहाणार नाही.

**तरंगिणी**—चंद्रिकेचेंच कशाला हवें ? चकोर पतित झाला तर माझे सुद्धा प्राण राहाणार नाहीत. मी एकदा नाहीशी झालें म्हणजे मग आपण वाटेल तशीं ग्रामण्यें काढीत सुटावें. चकोरानंतर वन्संवर केसांबद्दल ग्रामण्य काढावें. तिच्यानंतर धाकट्या वन्संवर. या आपल्या खटपटीवरून असें दिसतें कीं,

( जो पिया आयेना०- या चालीवर )

**अपुल्या दृष्टिसी। झालें बाई अलीकडे नको अशी ।। रति कैशी। अतांशी । न दासीविशीं ।। ध्रु० ।। नाचि शोभेशि करावी आपणां दुजि नारी । उपजे त्रास मनीं मजविषयीं जरि भारी ।। १ ।।**

**विहार**—

**त्रासेन कसा स्वासुसि विग्रहधारी। भेदिसि शरसम योजुनियां हीं सारीं।। वचनें ऐशीं । नच शोभतशीं। मृदु विश्वासी ।। २ ।।**

**तरंगिणी**—पुरुषांना काय ? एक बायको मेली तर दुसरी, दुसरी मेली तर तिसरी, हव्या तितक्या करितां येतात. इतकेंच नाही तर एकदम चार चार केल्या तरी कोणाला हात धरिता यावयाचा नाही.

**विहार**—पण मी अशा नराधमांपैकीं आहें असें का तुला वाटतें ?

( मानीं आम्ररूपखाणी०- या चालीवर )

**शंका । घेसि घोर ही कां ।। प्रीति कशी मम सिद्ध करावी घालवुं केवीं । संशयपंका ।। ध्रु० ।। विधुर कदा नच होवों जन्मीं। झालों जरि दुर्दैवें तरि मी । लावि न कधिं शपथेसि कलंका ।। १ ।।**

यांत मी बढाई मारतों असा मुळीच प्रकार नाही. कारण कोणत्याहि पुरुषाला हें साध्य आहे असें माझें मत आहे. आणि याच मुद्द्यावर मी आज सभेंत पुनर्विवाहाचें खंडन केलें.

**तरंगिणी**— त्या सभेचें तूर्त राहूं द्यायचें होतें आणि ग्रामण्याच्या सभेचें काय करणार तें सांगायचें होतें. कारण तिचा कांही तरी माझ्या मनाजोगा निकाल झाल्यावाचून माझी आपल्या प्रेमाबद्दल कधी खात्री व्हायची नाही.

**विहार**—शहरांत जाहिरात फिरली आहे. तेव्हा आता सभा करणें न करणें माझ्या हातीं राहिलें नाही. धनुष्यांतून बाण निघून गेला. तो सुटण्यापूर्वी जर तूं मला सांगितलें असतेंस तर निराळी गोष्ट होती.

**तरंगिणी**—आपण कड्याकुलुपें लावून मला सुगावाहि न लावण्याची तजवीज केल्यावर मला त्याचें स्वप्न पडावें कीं काय ? शिवाय जाहिरात म्हणजे

कांहीं लल्लाटींची रेषा नव्हे. दुसरी जाहिरात काढून ती रद्द करितां येण्यासारखी आहे.

**विहार**–सारें खरें; पण सभा तहकूब ठेवण्याला कारण कोणतें लावायचें ?

**तरंगिणी**–सुधारकांवर प्रसंग आले असतां ते कशा एक एक सबबी पुढे आणितात ! त्यांपैकीच एखादी काढा झालें !

**विहार**–माझें कपाळ दुखतें म्हणून कळवूं ?

**तरंगिणी**– कांहीं वाईट नाहीं. आणि ही सबब खरी ठरावी म्हणून मी पाहिजे तर संध्याकाळपर्यंत आपल्यापाशीच बसून कानीं कपाळीं कटकट करितें म्हणजे डोकें खरोखरीच दुखूं लागेल !

**विहार**–वाः ! पसंत पसंत !

**तरंगिणी**– पण अशानें सभा कशी बंद पडणार ? हे नसले तर दुसरा कोणी नाहीं का चालविणार काम ?

**हरिहर**– वहिनीसाहेब, दादासाहेब येथील समाजाचा केवळ आत्मा आहेत. त्यांच्यावांचून कांहींहि हलावयाची नाहीं. शिवाय दुसरेंहि कारण पाहिजे असेल तर असें दाखवावें की ग्रामण्याला जितकें शास्त्रवचनाचें साहित्य पाहिजे तितकें अजून गोळा झालें नाहीं; म्हणजे झालें.

**विहार**–ठीक ! ठीक ! असेंच लिहावयाचें ! चला तर. (तरंगिणी जाते.)

**हरिहर**–मला वाटलेंच होतें कीं वहिनीसाहेब आपला बेत हाणून पाडतील म्हणून. बाकी त्यांच्या तंत्रानें चालण्यांत कांहीं गैर नाहीं म्हणा. यावरून आपलें त्यांच्यावरचें प्रेम चांगलें दिसून येतें.

**विहार**–हें पहा, कधी कधी अशी पड घेतलीच पाहिजे. त्याशिवाय हा संसार चालायचा कसा ? ( एकीकडे ) एकदा याची माझ्या आग्रही स्वभावाबद्दल खात्री केली पाहिजे. नाहीतर हे माझीहि गणना बाईलबुद्ध्यांतच करावयास लागायचे ! ( जातात. )

---

## प्रवेश ४ था

### ( वेणूबाई )

**वेणू**–( स्वतःशीं ) मला येथे पहाऱ्याचें काम करायला सांगून तो मांग साहेबांना पुराण सांगायला आंत गेला. आम्हां बायकांचें एकदा वाकडें

पाऊल पडलें की पडलेंच ! फुटलेली कांचसुद्धा एकवेळ जोडतां येईल; पण बायकांची अब्रू गेली म्हणजे परत येत नाही. नंतर त्यांच्या कपाळीं प्रथम राखपण आणि मग कुंटणपण ठेविलेलेंच असावयाचें ! प्रथम आपलें तारुण्य लुटूं देऊन नंतर दुसऱ्यांचें तारुण्य बिघडवायचें ! नकोग बाई ! हा विचार-सुद्धा नको ! वेणे, हा विचार तुझ्या मागे जन्मभर लागला आहे तो कुठचा इतक्यांत सुटायला ? असो; या मांगापासून जरा लांबच बसूं या. म्हणजे त्याचें नीच पुराण तरी कानीं पडायला नको. ( जाते. )

---

## प्रवेश ५ वा

### ( सरस्वती व हरिहरशास्त्री )

**हरिहर**—याप्रमाणें गोपींना स्नान करितांना पाहून त्या सर्वजणींचीं वस्त्रें घेऊन गोपालकृष्ण कदंबाच्या झाडावर जाऊन बसले व तेथून मुरली वाजवूं लागले. गोपींना अत्यंत प्रिय असलेला वेणुध्वनि कानीं पडताच त्या घाई-घाईनें यमुनातीरावर येऊन आपलीं वस्त्रें पाहूं लागल्या; परंतु तीं सापडेनात. शेवटीं त्यानीं करुणस्वरानें गोपालकृष्णाची विनवणी केली कीं, ‘ कृष्णा, आम्ही तुला शरण आलों आहोंत; तर आमचीं वस्त्रें आम्हांला परत दे, व आमच्या लज्जेचें रक्षण कर ’ कृष्णांनीं उत्तर दिलें ‘ अहो, गोपींनो, तुमचें कात्यायनव्रत चाललें असतांना तुम्हीं नग्न स्थितींत स्नान करून महापातक केलें आहे. तर त्याचें क्षालन करण्याकरिता दोन्ही हात वर करून तीनदा नमस्कार करा. ’

**सरस्वती**—शास्त्रीबुवा, एका निर्लज्ज कृत्याचें क्षालन दुसऱ्या त्याहून निर्लज्ज कृत्यानें कसें होणार !

**हरिहर**—याचें उत्तर मी एका दृष्टान्तानें देतों. माझा एक स्नेही असे, त्याला धूम्रपानाचें फार व्यसन ! त्यानें कुठे असें ऐकिलें कीं एक व्यसन सुटावें अशी इच्छा असल्यास दुसरें जडवून घ्यावें. त्याप्रमाणें त्यानें धूम्र-पानाचें व्यसन सुटण्याकरितां मदिराबाईचें आराधन केलें. तिच्या प्रसादानें त्याचें पहिलें व्यसन खरोखरीच सुटलें. मात्र मद्यपानाचें इतकें जडलें की त्यांतच त्याचा अंत झाला.

**सरस्वती**–( हंसून ) असाच कांहीसा प्रकार गोपींचा झाला खरा !

**हरिहर**–( एकीकडे ) आज बाईसाहेब प्रसन्न दिसत आहेत ! ( उघड ) गोपालकृष्णांनींहि नग्नस्थितींत स्नान केल्याचा दोष त्याच स्थितींत वंदन केल्यानें, व तो दोष त्याच्याहि पलीकडच्या प्रकारांनीं धुवून टाकिला. त्याचें भागवतांत फारच सुरस वर्णन केलें आहे.

**सरस्वती**— भगवान् श्रीकृष्णांनीं असे प्रकार केले असतील हें मला खरें वाटत नाहीं.

( चाहे बोलो या न बोलो ०– या चालीवर )

**श्रीकृष्ण तो परमात्मा । करि काय निंद्य कर्मा ॥ सुचली ही पुण्यधामा । मति केविं त्यासी वामा ॥ ध्रु० ॥ परमादरें यदुवीरीं । विश्वासिती व्रजनारी । वंचील का त्या रामा ॥ १ ॥ मालिन्य हें जयाचें । संहरण महादुरितांचें । का संभवे तन्नामा ॥ २ ॥**

या कथांचा जो वर वर अर्थ दिसतो त्यापेक्षा निराळा गूढ अर्थ त्यांत असला पाहिजे.

**हरिहर**— पुष्कळ विद्वानांनीं तसा अर्थ बसविण्याचा खटाटोप केला आहे. पण तो समर्पक असा बसलाहि नाहीं, आणि त्यापासून रसिकाच्या चित्ताला तितका आनंदहि होत नाहीं.

**सरस्वती**— शृंगाररसाच्या भोक्त्यांना वैराग्यपर अर्थ कसा रुचणार ?

**हरिहर**— आपण अगदीं माझ्या मनांतलेंच बोललांत.

**सरस्वती**— बरें, आपलाच अर्थ खरा धरून चाललें म्हणजे मग भगवंताची महापातकाच्या दोषापासून मुक्तता कशी करावयाची ?

**हरिहर**— दोष असेल तर मुक्तता कीं नाहीं ? भक्त भगवंताशीं रममाण झाला तर त्यांत उलट पुण्यच आहे. वेदांताचें पर्यवसानसुद्धा जीवात्मा व परमात्मा याचें ऐक्य होण्यांतच आहे.

**सरस्वती**— पण तें ऐक्य आत्मिक असतें.

**हरिहर**— आणि शारीरिक नसतें असेंच म्हणणें कीं नाहीं आपलें ? परतु

याला उत्तर सोपें आहे. आत्मिक ऐक्य ही सर्वांत वरची पायरी आहे. ही प्राप्त करून घेणें मोठमोठ्यांनासुद्धा साधत नाही. म्हणून शारीरिक ऐक्याची जी सर्वांत खालची पायरी तिजपासून ज्ञात्यानें सुरुवात केली पाहिजे.

**सरस्वती**— ऐकावें तें नवलच ! तर मग स्त्रियांचें वाईट मार्गी पाऊल पडण्यांत कांहीच दोष नाही म्हणतां ?

**हरिहर**—असें नाही म्हटलें मीं. माझें म्हणणें इतकेंच की गुरूशीं संबंध केला असतां तो पापाचरणाखाली येत नाही. आपल्याच हिंदुस्थानांत अशा कांही जाती आहेत की त्यांमध्ये असा संबंध पुण्यकारक समजतात.

**सरस्वती**— हेंहि मला माहित नव्हतें. बरें, गुरु म्हणजे कोण ?

**हरिहर**— गुरु म्हणजे धर्माचा उपदेष्टा. विद्येचा दाता असाही अर्थ त्यापासून निघूं शकेल.

**सरस्वती**— चंद्र गुरुपत्नीशीं रममाण झाल्यामुळे त्यास शाप मिळालेला मीं ऐकिला होता. पण शिष्यीण गुरूशीं रममाण होऊन पुण्य संपादन करिते हें मी आजच पाहिल्यानें ऐकतें.

**हरिहर**— आपलें आजपर्यंतचें ज्ञान किती मर्यादित होतें, तें विस्तृत करण्याकरिता तर रावसाहेबांनीं मला मुद्दाम ठेविलें आहे.

**सरस्वती**— बरें, तुम्ही म्हणतां तसें या संबंधांत पुण्य जरी असलें तरी कोणता गुरु असें कृत्य करण्याला तयार होणार आहे ?

**हरिहर**–तयार झाला नाही तर गुरूचा कनवाळूपणा कोठे राहिला ? फार कशाला ! आपल्याच गुरूंपैकी एकजण आपल्यावर असे उपकार करण्याला या घटकेस तयार आहे. आपल्या अनुकूलतेचीच काय ती उणीव आहे.

**सरस्वती**—( एकीकडे ) माझ्या मनाप्रमाणेच यांच्या म्हणण्याचा अर्थ असेल का ? ( उघड ) कोणीं तुमच्या हातीं निरोप पाठविला आहे वाटतें ? तसें असेल तर बोला लवकर. मला संशयांत ठेवूं नका.

**हरिहर**–असा निरोप दुसऱ्याच्या हातीं कोण धाडील ? बाईसाहेब, मीच तो आपला गुरु की जो आपल्या रूपावर भुलून चरणांवर लोटांगण घालण्याला तयार आहे.

**सरस्वती**–काय तुम्ही ! आज चमत्कारांचाच दिवस आहे. पण या शेवटच्या चमत्कारानें इतर सगळ्यांना फिकें पाडिलें. नीचा !

( ए रंगी रंगे तूं०—या चालीवर )

**तव मति चळली कैशी। वदाया नीच वचन अवचित वद कशि वळली रसना लाज न का तुजपाशीं ॥ ध्रु० ॥ शिकवाया मजला स्त्रीधर्मा । राहिलासि गृहिं दुष्कर्मा । दाविलेंसि परि अपुल्या वर्मा । कामुकचेष्टा निःशंकपणें करिसी ॥ १ ॥**

थांब, हें मी तिकडे जाऊन सांगतें. ( जाऊं लागते. )

**हरिहर**––( एकीकडे ) माझी सारी भूलच झाली कीं काय ? ( उघड ) बाईसाहेब, क्षमा करा, आणि हें सगळें विसरून जा. मी पुन्हा आपणांला कधी त्रास देणार नाही.

**सरस्वती**–(एकीकडे) माझेंहि वर्तन मघाशीं जरा संशय येण्यासारखें होतें. त्याचा यानें उपयोग करितां कामा नये. ( उघड ) या घराचा उंबरठा पुन्हा चढणार नाही अशी शपथ घे, म्हणजे हें कोणाच्याहि कानांवर घालणार नाहीं.

**हरिहर**–घेतों; पण मग रावसाहेबांना आपण काय कारण सांगाल ?

**सरस्वती**–– असें सांगेन की त्यामुळे तुला सरकारदरबारांत जाण्याचा प्रसंग येणार नाही.

**हरिहर**–मग मीहि या घरीं पुन्हा येईन तर देवाचीच शपथ. ( जातो. )

**वेणूबाई**–( प्रवेश करून ) बाईसाहेब, रावसाहेब आपणांस हांका मारीत आहेत. ते बहुतकरून इकडे यायलाहि निघाले असतील.

**आनंदराव**– ( प्रवेश करून ) हरिहरशास्त्री कुठे आहेत ?

**सरस्वती**–त्यांचें वर्तन मला जरा फाजीलपणाचें दिसलें, म्हणून मीं त्यांना कायमचा निरोप दिला आहे.

**आनंदराव**–शाबास ! याला म्हणावें पातिव्रत्य ! इतक्यांत मला मनोहरपंतांचेंहि पत्र आलें; त्यांत त्यांनीं शास्त्रीबुवांच्या वर्तणुकीबद्दल ऐकिलेल्या बोभाट्याबद्दल लिहिलें आहे. म्हणून त्यांना कायमची रजा देण्याचें तुला सांगण्याकरिता हांका मारल्या; तूं जवळपास नव्हतीस म्हणून मीच इकडे निघून आलों. ( वेणू जाते. ) यापूर्वींच तूं त्याला वाटे लाविलेंस हें फारच उत्तम झालें. सरस्वति, तूं माझ्या विश्वासाला पात्र आहेस हें आज तूं सिद्धच करून दाखविलेंस. चला, तिकडेच जाऊं. ( जातात. )

## प्रवेश ६ वा.

( हरिहरशास्त्री व वेणूबाई. )

**हरिहर**–माझा सारा बेत फसायला कारण तूंच आहेस.

**वेणू**-मनुष्य नेहमी आपल्या चुकीचें खापर दुसऱ्यावर फोडायला तयार असतें.

**हरिहर**–– तिच्या मनाची तूं तयारी करून ठेविली नाहीस म्हणून तर सगळी घाण झाली.

**वेणू**–पण तुमचा बेत फसला अशी तरी तुमची खात्री आहे का ?

**हरिहर**– फसण्याला काय शिंगें राहिलीं आसतात ! तिनें मला निक्षून सांगितलें घरांतून निघून जायला. लाथा मारायच्या मात्र ठेविल्या होत्या !

**वेणू**–बरें, हें झालें किती वेळांत ?

**हरिहर**––फारच थोड्या वेळांत. तूं येण्यापूर्वी दोनचार पळांतला कारभार सगळा.

**वेणू**–मग माझा तर्कच खरा आहे.

**हरिहर**–तुझा आणखी कोणता तर्क ?

**वेणू**– बाईसाहेबांनीं माझ्या पावलांचा आवाज ऐकून तुमच्यावर रागावण्याचा कांगावा केला नुस्ता !

**हरिहर**– तुझा तर्क मलाहि खरा वाटूं लागला आहे. कारण मी तिला हें वर्तमान रावसाहेबांच्या कानांवर न घालण्याबद्दल विनवलें मात्र, आणि ती लागलीच त्या गोष्टीला कबूल झाली. तिचा राग ढोंगाचा नसता तर तिनें सगळ्या घरांत एकच कल्लोळ करून सोडला असता. बरें, तूं तेथे कशाला भलत्या वेळीं आलीस ?

**वेणू**–इकडे कान करा म्हणजे सांगतें. (हरिहरशास्त्र्याच्या कानांत सांगते.)

**हरिहर**– अस्सें ! अस्सें ! पतिराजांनीं आम्हांला अर्धचंद्र दिला तर ? त्यांच्या अर्धांगीच्या पूर्णमुखचंद्राची हांव धरल्याबद्दल हें बक्षीस योग्यच झालें म्हणावयाचें ! आणि त्या मनोहराचेंहि यांत अंग आहे. माझी ब्याद वाटेंतून दूर करण्याला पाहातो आहे. बरें आहे म्हणावें; अजून काय झालें आहे ? तुझ्यापूर्वी मीच या पांखराला आपल्या जाळ्यांत पकडतों. आता पहिलें काम सरस्वतीला ताबडतोब एक प्रणयपत्रिका पाठवायची. विलंब केला तर तिचा कामावेश शांत होईल. पत्र पाठवावयाचें तें भेंकडभटाकडूनच पोहोंचतें करावें म्हणजे झालें. ( पडदा पडतो. )

---

## अंक तिसरा : : : : प्रवेश पहिला

( हरिहरशास्त्री. )

**हरिहर**–( स्वतःशीं ) पत्र पाठवून एक संबंध दिवस गेला; पण अजून उत्तर नाही. त्या भेंकडभटानें तर मध्येच कांहीं गडबड केली नसेल ना ? किंवा त्याच्या हातांतून कोणी तें हिसकावून घेतलें ? हा पाहा तोच येत आहे.

**भेंकड**–( प्रवेश करून ) सगळीं कामें आटपतां आटपतां चांगली संध्याकाळ झाली. अंधारहि पडला. त्यांतून आमचें शेजारचें घर भुताटकीचें आहे. त्या घरांतील एका बाईनें विहिरींत जीव दिला, आणि तेव्हापासून ती घरातील लोकाच्या व रस्त्यानें जाणारायेणारांच्या हात धुवून मागे लागली आहे म्हणतात ! परवा एक बोवा रात्रीचे बारा वाजता रस्त्यानें चालला असतांना त्याला बागड्यांचा खळकन् आवाज ऐकूं आला, म्हणून वर पाहिलें तों सर्वांत वरच्या खिडकींतून डोक्याला मळवट भरलेली एक बाई आपणाकडे हंसत हंसत पाहात आहे व तिचे हात खाली रस्त्यापर्यंत पोहोंचले आहेत असें त्यानें पाहिलें आणि तो मटकन् खालीच बसला. पण येथे आवाज कसला झाला बरें ? ( मागे पाहून ) कसला नाही. माझ्या जोड्याचा. आपण आता जोडा न वाजवितां चालावें तें बरें. ( चालून ) अथवा जोडा हातांतच घ्यावा, म्हणजे पिशाचाला मारायला बरें पडेल. आणि उजव्या हातांत जानव्याची घ्यावी गांठ म्हणजे ती त्याला दाखवितां येईल. याप्रमाणे गांठीची ढाल आणि जोड्याची तरवार करून चाललें म्हणजे भुताची काय माय व्यायली आहे माझ्या अंगावर यायला ! अरे पण तें अंधारात काय दिसतें आहे पांढरें ? पिशाचच तें ! ( जोडा गळून पडतो. ) पि-पि-पि-पिशाचा ! म-म-मीं-ह हात जोडतों.

**हरिहर**–( एकीकडे ) काय मूर्ख आहे ! ( उघड ) अरे भेंकडभट !

**भेंकड**– अरे बापरे ! तें बोलायलाहि लागलें !

**हरिहर**– अरे भेंकडभटा, असा भेदरलास काय ?

**भेकड**–(एकीकडे) भूत नाही वाटतें. तो शास्त्री दिसतो आहे. (उघड) काय म्हणतां ?

हरिहर– असा घाबरलास काय ? भित्रा नाही तर !

भेंकड– कोण घाबरलें ? तुम्हीच घाबरलां असाल !

हरिहर– खरेंच; मीच घाबरलों. पण आधी घाम पुसून जोडा पायांत घाल. अस्सा ! आता मला सांग बरें कालचें पत्र बाईसाहेबांच्या हातांत दिलेंस कीं नाही तें ?

भेंकड–मला तुम्ही भित्रा कां म्हटलेंत तें सांगा पहिल्यानें. याचा तुम्हांला चांगला जाब द्यावा लागेल !

हरिहर– काय जाब घेणार रे माझा ? हं सांग लवकर.

भेंकड– माझी क्षमा मागितल्यावांचून नाही सांगायचा.

हरिहर– मी नाही मागत क्षमा न् बिमा !

भेंकड— शिव्या द्यायच्या आणि क्षमा मागायची नाही म्हणजे ? मग काय ? मी समजूं ना तुम्ही क्षमा मागितली म्हणून ?

हरिहर– तू समज वाटेल तें.

भेंकड– अस्सें ! आता कसे वाटेवर आलात ! लवकर माफी मागितली म्हणून बरें झालें. आता बोला काय तें.

हरिहर— माझ्या पत्राचें काय झालें ?

भेंकड– तुमचें पत्र बाईसाहेबांनीं वाचून पाहिलें आणि त्या तिरस्कारानें हंसल्या.

हरिहर–तिरस्कारानें ! (एकीकडे) बरें, पाहून घेईन ! (उघड)आणि उत्तर ?

भेंकड– त्या म्हणाल्या उत्तर देण्याची योग्यता नाही म्हणून. अगदीच हलकट होतें वाटतें तें पत्र ?

हरिहर—फारच हलकें होतें. हें घे त्याबद्दल तुला भारी बक्षीस ! (मारूं लागतो, भेंकड चुकवितो. )

भेंकड–माझ्या अंगाला हात लाविला असता तर हाडें हाडें नरम करून टाकिलीं असतीं. ( जातो. )

हरिहर–(स्वतःशीं) काय ! उत्तर देण्याची योग्यता नाही ? बरोबरच आहे. कुलशील सारखें नसल्यावर योग्यता असेल कुठून ? आता हिच्याच कुळापैकीं एखादी स्त्री वश करून घेऊन हिला पुराव्यानिशीं शाबीत करून दिलें पाहिजे थोर कुळांतील स्त्री हलक्या माणसावर कशी फिदा होते तें ! म्हणजे माझा सूडहि

उगवल्यासारखा होईल, आणि या निराश झालेल्या कामवासनेची तलफहि अंमळ भागेल. जो जय सरस्वतीवर मिळवितां आला नाही तो चंद्रिकेवर मिळवितां येणार नाही का? आलाच पाहिजे. या विधवा, प्रेमाला कशा हपापलेल्या असतात, याचा प्रत्यय मला वेणूच्या बाबतींत चांगलाच आला. चकोर एकदा चंद्रिकेला असाध्य झाला, म्हणजे जो तिला प्रथम भेटेल तोच तिचा वल्लभ! वेशीपाशीं सर्वांच्या आधी येणाऱ्या इसमास राज्यपद अर्पण करणाऱ्या मंत्र्यापेक्षा या विधवा फारशा शहाण्या नसतात. असो, हा माझ्या सूडाचा एक प्रकार झाला. सरस्वतीवर दुसऱ्या एकाद्या प्रकारचा सूड उगविता येणार नाही का? तिच्या बोलण्यात तिची प्रीति तिच्या एकाद्या गुरूवर म्हणजे मजवर किंवा मनोहरावर असावी असें आलें. आता माझ्याविषयींचा संशय मुळींच उरला नाही; तेव्हा तिचें प्रेम मनोहरावरच आहे हें खास! मनोहरानें मला तिच्या घरून हुसकावून लाविलें त्याअर्थी त्याचीहि तिच्या प्राप्तीविषयी खटपट चालू असावी. आता संधि साधून मनोहराला स्वर्गाची वाट दाखविली पाहिजे. हीं देवमाणसें या पृथ्वीवर राहाण्याला अगदी अयोग्य! तसें झालें म्हणजे या चढेल स्त्रीला नवरा जिवंत असतां वैधव्य आल्यासारखें होईल, आणि मनोहराचीहि माझ्या बेतांच्या आड आल्याबद्दल चांगली संभावना केल्याप्रमाणे होईल. मात्र हा दुसरा बेत ताबडतोब अमलांत आणिला पाहिजे. कारण, त्याला या हाताचा प्रभाव दाखवायला विलंब केला, तर ही छाती मत्सरानें फुटून जाईल! ( जातो. )

---

## प्रवेश २ रा.

**चकोर**–( प्रवेश करून )–( स्वतःशीं ) हा तापसाचा वेष तर अंगावर चढविला! हा मला शोभत नाही असें कोण म्हणेल?

( अब मोरे राम०– या चालीवर )

**वेष योग्य हा। स्थितिला माझिया पहा॥ ध्रु०॥ योग्य अक्षमाला। अश्रुसंततीला। पात्र पात्र तेवीं प्रेमयाचनेला। रागा वसनराग हा॥ १॥**

असो; आता ती ज्या स्थलीं बसली असेल तिकडचाच मार्ग धरावा. (चालून) रावसाहेब व विहार वेगळे झाले ते एकाच वाड्याच्या दोन भागांत

निराळीं बिऱ्हाडें करून राहिले आहेत. परंतु यांपैकी मुलाचा कोणता आणि बापाचा कोणता भाग ? हा भपकेदार भाग आनंदरावाचा असला पाहिजे. तर आता दुसऱ्या भागाकडेच जावें. अहाहा ! या अंगणांत आणि या वृंदावनाजवळ आम्हीं बालपणीं किती प्रेमाच्या गोष्टी केल्या ! ज्या घरीं मी हक्काचा पाहुणा म्हणून जात असें, त्या घरीं प्रवेश करून घेण्याकरिता मला बैराग्याचा वेष घ्यावा लागला आहे ! हें तें पारिजातकाचें झाड ! याला जितकीं पुष्पें हल्लीं बिलगलीं आहेत त्यापेक्षा अधिक आठवणी त्याशीं संलग्न आहेत. त्याला पाहिल्याबरोबर माझ्या बालपणचा चित्रपट समोर उभा राहिला. प्रौढवयांतल्यापेक्षा या वयांतला चित्रपट फार भडक रंगानीं रंगलेला असतो. पुढे कालगतीबरोबर तो फिक्का पडत जातो. या ठिकाणीं मी पारिजातकाच्या कळ्यांचा गजरा करून कितीदा तरी तिच्या वेणींत घातला होता ! तीच वेणी आता अस्ताव्यस्त व विखुरलेली आढळून येईल ! चंद्रिका त्या वेळीं स्वतः ही मनोहर स्त्रीत्वाची नुकतीच उमलू पहाणारी कळी होती. पण आता अकालीं सुकून गेलेल्या पुष्पाप्रमाणे ती दिसून येईल. या स्थलीं तिनें कितीवेळां तरी रांगोळीचीं चित्रविचित्र स्वस्तिकें काढावीं आणि मीं त्यांजमध्ये गुलाल भरावा. आणि कोणाचें कौशल्य अधिक याबद्दल आम्हांमध्ये सप्रेम स्पर्धा चालावी ! पण आता तिचा हात वक्षःस्थल पिटण्यांत गुंतला असेल आणि माझ्या हातीं हें भिक्षापात्र आलें आहे ! या ठिकाणीं मी अनेक वेळां तिच्या वेणीवर हात देऊन आणि सुंदर मुखकमलाकडे एकाग्र दृष्टि देऊन तिचें कुंकूं नीट केलें; पण आता तिचा भालप्रदेश कुंकवावांचून कसा निस्तेज दिसत असेल ! तिची वेणी तर कुंकवावांचून मणिविरहित सर्पाप्रमाणे किंवा शशिविरहित रात्रीप्रमाणे विशोभित दिसत असेल. काय चमत्कार आहे पाहा ! स्थळ तेंच, वृक्ष तोच, वृंदावन तेंच, मी तोच, आणि चंद्रिकाहि तीच ! पण एका कुंकवाच्या टिळ्यावांचून या सर्वांची कांति नाहीशी झाली आहे ! अरे, पण तीच आली वाटतें ! हरहर ! तिचें असें निस्तेज मुख पाहाण्यापेक्षा मी अंध कां नाही झालों ?

**चंद्रिका**–(प्रवेश करून)–(स्वतःशीं) आता सारी मंडळी तिकडे गडबडींत आहेत तोंच तुळशीची पूजा करून मग घरांत जावें, (पूजा करिते.) हे देवि !

( सुंदरि सीते जा भवनीं०— या चालीवर )

**विनवि सुता माते तुळशी। सावधान हें वच परिशीं ॥ ध्रु० ॥**
**ठरलें मी जन्माचि अभागी। ठेविं सदैव सुखीं त्यांसी ॥ १ ॥**
**आनंदवि मज तत्स्मृति परि मम । होउ न त्यां कवण्याहि दिशीं ॥ २ ॥**

**चकोर**— ( एकीकडे ) ही कोणाबद्दल बोलत आहे बरें ?

**चंद्रिका**— ज्या देशांत ते गेले आहेत तेथील स्त्रिया फार मोहक असतात असें ऐकितें. त्यापैकी एखादीच्या पाशात ते सांपडले असतीलच.

**चकोर**—(एकीकडे) ही मलाच उद्देशून बोलत आहे. चंद्रिके, मी पाषाणासारखा निर्दय तर खराच, पण माझ्या कठिण हृदयावर कोरलेली तुझी मूर्ति पुसून टाकून त्याजवर दुसरी प्रतिमा उमटविणें त्याच कारणामुळे अशक्य होऊन बसलें आहे. ( चंद्रिका तुळशीला प्रदक्षिणा घालते ) चंद्रिका इतक्या थोड्या वर्षांत किती तरी गंभीर दिसूं लागली आहे ! कां नाही दिसणार ? प्रातःकाळीं कुमारिका, मध्यान्हीं पत्नी व रात्रीं गतभर्तृका, याप्रमाणे आयुष्यांतील तिन्ही अवस्थाचा अनुभव जिला एका दिवसांत येऊन चुकला तिची वृत्ति एकदम गंभीर झाल्यास नवल काय !' ही वृंदावनाभोंवती प्रदक्षिणा घालतांना सूर्याभोंवती फिरणाऱ्या वसुंधरेप्रमाणे शोभत आहे. विपत्तीच्या भोंवऱ्यांत सांपडल्यामुळे हिची पृथ्वीच्या दैनंदिनीगतीप्रमाणे स्वप्रदक्षिणाहि चालली आहेच ! आता हिचें चित्त वेधून घेण्याकरितां एखादें गाणें म्हणावें. (उघड)

( आज काल होति न वश०—या चालीवर )

**भेटसि कां भिन्न अंगिं मजसि जानकि । सकलांगीं मिळशि कधीं मन अधीर कीं ॥ ध्रु० ॥ तुजसाठिं वनोवनें हिंडलों फुका । सिंहिं कटि हरिणिं दृष्टि सर्पिं वेणिका । कोकिलिं चंपाकुसुमीं शब्द नासिका ॥ (चाल) येत दिसुनि भुजलतांत । ऊरुहि कदलीवनांत । श्रांत दृष्टि करि पळांत । दर्शनें सुखी॥१॥ धुंडियलीं रम्य बहु सरें अनेक तीं । ओष्ठ विद्रुमांत कंठ शंखिं दीसती । कमलिं नेत्र उदकिं चित्त शुद्ध जें अति ॥ (चाल)**

**दुखती ऊरु भ्रमणीं । संवाहीं वरि बसुनी । अधरदानिं ने हरुनी । शुष्कता मुखीं ॥ २ ॥**

**चंद्रिका**–( स्वतःशीं ) हें मंजुळ गीत गाणारा तापसी कोण असावा बरें ? माध्यान्हकाळीं ईश्वर स्वतः अतिथिवेषानें येतो म्हणतात. तर याला भिक्षा घालण्याला उशीर करितां कामा नये. ( जाऊं लागते. )

**चकोर**–छे छे ! मला साधी भिक्षा नको आहे !

( अभंग. )

**नको मज पीठ आटा । दुःखें चूर भीच करंटा ॥ १ ॥ नको अन्न मज सुग्रास । भूक तूझी मम जीवास ॥ २ ॥ नको मज उदकपान । तुझ्या दर्शनाची तहान ॥३॥ झाली तव सौख्याची होळी । ऐकोनी मी घेई झोळी ॥ ४ ॥ घालीं हींत प्रेमभिक्षा । कामना न दुजि यापेक्षां ॥ ५ ॥**

**चंद्रिका**–( एकीकडे ) आवाज ओळखीचा दिसतो. होय, तेच तेच हे ! (मूर्छित होते; चकोर तिला सांवरतो. सावध होऊन) दूर व्हा ! या चांडाळणीला स्पर्श करूं नका ! नाहीतर ताबडतोब गतप्राण व्हाल !

**चकोर**–( चंद्रिकेचा हात आपल्या हातीं ठेवून ) संजीविनीच्या स्पर्शानें प्राण जाणार कीं राहाणार ? चंद्रिके, या हातावर मीं स्वतः बालपणीं रामनाम गोंदलें होतें. तुला आठवत आहे ना ? तें अजून तसेंच आहे किंवा पुसट पुसट झालें आहे तें पहातों. (पाहून) हर हर ! श्रीरामाचा तुझ्या संनिध नेहमी वास असतां तुझी आपदा टळली नाही ती नाहीच. पण तसें पाहिलें तर स्वतः रामाची तरी कुठे टळली ! सीताविरह व्हावयाचा तो झालाच ! तेव्हा भवितव्यता बलवत्तर हेंच खरें ! चंद्रिके, काय तुझी अवस्था झाली आहे ही !

**चंद्रिका**–माझें मेलें असो ! पण—

( झिंझोटी–त्रिवट )

**दीन वेष दीनेकरितां घेतला वृथा हा । कां विडंबिलें इजसाठीं दिव्य अशा देहा ॥ ध्रु० ॥ स्कंधिं वसन भगवें राहे ती जिथें दुशाला । तिलक ज्या वसावा भालीं भस्मपुंड्र त्याला ।**

**कंठिं ज्या असावी कंठी तेथ अक्षमाला । ग्रंथि झोळिची करिं जेथें ग्रंथ रहावा हा ॥ १ ॥**

**चकोर**—चंद्रिके,

( सिंधकाफी—त्रिवट )

**जी तुझी असे ती माझी गति दुजी न वांछा । शुभ्र भाल तव हें असतां तिलक सेवुं केचा ॥ध्रु०॥ तूं व्रतस्थ असतां केवीं राहुं मी विलासीं । दुःखकूपिं पडलिस भोगूं काय सौख्यराशी । असुखिं तेविं सुखिं सेवावें त्वत्समागमासी । ही असे मनीषा मनिंची ईश साक्ष तींचा ॥ १ ॥**

आपली लहानपणची प्रत्येक गोष्टींतली मैत्री तूं विसरलीस का ?

**चंद्रिका**—त्या सौख्याची आता आठवण नको !

( मज गानिं करी व्याकुल०—या चालीवर )

**गत सौख्य गमे स्वप्न मनोहारिसें । नच लाभ तया आठवुनी मानसें ॥ ध्रु० ॥ जरिं त्यामधुनी जागृत मी जाहलें । दुर्दैव तदा भूत पुढें हें दिसे ॥ १ ॥**

आता आपली भेटसुद्धा घेणें पाप आहे. कोणीं जर आपणाला पाहिलें तर दोघांवरहि संकट यायचें. हं, सोडा माझा हात लवकर ! जाऊं द्या मला !

**चकोर**— चंद्रिके, इतकें कठोर भाषण तूं आजपर्यंत मला केलें नव्हतेंस. हा पाहा मी तुझा हात सोडला. तो विवाहप्रसंगावांचून पुन्हा कधी धरणार नाही, याला तुझ्याच गळ्याची शपथ !

**चंद्रिका**— कठोर बोलूं नको तर काय करूं ? कोणीं पाहिलें असतें तर काय म्हटलें असतें ?

**चकोर**— काय म्हणणार ? माझ्या वाग्दत्त वधूचें पाणिग्रहण करण्याकरिता मी आलों असेंच म्हटलें असतें कीं नाही ?

**चंद्रिका**— पाणिग्रहण म्हणजे पुनर्विवाहच ना ?

**चकोर**— पुनर्विवाह त्या थेरड्याचा झाला. त्याच्या आधीच माझा विवाह

तुझ्याशीं तुझ्या मैत्रिणींनीं लाविला होता; हें तूं विसरली असशील, पण मी नाहीं विसरलों. त्यानंतर त्या थेरड्याशीं झालेलें लग्न मानवी कायद्याच्या दृष्टीनें जसें रद्द आहे, तसेंच तें ईश्वरी नियमाप्रमाणेहि आहे हें स्वतः ईश्वरानेंच त्याला तडकाफडकी दृष्टीआड करून दाखविलें आहे. असें जर आहे, तर माझी हक्काची स्त्री नेण्याला मी आलों असतां त्याविरुद्ध ब्र काढण्याची कोणाची मगदूर आहे ?

**चंद्रिका**— न्यायाच्या दृष्टीनें केलेला हा विचार शास्त्राच्या आणि रूढीच्या दृष्टीनें कसासाच दिसेल.

**चकोर**— शास्त्राविषयीं म्हणशील तर त्याची पुनर्विवाहास पूर्ण अनुमति आहे. आपले विचारी पूर्वज बदलणाऱ्या परिस्थितीप्रमाणे शास्त्राज्ञाहि बदलीत गेले आहेत. रूढीविषयीं म्हणशील तर ज्या रूढीस न्यायाचें आणि नीतीचें पाठबळ नाहीं ती पाळावी तरी काय म्हणून ? बंगाल्याकडे एकेका ब्राह्मणानें शंभर शंभर बायका करण्याची रूढि आहे. दाक्षिणेंत एकेका बायकोनें एकाच वेळीं अनेक पति करण्याची रूढि आहे. गुजराथेकडे विवाहित स्त्रीनें गुरूकडे जाण्याची रूढि आहे. अजून पृथ्वीच्या पाठीवर असे देश आहेत की ज्यांत अजून नरमांस भक्षणाची चाल आहे. या रूढि हजारों वर्षांपासून चालत आल्या असल्या म्हणून त्या पवित्र झाल्या का ? त्यांना एकदम गचांडी देण्याला काय हरकत आहे ? या रूढींमुळे आजपर्यंत कमी नुकसान झालें आहे कीं काय ? म्हणून आम्ही आणखी नुकसान होण्याची वाट पाहावी ?

**चंद्रिका**—पण वाईट रूढि नाहीशी करून चांगली पाडणें शक्य तरी आहे का?

**चकोर**— शक्य नसायला काय झालें ? सहगमनाची चाल सरकारला कलमाच्या एका फटकाऱ्यासरशी बंद करितां आली कीं नाही ? शाईच्या थोड्याशा काजळीच्या खर्चानें लाखों विधवांच्या रक्षेस प्रतिबंध करितां आला कीं नाही ? हाच प्रकार चांगल्या रूढींचा. मीं आज प्रथमच एखादी गोष्ट केली की तिला लहर म्हणतील. उद्या तीच केली म्हणजे संवय म्हणतील. ती अनेकांनीं केली म्हणजे नवीन मार्ग म्हणतील आणि तीच अनेक पिढ्यांनीं केली म्हणजे झाली रूढि या नांवास पात्र !

**चंद्रिका**— एक पति मेल्यावर दुसरा केल्यानें पहिल्या लग्नाचे वेळीं देव-ब्राह्मणास साक्षी ठेवून वधु पतीशीं एकनिष्ठपणें वागण्याची जी शपथ घेते तिची थट्टा केल्यासारखें नाही का होत ?

**चकोर**-- त्या शपथेचा अर्थ कळून, वधूनें ती पाळण्याची जबाबदारी घेतली असती तर तुझें म्हणणें रास्त होतें. पण जिथें गीर्वाणभाषेंतील त्या शपथेचा अर्थ खुद्द मंत्र पुटपुटणाऱ्या भटांससुद्धा कळण्याची मारामार तेथे आठ वर्षांच्या अर्भकास तो काय समजणार ? बरें, ती शपथ अनुल्लंघनीय आहे अशी कल्पना केली तरी ती पाळावयाची कोठवर ? पतीच्या जन्मभर, किंवा विधवेच्या जन्मभर, की तिच्या जन्मोजन्मीं ? पति जिवंत आहे तोंपर्यंत पत्नी त्याच्याशीं पतिव्रताधर्मानें वागली म्हणजे त्या शपथेची मर्यादा संपली. तो मेल्यावर ज्याप्रमाणे तिच्या केसांनीं त्याच्या स्वर्गप्राप्तीला अडथळा येत नाही, त्याप्रमाणे त्या शपथेनें तिच्या पुनर्लग्नास येत नाही. वधूप्रमाणे वर नाही का शपथ घेत ? पण ती अशौचानंतर किती दिवस टिकते ? पुष्कळ वेळां तर एकीकडे प्रथम पत्नीचें सरण रचीत असतात आणि दुसरीकडे द्वितीय विवाहांतील होमाची तयारी चालली असते !

**चंद्रिका**-हे सगळे मनोराज्यांतील तरंग ठीक झाले ! पण व्यवहाराकडे पाहिलें पाहिजे ना ? मी हल्ली दादांच्या घरीं आहें.

**चकोर**-मग त्यांत काय विशेष झालें ?

( हे तरु कामीजन०—या चालीवर )

**पथ हा नूतन नच कथिला । आजवरी किति पुण्यवंतिं तो प्रेमें अनुसरिला ॥ ध्रु० ॥ अर्जुन वांछि सुभद्रेला । गुप्तपणें तिज रथांत घालुनि नेई स्वपुराला ॥ १ ॥ श्रीहरि हरि भीमकबाला । बांधवगण अवगणुनी तीचा दे रुक्मामाला ॥२॥ सेवुनि या सुखमार्गाला । कान्यकुब्जनृपदुहिता हरिली पृथुरायें विमला ॥ ३ ॥**

**चंद्रिका**-शिवशिव ! काय म्हणतां हें !

( अतिपापी मी चांडाळिण०—या चालीवर )

**गुरुजनापवाद कसा घेऊं मस्तकीं या । रीति हीच तदुपकृति-विमुक्त काय व्हाया ॥ ध्रु० ॥ मातांपितरीं दिधला जन्म या तनूतें । बंधु तिजसि पोषितसे दावुनि ममतेतें । तत्सत्ता**

**तिजवरि जरि हृदय आपुलें तें । मति न होइ उलंघन लव तिचें कराया ॥ १ ॥**

अशानें ही परक्याचा हात धरून गेली असें नाही का लोक म्हणणार ?

**चकोर**–पुन्हा पुन्हा मला परका म्हणूं नकोस.

**चंद्रिका**–छे ग बाई ! दादाच्या संमतीवांचून मी कांही एक करणार नाही.

**चकोर**–तुझ्या दादाची संमति मिळेल तरच तूं विवाह करणार असें म्हणण्यापेक्षा असें कां नाही म्हणत, की आकाशकमलतंतूंनी विणलेला अंतरपट धरून खडकावर पेरून निघालेल्या मंत्राक्षतांनी वंध्यापुत्रांनी लग्न लाविलें तरच लावीन ! तुझा दादा मला माहित नाही कीं काय ? इकडची पृथ्वी तिकडे होईल; पण तो या गोष्टीला कधी कबूल होणार नाही. मुसळाला कधी अंकुर फुटलेला पाहिला आहेस काय ?

**विहार**– ( हरिहरशास्त्र्यासह प्रवेश करून )–चकोरा, असा चोरट्यासारखा माझ्या मागे येऊन माझ्या बहिणीपाशीं माझी निंदा चालविली आहेस का ? चंद्रिका आधी स्त्रीजात, तशांतून एकटी; या दोन्ही गोष्टींचा फायदा घेऊन याप्रमाणे माझ्या पाठीमागे माझी नालस्ती करण्याला तुला लाज वाटायला पाहिजे होती. मध्यंतरी तुजवर ग्रामण्य करण्याचें घाटत होतें, पण तें तुझ्या बहिणीच्या बोलण्यास मान देऊन मीं आंतल्या आंत मिटवून टाकिलें. याबद्दल बक्षीस कसें योग्य दिलेंस ! मी जर या घटकेस सरकारी शिपायांस बोलावून तुला त्यांच्या ताब्यात दिलें तर मला नाही वाटत मला त्याबद्दल कोणी दोष देईल असें ! (चकोर खालीं मान घालून उभा राहतो.)

**तरंगिणी**–( प्रवेश करून ) हा सारा वर्षाव माझ्या चकोरावरच चालला आहे का? ( चकोराजवळ जाऊन ) बाळा चकोरा, काय ही तुझी स्थिति !

**विहार**–– तुझा चकोर परदेशाहून आल्यावर आपले पोषाख, रीतरिवाज सोडणार नाही; असें तुझें भाकित होतें ना ! तें खरें ठरलें अखेरीस ! बैराग्याच्या वेषापेक्षा आणखी स्वदेशी पोषाख तो कोणता असावयाचा !

**मनोहर**– ( प्रवेश करून ) मी सारखा चकोराच्या पाळतीवर असूनसुद्धा तो केव्हाच मला नकळत निघून गेला. तो बहुतकरून येथेच असेल. कारण चकोर चंद्रिकेला सोडून दुसरीकडे कोठे असणार आहे ?

**चकोर**– (स्वतःशीं) आज माझ्या साऱ्या प्रियजनांदेखत माझी फजिती होणार असें दिसतें. वैऱ्यानें सुद्धा साधून येणार नाही असा दुष्ट योग आज आपोआप जमून येत आहे. या अपमानापेक्षा मरण पत्करिलें.

**चंद्रिका**–( मनांत ) देवा! काय यांचे हाल हे! आणि हें सारें मज-करिता त्यांना सोसावें लागत आहे!

**मनोहर**–काय! माझा चकोर! ( त्यास आलिंगन देऊन ) बाळा, असा प्रसंग आपणांवर कां ओढून आणिलास?

( बाली उमरिया मोरा संयाने०–या चालीवर )

**झाली तव दशा काय असे ही॥ बाळि पडसि अशा। कां उपहासा॥ध्रु०॥ बालपणींची। सखि जीवाची। बहुकालें देखुं येसि धरुनि दुराशा॥ १॥ बांधवसत्ता तिजवरि असतां। प्रेम करुनि संपादिसि कां गुरुदोषा॥ २॥**

**हरिहर**–मनोहरपंत, विश्वविद्यालयांतील पदवीदानसमारंभाचे वेळीं जो झगा अंगावर चढवितात तो घालून आपले बंधुराज बायको नेण्याकरितां तसेच इकडे आले आहेत! आपण जसे आश्रमाकरितां झोळी घेऊन हिंडतां तसे हेहि झोळी घेऊन येथे आले आहेत. मात्र आपणांप्रमाणे कनकाची नाही तर कांतेची याचना करण्याकरितां!

**चंद्रिका**–( एकीकडे ) हा मेला काळसर्प शुद्ध विष ओकतो आहे!

**मनोहर**– ( एकीकडे ) या दुष्टाच्या बडबडण्याकडे लक्ष्य देऊन उपयोग नाही. ( उघड ) विहारा, चकोराची जी तूं इतकी निर्भर्त्सना केलीस ती अस्थानीं आहे.

( येजि वनवारि मुसे०–या चालीवर )

**वच तव उचित न गुरुवया प्रलपसी। विसरसीच तरुणपण मोहिं। स्वमतिवरुनि जग कां न ओळखिसि॥ध्रु०॥ बालजाति ऐसेंचि वर्तती। स्वच्छंदपणें स्वयें चेष्टती। नातरि योग्य न तदाख्या तिजसि॥ १॥**

**विहार**–मनोहरा, चकोर आता लहान आहे का!

**हरिहर**–अगदी कुकुबाळ आहे, नाहीतर काय ? बाळ रांगत रांगत येथें आलें, आणि चंद्रिकाताईपाशीं खाऊ मागूं लागलें !

**विहार**–शास्त्रीबुवा, तुम्ही जरा गप रहा पाहूं !

**मनोहर**–आता जरि चकोर वयानें लहान आहे, द्वड आहे तरी त्यानें या ठिकाणीं अशा वेषांत येऊन चंद्रिकेची व इतराची अमर्यादा करावयाची नव्हती हें मी कबूल करितों. आणि त्याच्या वर्तीनें तुम्हा सर्वांची त्याबद्दल क्षमा मागतों. त्या बिचाऱ्याला बोलायला तोंडच नाही.

**विहार**–मनोहरा, पहिल्यानें तोडांत मारून मागाहून क्षमा मागत बसणें हा कोणत्या दुनियेंतला नम्रपणा ?

**मनोहर**–शिवाय त्याला येथें चोरून येण्याची जी बुद्धि झाली तिच्या दोषाचे अंशतः तुम्हीहि वांटेकरी आहांत.

**विहार**–तें कसें काय बुवा ? ऐकूंद्या. म्हणजे कळेल तरी चकोराला हा उद्दामपणा करायला मीं कशी चिथावणी दिली ती !

**मनोहर**– चकोराचें आणि चंद्रिकेचें लहानपणासून कसें प्रेम होतें हें तुला माहित आहेच. पांच सहा वर्षें परदेशांत घालवून चकोर स्वदेशीं परत आल्यावर त्याला आपल्या बालपणच्या सोबतिणीला भेटण्याची साहाजिक इच्छा होणार. आणि तुम्ही तर इकडे कड्याकुलुपें घालून जय्यत बंदोबस्त केलेला ! मग त्यानें असा वेष घ्यावा यांत नवल तें कोणतें ?

**विहार**–आता हळूहळू तूं असेंहि प्रतिपादन करायला लागशील की आम्हीं होऊन या दोघांचा पुनर्विवाह लावून टाकावा !

**मनोहर**– मला कांहीं गैर नाही दिसत यांत !

**विहार**– यांत गैर नाही तर कशांत गैर आहे ? आम्हांला या तुमच्या नवीन सुधारणा नकोत. माझी खात्री आहे की, आमची जुनी गोष्ट इष्ट असून प्रत्येक नवी गोष्ट त्याज्य आहे.

**मनोहर**– मग बैलगाडीचा सोडून आगगाडीचा प्रवास कां करितां ? आणि सांडणीस्वार धाडण्याऐवजी टपालाकडे कां धांव घेतां ? जो इतर सुधारणांचा प्रकार तोच पुनर्विवाहाचाहि.

**हरिहर**– दादासाहेब, मी करितों यांचें समाधान. हें पाहा, मनोहरपंत, घरांतील कामकाज करण्याला प्रत्येक कुटुंबांत एक एक विधवा पाहिजे असते.

या दृष्टीनें विचार केला तर आमच्यांत किती तरी कुटुंबें अशीं सांपडतील की, ज्यांमध्ये विधवा नसल्यामुळे धुणें, पोतेरें घालणें, स्वैंपाक करणें वगैरे काबाडकष्ट घरांतील यजमाननीस करावे लागतात. पुनर्विवाह सुरू केला तर या अडचणी वाढतील कीं कमी होतील?

**मनोहर**– काय राक्षसी विचार हा! एका जोडप्यानें सुखांत लोळावें म्हणून एका विधवेनें जन्मभर रडत बसावें!

**हरिहर**– शिवाय विधवाना पुनर्विवाहाची आवश्यकताहि वाटत नाही. त्यांच्या अंगीं जन्मतः जें सात्त्विक प्रेम असतें त्याचें समाधान आप्तांचीं व इष्टमित्रांचीं मुलें खेळविण्यानें पूर्णपणें होतें.

**मनोहर**–स्त्रियांचें समाधान येवढ्यावरच जर होतें तर विधवांकडून प्रत्यहीं जे गर्भपात व भ्रूणहत्यादि प्रकार घडून येतात ते घडले असते का? शिवाय हा नियम स्त्रियांना जसा लागू करितां तसा पुरुषांना नको का करायला?

**विहार**–केला पाहिजे, अवश्य केला पाहिजे. आणि माझी खात्री आहे की पुरुषसुद्धा द्वितीय संबंधाशिवाय शुद्ध वर्तनानें राहूं शकतील. मी स्वतः अशी प्रतिज्ञा करितों की मजवर दुर्दैवानें तसा प्रसंग आणिलाच तर मी राहिलेला सर्व जन्म संन्यस्तवृत्तीनें आणि परोपकारांत घालवीन.

**मनोहर**–विहारा, पाहा बरें; आता वादाच्या भरांत सहज बोलून जाशील आणि मग पस्तावशील.

**विहार**– आम्ही सुधारक नाही याप्रमाणे दिलेलें वचन मोडायला!

**मनोहर**–आजपर्यंत तुझ्यापेक्षा अनेकपटीनें सत्यप्रतिज्ञ पुरुषांकडून प्रतिज्ञांचा भंग झाला आहे. मग तुझा काय पाड? प्रत्यक्ष श्रीकृष्णानें सुदर्शनचक्र हातीं धरणार नाही अशी प्रतिज्ञा केली होती; पण ती त्याला मोडावी लागली.

**विहार**– मीं जर आपलें वचन मोडलें तर त्याबद्दल प्रायश्चित म्हणून चकोराचा व चंद्रिकेचा विवाह करून देईन.

**मनोहर**–ईश्वर करो आणि तुला कसोटीला लावण्याचा प्रसंगहि न येवो. कारण एक विवाह घडून आणण्याची इच्छा करायची म्हणजे प्रथम दुसऱ्या वैवाहिक सुखाचा अंत होण्याची इच्छा केली पाहिजे. आणि तें सुख तरी कोणाचें? तर प्रत्यक्ष माझ्या मेव्हण्याचें! त्यापेक्षा माझा चकोर आजन्म अविवाहित राहील.

**तरंगिणी**— बरें पण चकोरा, हा वेष काढून टाकतोस ना ?

**चकोर**— हा काढून दुसरा कोणता चढवूं ?

**तरंगिणी**— हात्तिच्या ! तिकडचा घे म्हणजे झालें.

**विहार**— मी नाहीं घेणार आपले कपडे सुधारकाकडून विटाळवून ! (एकीकडे) आपल्या अंगचें तेज शास्त्रीबुवांना दाखविण्याला ही संधि बरी आहे.

**तरंगिणी**- म्हणजे ? माझ्या भावालाहि नाही द्यायचे का कपडे ?

**विहार**—नाही, नाही ! तो येथे आला तसें त्यानें गेलें पाहिजे.

**तरंगिणी**—शिंप्याच्याकडचे आयते कपडे विकत आणवितें पाहिजे तर ?

**विहार**—मी आपल्या घरांत कपडे बदलूं देणार नाही.

**तरंगिणी**—माझ्याकरिता तरी इतकें ऐकायचें होतेंच !

**विहार**—नाही नाही ! जपानांतून शिकून आलेल्या तरतरीत विद्वानांचे चार लोकांच्या नजरेस आणिले पाहिजेत. तुझें नेहमी ऐकण्यासारखा मी बाईलबुद्धया नाही.

**तरंगिणी**—तर मग मीहि जातें त्याच्याबरोबर ! त्याची फजिती ती माझीहि फजिती आहेच.

**विहार**—उत्तम गोष्ट आहे ! आताच्या आता आपल्या गांवीं चालती हो. त्याशिवाय तुझा हेकेखोर स्वभाव नाहीसा व्हावयाचा नाही. परवापासून पहातों आहें, माझ्या ज्या त्या कामात तुझा मोडा ! माझ्या स्त्रैणपणाला हे शास्त्रीबुवा मनांतल्या मनांत हंसत असतील हें मला कळत नाही कीं काय ? हं, मनोहरपंत, करा तयारी आपल्या बहिणीला माहेरच्या गांवीं पोहोंचविण्याची.

**हरिहर**—( एकीकडे विहारास ) शाबास, दादासाहेब, शाबास ! याला म्हणतात पौरुष !

**तरंगिणी**—हें काय ! मी थट्टेत बोलून गेलें तें खरेंच समजायचें झालें वाटतें ? आपण या पायांपासून मला ढकलून दिलें तरी मी जाणार नाही. माझा इथे रहाण्याचा हक्कच आहे.

**विहार**—हक्क बिक्क मी नाही जाणत ! बायकांच्या हक्कांना भीक घालणारा मी सुधारक नाही, समजलीस ?

**हरिहर**—( एकीकडे विहारास ) वारे मर्दपणा ! आमचें गतवैभव परत येण्याची चिन्हें उघड दिसूं लागलीं.

**तरंगिणी**— आपली इच्छाच तशी असेल तर ती मला मान्य केलीच पाहिजे. मीहि परवापासून पाहातें आहें की मी केव्हा मरेन आणि आपण माझ्या जाचांतून सुटाल असें आपणांला झालें आहे. चला बाबांनो, मोकळें करूं एकदाचें यांना आपल्या त्रासांतून! (एकीकडे) स्वारी जरी संतापून गेली आहे तरी मला घटकेच्या आतच परत बोलावील ही खात्री आहे. म्हणून आपण येथून जवळच असावें. ( मनोहर, चकोर व तरंगिणी जातात. )

( चंद्रिकाहि जाते. )

**विहार**- (स्वतःशीं) अरे अरे! ही खरोखरच चालली की! मला वाटलें होतें, जरा नारसिंह अवतार आणिला की भिऊन जाईल.

**हरिहर**—आज मात्र आपला बाणेदारपणा दिसून आला! याला म्हणावें तेज! नाहीतर सुधारक लोक! नेहमी आपल्या बायकांच्या मुठींत असतात.

**विहार**—शास्त्रीबुवा, मी अशा नेभळ्या लोकांपैकी नाहीं समजलांत? मी जी आज्ञा करीन ती माझ्या बायकोनें निमूटपणे मानिलीच पाहिजे. पुन्हा तुम्हांला प्रत्यय पाहायचा असेल तर तिला परत फिरायला सांगतों. पाहा लागलीच परतते कीं नाही तें. ( जाऊं लागतो. )

**हरिहर**—इतकी तसदी घेण्याचें कांहीं कारण नाही. माझी खात्री झाली आपल्या खंबीरपणाबद्दल!

**विहार**-(स्वतःशीं) काय करावें! हा कावळा जवळ नसता तर मी तिला आताचे आता परतविली असती. (उघड) शास्त्रीबुवा, तिनें आपल्या चढेल वर्तनाबद्दल जर माझी क्षमा मागितली तर परत का नये घेऊं?

**हरिहर**—पण माझी क्षमा माग असें म्हणत आपणच त्याच्या मागे केविलवाण्या दृष्टीनें जाऊं नये असें माझें म्हणणें. नाहीतर दोघांपैकी कोण क्षमा मागण्याला उत्सुक आहे हें चतुरस्र पुरुषांच्या तेव्हाच ध्यानांत यावयाचें! बाकी, त्या आपण होऊन आल्या तर त्यांना माफी देण्याला आपण समर्थच आहां. (एकीकडे) चंद्रिकेला वश करण्याला मला जें एक मोठें विघ्न होतें तें आपोआपच दूर झालें. ही स्वारी मात्र मघापासून सारखी चुळमुळ चुळमुळ करीत आहे! पण आपणच तिला काढून दिल्यावर काय करितो!

**विहार**—( स्वतःशीं ) हरहर! गेली ती का परतण्याकरिता गेली? मी हरिहरशास्त्र्याला ऐट दाखविण्याच्या भरांत तिला बोलून गेलों, आणि तीहि

पडत्या फळाची आज्ञा घेऊन चालती झाली ! तिनें स्वतःच्या जिवाला कांहीं भलतें सलतें करून घेतलें तर ? अशा करारी बायका तसेंहि करायला चुकायाच्या नाहींत. पण बरोबर मनोहर आहे, त्यामुळे जरा धीर वाटतो. तो जरी सुधारक आहे तरी शहाणा आणि प्रसंगावधानी आहे. ( थांबून ) तें सगळें खरें ! पण मी आता तिच्या विरहांत काळ कंठूं तरी कसा ? देवा ! आता सर्वस्वी भार तुझ्यावर आहे !

( दिंडी )

**निज प्राणांहुनि अधिक मानियेली। अकारण कांता आजि घालवीली ॥ अदय मत्सम तूं नससि दीनबंधो। राखिं तिज पुनरपि ती प्रियासि लाधो ॥ १ ॥** (जातात.)

---

## प्रवेश २ रा

## ( चंद्रिका. )

**चंद्रिका**— ( स्वतःशीं ) देवा ! माझ्यासाठी त्यांचे काय हाल हे !

( क्या दिलपे दाग देते ० – या चालीवर )

**अवमाना स्मरुनि त्यांचे मनिं शोक आवरेना ॥ ध्रु० ॥ थोरपणा सांडुनीयां। यतिवेषा घेतलें त्या। परि गेलें सर्व वायां। झाली अतीव दैना ॥ १ ॥ प्रेमाच्या बद्ध पाशीं। नर होतां नीच दशी। बद्धहरीच्याहि शीर्षी। बसताति काकसेना ॥ २ ॥ धैर्याचे अचल मेरु। शांतीचे गहन सिंधु। म्हणुनि मुळीं कोपबिंदु। दिसला तदाननीं ना ॥ ३ ॥**

ज्यांनीं त्यांनीं नाही नाही ते शब्द बोलून त्यांना बोंचून घेतलें. त्यांना नेसण्याकरिता फाटकें चिरगूटहि कोणी देईना; आणि मी अभागी त्यांचा सगळा अपमान पहात उभी होतें ! हा पहा मेला त्यांचा छळ करणारा इकडे येत आहे.

**हरिहरशास्त्री**— ( प्रवेश करून )-( स्वतःशीं ) चकोराच्या फटफजीतीची आठवण चंद्रिकेला ताजी आहे तोंपर्यंत तिचा उपयोग करून घेतला पाहिज. या पोरीला वश करण्याला केशवपनाचें चांगलें शस्त्र आपल्या हातीं आहे त्याचा धाक दाखविला म्हणजे काम खात्रीनें वठेल. ( उघड ) कां ?

चंद्रिकाताई, ठीक आहेना ! तुमची कळी आज मिटलेलीच आहेशी ?

**चंद्रिका—** आमच्यासारख्या बायकांना काय ? प्रत्येक गोष्टीची चोरीच ! कोणाशीं मन मोकळें करून बोलता येत नाही. शेजारणीच्या घरीं जाऊं म्हटलें तर जातां येत नाही. घरकामाला हात लावावा म्हटलें तर तसेंहि करतां येत नाही. मघाशीं तुम्हांला देवपूजेकरिता पाणी देऊं लागलें, तर तेंहि तुम्हीं घेतलें नाही ! देवालासुद्धां आमची सावली सहन होत नाही !

**हरिहर—** वहिनीसाहेब समोर होत्या म्हणून मला तसें करावें लागलें. नाही तर मनांतून मला तुमच्याबद्दल किती वाईट वाटतें म्हणून सांगूं ! तुमचें दुःख पाहून जीव सारखा तिळतिळ तुटतो ! तुमची करुण मूर्ति सारखी डोळ्यांसमोर खेळत असते. आणि रात्रीच्या रात्री झोंपेवांचून जातात !

**चंद्रिका—** ( स्वतःशीं ) काय मेला मानभाव पहा !

**हरिहर—** परवा एक मोठेंच संकट तुमच्यावर येणार होतें. पण मी मध्यें पडलों म्हणून तें तूर्त टळलें आहे.

**चंद्रिका—** मी नाही समजलें तुमचें बोलणें !

**हरिहर—** हें तुमचें मुख केसांनीं कसें सुशोभित दिसतें ! तें विशोभित करण्याचा बेत दादासाहेबांचा चालला होता, पण मीं ती गोष्ट पार उडवून टाकिली !

**चंद्रिका—** मला वहिनींनीं सांगितलें की तुमच्याच मनांतून तसें होतें. पण दादानें तें मनावर घेतलें नाही.

**हरिहर—** आमच्या वहिनीसाहेब नवऱ्याबद्दल मोठ्या पक्षपाती बुवा ! बरें कसें का असेना ! तुमच्यावरचा प्रसंग चुकला खरा ! तो चुकल्याबद्दलचें श्रेय माझ्याकडून गेलें तर त्यांत मला विषाद नाही.

**चंद्रिका—** तुम्ही असे माझ्या हिताला जपतां हे तुमचे मजवर खंडोगणती उपकार आहेत.

**हरिहर—** त्यांत कशाचे उपकार म्हणा; तुम्ही मानितां म्हणून उपकार ! तुमच्याबद्दल मला जी कळकळ वाटते तिचा एक मासला तुम्हांला सांगितला इतकेंच काय तें ! तसेंच मघाशीं तो पोरगा जतीच्या वेषांत येऊन तुमच्याशीं दांडगाई करूं लागला तेव्हां असा राग आला होता म्हणून सांगूं ! क्षणभर तर त्याला हात धरून काढून द्यावेसें वाटलें.

**चंद्रिका**– त्यांनीं आज जो अतिप्रसंग केला तो केवळ प्रेमामुळे केला. यांत त्याचा फारसा दोष वाटत नाही मला.

**हरिहर**– प्रेम प्रेम झालें म्हणून काय झालें ? आम्हालाहि तुमच्याबद्दल थोडें का प्रेम वाटतें ? म्हणून आम्ही तुमच्या अंगाला झोंबूं लागलों तर तुम्हीच काय म्हणाल ?

**चंद्रिका**– म्हणून त्यांना इतकी का शिक्षा पाहिजे होती ? चुकून दुसऱ्याच्या शेतांत गेलेल्या मुक्या जनावराला वाटेल त्यानें मारावें आणि त्याला ओरडण्याचीहि चोरीच, तसेंच आज त्यांना झालें असेल ! त्यांची योग्यता आज इतकी कमी झाली का की वाटेल त्यानें त्यांना टोंचावें ? चिरगुटालाहि का ते महाग झाले ? ( टिपें गाळते. )

**हरिहर**– मला भडभडून येतें हें पाहून ! ( तिचे डोळे पुसूं लागतो; ती दूर होते. ) मी तुमचीं टिपें पुशीत होतों, इतकेंच काय तें ! बरें तें असो त्याच्या दांडगाईच्या मानानें त्याचा अपमान कदाचित् अधिक झाला असेल; नाही असें नाही. आता यापुढे असा प्रसंगच येऊं नये अशी खबरदारी घेतली पाहिजे. त्याच्यावर बहिष्कार घालून त्याला लोकातून उठविण्याचा आमचा संकल्प आहे. म्हणजे मग तो या घराकडे कसा फिरकतो तें पाहूं ! तो तुम्हाला आता कायमचा अंतरला म्हणून समजा.

**चंद्रिका**– ते मला कधीच अंतरले आहेत !

**हरिहर**– त्याच्याबद्दल शोक करणें आता सोडून द्या. त्याच्या जागीं आम्हीच आहोंत असें समजा. त्याला हृदयांत बागवून आम्हाला दूर कराल तर तुमच्यावर पुन्हा केशवपनाचा प्रसंग येईल. यांत समजा काय तें ! ( एकीकडे ) इतकी धमकी तूर्त पुरे आहे ( जातो. )

**चंद्रिका**–( स्वतःशीं ) काय मेल्याचीं बोलणीं पाहा ! याचा कावा मला पुरता कळून चुकला. पण दादाला सांगायला गेलें की याच्या एका बोलण्यांत सुद्धा हा सांपडण्यासारखा नाही. आमचा दादा काय !

( झिंझोटी–त्रिवट )

**भोळा मनाचा । तो नाथ जणुं उमेचा ॥ ध्रु० ॥ सहज ठेवि विश्वासातें । दूर करि अकारण त्यातें । संशया उगिच धरि चित्तें । लहरि मानसाचा ॥ १ ॥** ( जाते. )

## प्रवेश ४ था

### ( मनोहर, चकोर व तरंगिणी. )

**मनोहर**-चकोरा, तुझा लहानपणाचा हूडपणा अजून गेला नाही. माझ्या स्नेह्याचें घर जवळ होतें म्हणून बरें ! नाहीं तर आज फजितीला पारावार नव्हता. अरे, पण हें काय ? माझ्या मित्राचे कपडे तुझ्या अंगाला मुळीच येत नाहीत. हा पहा अंगारखा ढैल व आंखुड होतो आहे; आणि पगडी लहान झाली आहे. जोडा तर पिशवीप्रमाणे होत आहे. पण ज्याप्रमाणें विवाहाचा त्याचप्रमाणें वस्त्राचा प्रकार असतो. वधूवराचें वय, स्वभाव, मतें एकमेकांस अनुरूप नसतील तर तीं जशीं विजोड होतात त्याप्रमाणे वस्त्रें अंगावर बेतलेलीं नसतील तर तीं बेडौल दिसावयाचींच !

**तरंगिणी**-पण दादा, आमच्यामध्ये तर तसें काही वैषम्य नाही ना ? असें असून आज पाहिलास ना मजवर केवढा गहजब उडविला तो ? त्यांचा राग मनापासून नसेल या आशेनें मीं जवळच राहून त्यांच्या निरोपाची किती तरी वाट पाहिली. पण व्यर्थ !

**मनोहर**-असें थोडेंसें मधून मधून झालें नाही तर संसार मिळमिळित वाटतो.

( करि अति त्वरा०-या चालीवर )

**सुख न लाधतें । प्रणय-कलहकिरण-तिमिर-मृदुल-परुष**
**उष्ण शीत जरि न नांदतें ॥ ध्रु०॥ निजविरोधि वस्तुवीण ।**
**योग्यता न ये दिसून। अंतरिं नच वसत लवण । मधुर तरि न**
**गमत अन्न। प्रेम तेविं तें ॥ १ ॥**

**तरंगिणी**-तुझें आपलें जेव्हा तेव्हा असेंच ! कसाहि प्रसंग येवो, त्याला पाठ देण्याची तुझी तयारीच असते ! मला आज खरें विचारशील तर प्राण ठेवावासा वाटत नाही.

**मनोहर**-असा जर आपण पदोपदीं प्राण देऊं लागलों तर आपणांला हजार प्राणहि पुरणार नाहीत.

**तरंगिणी**-किंवा असें मनांत येतें की निदान त्यांच्यापासून दूर रहावें म्हणजे त्यांना आपण मेल्यासारखेच आहोंत !

**मनोहर**-तशी तुझी इच्छा असली तर माझा आश्रम आहेच तयार !

**चकोर**—दादा, तुमची परवानगी असेल तर मी अशी एक युक्ति सांगतों की ताईची इच्छा पूर्ण होऊन चंद्रिकेचीहि वैधव्यांतून सुटका व्हावी.

**तरंगिणी**—हो ! मोठा परोपकारीच कीं नाही तूं ! वन्संची सुटका म्हणजे स्वतःचें लग्न, असेंच कीं नाही ? बरें ! कळूं दे ती युक्ति.

**चकोर**—ताईनें दादासाहेबांना एक पत्र लिहावें की मी तुम्हांला नकोशी झालें होतें, म्हणून तुमच्या इच्छेप्रमाणे मीं प्राणत्याग केला. हें पत्र दादांनीं त्यांस नेऊन द्यावें.

**मनोहर**—आणि त्यांनीं मला इत्थंभूत वर्तमान विचारलें तर, खोटें रचून सांगायचें कीं काय ? आणि तेंहि इच्या वाइटाबद्दल ? तें मजकडून प्राणांतींहि होणार नाही. तरंगिणि, खोटेपणाचे परिणाम तुम्हांला माहीत नाहीत काय ?

( आये हो संयाना०—या चालीवर )

**निंद्य असे । वंचना । सत्यचि मूल असे नीतिलतेसी । उभयां दाही तीव्र विषें ॥ वंचना० ॥ ध्रु० ॥ करि अपाय त्या प्रेरित ज्यावरि । तेविं वंचकातें गृहभेद्यापरि । आत्मनाश कीं करि निमिषें ॥ १ ॥**

**तरंगिणी**—पण दादा,

( ओ डगारिया मैको०—या चालीवर )

**ही प्रसंगीं मानिति शास्त्रें वंचना । मृत्यु टळत वा लग्न जुळत तरि नच अनुचित करितांना ॥ वंचना ॥ ध्रु०॥ प्रेमें या वाग-विलें शिशुपणिं । स्वयें लाड सगळे पुरवोनी । घडत लग्न नच पतिभगिनीशीं तत्प्राण तरी रहातीना ॥ १ ॥**

आणि हें सारें करायचें कशाकरिता ?

**मनोहर**— मी सांगतों कशाकरिता तें; असें झालें म्हणजे विहारानें आपली प्रतिज्ञा पूर्ण करावी असा चकोर आग्रह धरणार.

**तरंगिणी**— शाबास ! प्रेमाचें वेड लागलेल्या माणसाशिवाय अशी कल्पना सुचावयाची नाही. मात्र चकोराला जें वाटतें की त्यांच्याकडून प्रतिज्ञा मोडणें

होईल, तसें मला नाही वाटत. आजचें एक असो पण एरव्ही त्यांचें मजवर कितीतरी निर्मळ प्रेम आहे !

**चकोर**—पुरुष किती चंचल स्वभावाचे असतात याबद्दल तुझी खात्री होईल.

**तरंगिणी**—बरें बघूं. पण बाजारांत तुरी आणि भट भटणीला मारी, अशातलाच आपला हा वाद आहे. अगोदर तें पत्र त्यांच्याकडे कोणी घेऊन जायचें हें ठरूं द्या.

**मनोहर**—तें काम चकोरच चागलें करील.

**चकोर**—पण मजवर त्यांचा विश्वास कसा बसावा ?

**मनोहर**—लोकांचा आपणांवर विश्वास रहावा म्हणूनच कधी खोटें भाषण किंवा वर्तन करूं नये. मी जर आज खोटेपणानें वागलों तर उद्या मजवर कोण भरंवसा ठेवणार आहे ?

**चकोर**—येवढें खरें की परक्यांच्या कारस्थानांमुळे व स्वकीयांच्या खरेपणामुळे मी आणि चंद्रिका जन्मभर दुःखात रहाणार !

**तरंगिणी**—दादा, तुझ्यावरच आता सारें अडून राहिलें आहे.

**मनोहर**—माझा काय उपयोग होणार ? मी जरी येथून विहाराला फसविण्याच्या उद्देशानें निघालों तरी तो उद्देश फसल्याशिवाय रहाणार नाही.

(तनत तन दरेना०—या चालीवर)

**अनृतमय वचना वद कसें। वदे वदन मम ज्यांतुनि अजवरि**
**जनिं नच कधिं अणूभरि वच ये मिथ्या असें ॥ध्रु०॥ करिहि**
**हा कसा अकार्यकारि अजी होई। जया ठावी न कृति कधि**
**अनुचित असे ॥ १ ॥**

**तरंगिणी**—दादा, अरे प्रयत्न करून पहा. साधलें तर बरेंच झालें, नाही तर ही काय गाजराची पुंगी ! वाजली तर ठीकच, नाही तर मोडून खाली !

**मनोहर**—तुझी इच्छा आणि चकोराचा मजवर बोल राहूं नये म्हणून मी तूं देशील तें पत्र घेऊन जातों; पण या खोट्या कामांत यश मुळीच येणार नाही हें मी आधीच सांगून ठेवतों.

**तरंगिणी**—निदान कोणी प्रश्न विचारल्याशिवाय आपण होऊनच बोभाटा करणार नाहीस असें तरी वचन देतोस का ?

**मनोहर**–कबूल ! मी होऊन कोणाला सांगणार नाही. कोणीं विचारलेंच तर मात्र सांगितल्याशिवाय रहाणार नाही.

**तरंगिणी**–तर मग मी आज संध्याकाळीं चकोराबरोबर आश्रमांत जाईन. तूं तिकडे जा. पहिल्यानें मला पत्र तयार करून ठेविलें पाहिजे. (जाते.)

**मनोहर**–(स्वतःशीं) आजवर इतके दुर्धर प्रसंग मजवर आले पण आजच्यासारखा प्रसंग कधी आला नाही. देवा ! यांतून निभावून नेण्याला तूंच समर्थ आहेस ! (जातो.)

**चकोर**– ( स्वतःशीं ) आता दादासाहेबांना ताईकडून असें दुसरें पत्र पाठविलें पाहिजे कीं दादांच्या खिशांत तुम्हांला सविस्तर मजकुराचें पत्र आढळून येईल त्यावरून साद्यंत मजकूर कळेल. कदाचित् दादा तुमच्या मनाला धक्का बसूं नये म्हणून लवकर कळविणार नाहीत, हें जाणून मुद्दाम लिहिलें आहे. या पत्रानें दादांना खोटें बोलण्याची पाळी कदाचित् येणार नाही, तरी पण ही वेळ एकंदरीनें आणीबाणीची खरीच. या ढोंगाचा परिणाम काय होतो तें कळेपर्यंत मनाची हुरहुर कांही केल्या रहाणार नाही. खोट्या कर्मांची शिक्षा तें करणारास लागलीच मिळते ती अशी ! पण मला अशी तळमळ तरी कां लागून रहावी ? कारण माझें साधन जरी निंद्य असलें तरी साध्य कांही तसें नाही. यानेंहि माझें समाधान होत नाही. शेवटीं आमच्या दादांचा धोपट मार्गच बरा असें ठरतें खरें ! ( जातो. )

## प्रवेश ५ रा

### ( हरिहरशास्त्री. )

**हरिहर**— ( स्वतःशीं ) मनोहरला मीं या डोळ्यांनीं पाहिला तेव्हां चूक होण्याचा कांही संभव नाही. तरंगिणीचा बेत बदलल्यामुळे बहुदा तीं दोघें मधूनच परतलीं असावीं. विहार आणि तरंगिणी हें जोडपें एकंदरींत फार प्रेमळ खरें ! लग्नापासून आजपर्यंत त्याचा कधी वियोग झाला नाहीं असें म्हणतात. तेव्हा आजचा वियोग तिला असह्य झाला हें योग्यच आहे. मला याचें स्वप्न आधीपासून पडलें होतें, म्हणून बरें झालें. नाहीतर मनोहराला मारण्याची ही सोन्यासारखी संधि वायां गेली असती. आता तो तरंगिणीला बरोबर घेऊन इकडेच येईल, व तिला पोहोंचवून परत जाईल. त्यावेळीं

त्याला ठरल्याप्रमाणे ठार करून येथून निघून जावें. आजच हें काम उरकलें म्हणजे माझा संशयहि कोणास येणार नाही. कारण, मनोहर परगांवीं गेला हें माहित असतां मी येथे कशाला टपून बसेन? अरे, पण हें विघ्न कशाला मध्येंच?

**भेंकडभट—** ( प्रवेश करून स्वतःशीं ) ज्या गोष्टीचा मला मनापासून तिटकारा तीच गोष्ट नेहमी माझ्या वांट्याला येते. तरंगिणीबाई आज एकाएकीं माहेरीं निघून गेल्या असें बाईसाहेबांना आता त्यांच्या नोकराकडून कळलें. पण त्या कां गेल्या हें कळण्यावांचून कांहीं अडलें होतें? पण भेंकडभट मिळाला आहे ना फुकटचा वाटेल तेव्हा इकडून तिकडे आणि तिकडून इकडे धाडायला? मला जर एखाद्या पिशाचानें तोंडांत टाकिलें तर बाईसाहेबांचें थोडेंच कांहीं खर्च होणार आहे? भेंकड मेला तर त्याचा बाप दुसरा तयारच आहे! तो मेला तर त्याचा काका तिसरा! श्रीमंतांमध्ये वारसा नेहमी वरून खालीं येतो. पण आम्हा नोकरांमध्ये तो खालून वर जातो; म्हणजे, मुलाकडून बापाकडे, बापाकडून आजाकडे! पण असा विचार करण्यांत वेळ घालवून काम थोडेंच चुकतें आहे? बरें, हा दिवा जो बरोबर आणिला आहे तो तरी धड असायला पाहिजे होता! सगळ्या मुलखाचा अंधुक! याच्या काजळीनें भोंवतालच्या अंधारांत भरच पडते आहे जशी! या दिव्यानें आम्हांला पिशाच दिसून पडण्यापूर्वी आम्हीच त्याला दिसावयाचे!

**हरिहर—** ( स्वतःशीं ) याचा दिवा मालवून याला थोडेंसें भेवडाविलें की झालें काम! ( दिवा मालवून मांजरासारखा ओरडतो. )

**भेंकड—** अरे भूत रे भूत! ( खालीं बसतो. ) दिवा मालवून कसें हुबेहुब मांजरासारखें ओरडलें! आता मी काय करूं? ही धडकी तर मुळीच रहात नाही. त्या गडबडींत दिवाहि खालीं पडला. आता अंधारांत जाऊं तरी कसा? आणि तें भूत जिन्यांतच दबा धरून बसलें असेल तर? ओरडलों तर उद्या बायकासुद्धा माझी थट्टा करतील. आता जिवाचा धडा केलाच पाहिजे. डोळे मिटून चालावें म्हणजे झालें. ( तसा चालतो. ) बाईसाहेबांनीं तरंगिणीबाईबद्दल विचारलें तर सांगावें झालें की, त्यांचा भाऊ मांजरानें ओरबाडल्यामुळे मेला असें त्यांच्या माहेरचें पत्र आल्यावरून त्या तांतडीनें निघून गेल्या! ( जातो. )

**मनोहर—** ( प्रवेश करून ) मी जसजसा विहाराच्या घराजवळ येऊं

लागलों तसतसें माझ्या अंगाला कांपरें सुटूं लागलें आहे; जीभ कोरडी पडून पायांतली शक्ति गेल्यासारखी झाली आहे. खोटें काम करायचें नाही असा निश्चय असून केवळ त्याच्या संसर्गानें जर माझी अशी स्थिति झाली आहे, तर ज्यांचा चरितार्थ खोट्या कामांवर चालावयाचा, त्यांना काय होत असेल? रात्रंदिवस सर्पदंशाप्रमाणे वेदना होत असतील! पण सर्पदंशानें शरीराला जशी अखेरीस बधिरता येते तशी त्यांच्याहि मनाला येत असेल.

**हरिहर**– ( स्वतःशीं ) माझी शिकार आली एकदांची येथे! अरे, पण हा एकटाच कसा? कारण कांही का असेना! हा एकटा आहे हें आपल्या पथ्यावरच आहे. आता दाखवावा याला हात! ( मनोहर पडद्यांत जातो. त्याच्या मागोमाग जाऊन लागलीच परत येतो. ) असा प्रहार दिला आहे डोक्यावर ठेवून की ताबडतोब गतप्राणच झाला पाहिजे. (पडद्याकडे पहातो)

**भैंकड**–( दिव्यासह प्रवेश करून )–( स्वतःशीं ) आज माझा घातवार दिसत आहे! एका संकटांतून सुटतों न सुटतों तोंच बाईसाहेबांनीं खाली काय पडलें हें पहाण्याकरितां पुन्हा धाडिलें आहे. ( पाहून ) अरे, हें काय! इथे प्रेत कोणाचें पडलें आहे?

**हरिहर**–( स्वतःशीं ) अथवा तो मेला कीं नाही हें हात लावून पहावें म्हणजे संशय रहाणार नाही. अरे, पण ही ब्याद आली पुन्हा! तर आता येथून पाय काढवा हाच उत्तम पक्ष! त्याच्या प्राणांबद्दलचा संयश फेडून घेण्याला इथेच थांबलों तर माझे प्राण संशयांत पडावयाचे! ( जातो )

**भैंकड**–( स्वतःशीं ) तें पहा भूत पळून गेलें याला मारून! आज त्याच्या मनांत कोणाला तरी बळी घ्यायचें होतेंसें दिसतें. माझ्यावरचें मरण याच्या वरच गेलें हें ठीकच झालें; फार चांगली गोष्ट झाली. अरे पण बिचारा विनाकारण प्राणाला मुकला ना! छेछे! मोठी वाईट गोष्ट झाली! पण मी वांचलोंना! अहाहा! माझा आनंद त्रिभुवनांत मावत नाही! पण हा मजबद्दल बळी पडावाना! हरहर! मला रडें आवरत नाही! (हुंदके देऊं लागतो.)

**एक नोकर**– ( प्रवेश करून ) अहो भैंकडभट, वा! जिकडे पाठविलें तिकडेच रमलांत वाटतें? बाईसाहेब अगदी अधीर झाल्या आहेतना! (भैंकडभट बोटानें पडद्यांत खादावितो तें पाहून ) काय प्रेत! हा काय घोटाळा आहे! भटजी, हें येथें काय पडलें आहे?

**भेंकड**– मला काय ठाऊकरे बाबा ?

**नोकर**–बरें दिवा करितां का जरा इकडे ? (दिवा जवळ) नेऊन काय ! मनोहरपंत ? आणि यांना मारलें कुणीं ?

**भेंकड**– भुतानें !

**नोकर**– भटजी, मला जरा हात लावा. आपण यांना आत घेऊन जाऊं.

**भेंकड**– मी नाहिरे बाबा हात लावायचा !

**दुसरा नोकर**–( प्रवेश करून ) अरे रावसाहेब आणि बाईसाहेब दोघेंहि घाबरून गेलीं आहेत आणि तुम्ही आपले स्वस्थच ना ?

**पहिला नोकर**– हे भेंकडभट मला हें उचलूं लागत नाहींत.

**दुसरा नोकर**– अरे कायरे बाबा हें !

**पहिला नोकर**– आधी हें प्रेत आत घेऊन जाऊं आणि मग सांगतों तुला. ( दोघे जातात. )

**भेंकड**– मला म्हणे उचलूं लाग ! आणि त्या प्रेताला शिवतांच माझ्या अंगांत एखादें पिशाच शिरलें असतें तर ! याच्या बापाचें काय जात होतें ? आता जलदी जाऊन हें सारें तिखटमीठ लावून आंत सांगितलें पाहिजे. ( जातो )

---

## प्रवेश ६ वा.

( पलंगावर **मनोहर** मूर्च्छित होऊन पडला आहे. जवळ **आनंदराव** उभे व **सरस्वती** बसली आहे. )

**आनंदराव**– अरे, तोंडाकडे काय पहात उभे राहिलांत ? जारे, कोणी डाक्टराला घेऊन या. ( एक नोकर जातो. स्वतःशीं ) पण तरंगिणीला पोहों-चवायला हे तिच्या माहेरीं गेले काय आणि इतक्यांत परतले काय ? साराच चमत्कार ! यांच्या खिशांत कांहीं कागद सांपडल्यास सुगावा लागेल. ( खिसा चांचपून एक पत्र काढितो. तें वाचून ) काय ! तरंगिणीनें जीव दिला ! काय मूर्ख बायका असतात पहा. या सटवीमुळे आता मला कोण यातायात पडणार आहे ! हें सारें प्रकरण दाबतां दाबतां माझी पुरेवाट होईल. जारे, विहारास लौकर इकडे बोलाविलें आहे म्हणून सांग. आणि तसाच आश्र-मांत जाऊन चकोरालाहि तोच निरोप सांग. ( दुसरा नोकर जातो. ) ही

बिचारी मघापासून कशी सारखी मनोहरपंतांच्याच खटपटींत आहे ! रोग्याची शुश्रूषा करावी अशी बायकांनींच ! तशात मनोहरपंत म्हणजे तिचा आवडता गुरु ! हें पाहिलेंस का ? तरंगिणीनें म्हणे आत्महत्त्या केली !

**सरस्वती**— सुटल्या बिचाऱ्या या संसारांतून ! मोठ्या भाग्याच्या त्या ( मनोहराच्या कपाळावर हात ठेवून ) अहो, होतील ना हे पुन्हा पूर्वीसारखे चांगले ? अजून नाडी चांगली चालली आहे.

**आनंदराव**–चांगले व्हावे म्हणून मी सारखी देवाची प्रार्थना करीत आहें.

**सरस्वती**— अजून मेला डाक्टर येत नाही !

**आनंदराव**–त्यांना कसची घाई आली आहे ! फी पदरांत पडली म्हणजे झालें ! मग रोगी मरेना का !

**सरस्वती**— इडापिडा टळो अमंगळ पळो !

**विहार**— ( प्रवेश करून )–( एकीकडे ) मी तिला कुठून जायला सांगितलें असें मला झालें आहे ! तिनें या शहरांतून निघतांना खांबांत टाकलेलें पत्र नुक्तेंच मला येऊन पोहोंचलें. त्यांत ती लिहिते की मी मनोहराबरोबर दुसरें एक पत्र देऊन लवकरच पाठविणार आहें. त्यावरून सर्व मजकूर ध्यानीं येईल. त्या पत्रांत काय मजकूर असेल बरें ? मला वाटलें होतें त्याप्रमाणे तिनें स्वतःच्या जिवाला कांहीं भलतें सलतें तर नाहींना करून घेतलें ? ही शंका येऊन पाऊलच उचलत नाही. मनोहर इतक्या लवकर परत आला आणि आल्याबरोबर मूर्छित झाला यावरून घडगत दिसत नाही. काय नशीबीं असेल तें खरें.

**आनंदराव**— विहारा, मनुष्यानें विवेकाच्या बळानें मन आवरून धरिलें पाहिजे. या संसारांत असे प्रसंग यावयाचेच !

**विहार**— बाबा, पण झालें काय असें ?

**आनंदराव**— संकटीं जो डगमगत नाही तोच खरा ज्ञाता ! त्यावांचून सगळे मूर्ख !

**विहार**— बाबा, आता माझा अंत पाहूं नका. माझ्या फुटक्या नशीबीं काय आहे तें मला अर्धें मुधें कळून चुकलें आहे. (आनंदरावांच्या हातांतील पत्र हिसकावून घेतो. वाचून ) हरहर ! हें प्रियेचें अखेरेंचच पत्र तर ? तिनें जीव दिल्यावर हें मनोहराच्या हातीं लागलेलें दिसतें. अरेरे ! माझा अविचारच

त्या बिचारीला भोंवला ना ? मूर्खा विहारा ! मूर्तिमंत लक्ष्मी तुझ्या घरांत नांदत होती, ती तुला पाहवली नाहीं ना ? आता काय उरलें आहे ? माझ्या संसाराचें मातेरें झालें, सुखाचा विध्वंस झाला, आनंदाची राखरांगोळी झाली ! आता जन्मभर रडण्यापलीकडे काय उरलें आहे ?

( बालम मोरा०– या चालीवर )

**जीव नकोसा । वाहुं कसा ॥ ध्रु० ॥ ग्रास मधुरसा । मृत्युने चोर जसा । पुन्हा मुख सहसा ॥ दावी कैसा ॥ १ ॥**

**आनंदराव**— विहारा, असा शोक करून ती थोडीच परत येणार आहे ? आपण कितीहि रडलों, आक्रोश केला तरी घसा कोरडा पडण्यापलीकडे काय व्हायचें आहे ? याप्रमाणे आकांत चालू ठेविलास तर एकाबद्दल दोन प्राण मात्र जातील; कारण हे पाहा मनोहरपंत मघापासून कसे निश्चेष्ट होऊन पडले आहेत !

**विहार**— खरेंच ! हे प्राणसंकटांत पडले असून मी मूर्ख यांच्याजवळ आपलेंच रडगाणें गातों आहे ! धिःकार असो मला !

**आनंदराव**–तुला इतका शोक होण्याचें कारण तुम्हा उभयतांमध्ये जें अत्यंत प्रेम होतें तेंच आहे. मनुष्यानें याप्रमाणे एकाच वस्तूवर आपलें सुखसर्वस्व कधी अवलंबून ठेवूं नये. नाहीतर ती वस्तु नाहींशी होतांच त्याला सर्व संसार शून्य वाटूं लागतो. प्रत्येक वाईट गोष्ट ईश्वर आपल्या हिताकरिता घडवीत असतो हें जर खरें असेल तर आजच्या या हानीपासून तुझ्यासारख्या विचारी मनुष्याला एक धडा घेतां येईल. आजपासून आपलें चित्त संसाराच्या विविध अंगांकडे लावण्याचा निश्चय कर. असें केल्यानें आत्यंतिक सुख जरी मिळालें नाहीं तरी आत्यंतिक दुःख मात्र खात्रीनें चुकतें.

**विहार**–बाबा, आपण मला हें चित्त अनेक विषयांकडे लावण्याचा उपदेश करितां हें ठीकच आहे; पण तें आता मला अशक्य आहे.

( चलते दमका अब नाहीं०– या चालीवर )

**यापुढती रुचि कांहि नुरे या नीरस संसारीं । निर्जन अटवीसम मज भासे जगती ही सारी ॥ ध्रु० ॥ मानसहंसी कोपुनि जातां । शून्य न होइल का हृत्कासारीं ॥ १ ॥ कितिक मनोरथ केले मिळुनी । होति वृथा या कालीं निर्धारीं ॥ २ ॥**

( डॉक्टर येतो. )

**आनंदराव**–डाक्टरसाहेब, आपणाला मुद्दाम घाईनें बोलावण्याचें कारण हें पाहा. अर्धा घंटा झाला, हे असेच बेशुद्ध होऊन पडले आहेत.

**डाक्टर** यांना तापहि बराच आला आहे. ठेंच लागून पडल्यासारखे दिसतात.

**सरस्वती**– डाक्टरसाहेब, बरे होतीलना हो हे ? दिवसगत लागली तरी हरकत नाही. पण चांगले खडखडित बरे झाले पाहिजेत. पैसे वाटतील तितके खर्च करण्याला आम्ही तयार आहोंत. मी स्वतः दिवसाची रात्र आणि रात्रीचा दिवस करून यांच्या पथ्यापाण्याचें करीन. यांना बरे मात्र करा.

**डाक्टर**–बाई, मनोहरपंतांबद्दल तुम्हांला वाटते तितकीच कळकळ मलाहि वाटते. ते आम्हांस सोडून गेले तर आमच्यांतील एक अत्यंत सुशील व परोपकारी गृहस्थ गेल्यासारखें होईल. तुम्ही स्वस्थ असा. कांही काळजी करण्याचें कारण नाही. मी आपलें सर्व कौशल्य खर्च करून यांना बरें करीन.

**सरस्वती**–– (एकीकडे) आता माझ्या जिवांत जीव आला. जय कुळस्वामिनी! यांना लवकर आराम पडूं दे म्हणजे तुझी ओटी खणानारळांनीं भरीन !

**चकोर**–( प्रवेश करून )–(स्वतःशीं) दादांना जो हा अपघात झाला तो सारा माझ्या आपलपोटेपणाचा परिणाम ! त्यांनीं आज माझी भयंकर प्रसंगांतून मुक्तता केली तिजबद्दल मीं अधमानें त्यांस चांगलें बक्षीस दिलें ! काय त्यांचें मजवरचें निःसीम प्रेम ! (मनोहराजवळ जाऊन) दादा ! दादा ! मी तुमचा चकोर आहें. माझ्याशीं बोला तरी दोन शब्द !

**मनोहर**–(सावध होऊन ) कोण ? चकोर ?

**डॉक्टर**–हं, मनोहरपंत, आता एक शब्दहि न बोलतां स्वस्थ पडून राहा नाहीतर ताप विकोपाला जाईल. (चकोर डाक्टरच्या कानाशीं कुजबुजतो.)

**चकोर**– ( स्वतःशीं ) डाक्टरच्या सांगण्यावरून कांही भिण्याचें कारण दिसत नाहींसें दिसतें. आता बेशुद्धि जाऊन नुस्ता तापच राहिला आहे.

**विहार**–(उठून मनोहराजवळ येऊन) मनोहरा, तिनें मरणापूर्वी तुलाहि कांही सांगितलें नाही ना ?

**डॉक्टर**–त्यांच्याशीं कोणी बोलूं नका म्हणून सांगितलें ना ?

**विहार**–चकोरा, तिचें मुख तरी शेवटचें पाहायला मिळेल का ? का तीहि आशा राहिली नाही ? बोल, बोल तुला कांही माहित असलें तर ?

**चकोर**–या प्रसंगानें तो प्रसंगहि मागे पडल्यासारखा झाला आहे. एका दिवसांत ताई आणि दादा सोडून गेल्यावर मला वेडच लागेल. हल्लींच मला कसें बावरल्यासारखें झालें आहे. तरी पण मी तुम्हांला तूर्त इतकें सांगतों कीं ताईच्या माहेरच्या गांवाला निघाल्यानंतर दोन घटकांच्या आत व पहिला मुक्काम गांठण्याचे पूर्वीच ताईनें विहार पाहिली; आणि पंचनाम्याच्या भीतीमुळे दादानीं ताबडतोब दहन उरकून इकडे येण्याचें केलें हें त्यांच्या बरोबरच्या चाकरानें सांगितलें.

**विहार**– हाय ! हाय ! तिचें मुखदर्शनसुद्धा आता होणें नाही ना ? तरंगिणि ! तरंगिणि ! मनोहरपंत, गेलीच ना ती याला सोडून ?

**मनोहर**– तरंगिणी स्वस्थ आणि खुशाल आहे.

**विहार**– हो स्वस्थच नाहीतर काय ! मरणाच्या भयांतून कायमची मुक्त झाली बिचारी !

**मनोहर**– तिच्याबद्दल कांही काळजी करूं नका; ती सुखरूप आहे.

**आनंदराव**– हें पाहा यांचें मस्तक तापानें भ्रमण करूं लागलें.

**मनोहर**– माझें मस्तक नाही, तर तुमचें मस्तक भ्रमण करीत आहे. मी सांगतों त्यावर पूर्ण विश्वास ठेवा. न ठेवाल तर मागाहून पश्चात्ताप होईल. पुन्हा मला याबद्दल बोलण्याची संधि येणार नाही; माझ्या खोटेपणाला देवानें चांगलें शासन केलें.

**आनंदराव**– अरे अरे ! फारच बहकला !

**डॉक्टर**–यांना आता मुळीच त्रास देऊं नका. आणि यांच्या बहिणीच्या मरणाचा विषय तर हे पुन्हा पूर्णपणें बरे होत तोंपर्यंत यांच्या देखत काढूं नका. त्या मरणाचा यांच्या मनाला चांगलाच धक्का बसला आहे. मी म्हणतों हें जर कबूल करीत असाल तरच मी औषध सुरू करितों.

**विहार**– मी शपथ घेतों त्याबद्दल. दोन वेळां मीं यांना प्रश्न विचारिले ते केवळ शोकावेगामुळे.

**डॉक्टर**– ठीक आहे तर. मी घरून औषध तयार करून पाठवून देतों, तें सुरू करायचें. पंधरावीस दिवसांत हे पुन्हा पूर्ववत् होतील.

**सरस्वती**– पथ्यापाण्याचें कसें काय ?

**डॉक्टर–** पथ्य यांच्या बहिणीच्या मरणाच्या विषयाचें ! ( जातो. पडदा पडतो. विहार व चकोर बाहेर येतात. )

**विहार–** चकोरा, आज मी जी अपशकुनी प्रतिज्ञा करून चुकलों, तीच मला बाधली शेवटीं.

**चकोर–** जाऊं द्या तिचा विचार ! थट्टेंत केलेली प्रतिज्ञा काय मनावर घ्यायची आहे ?

**विहार–** थट्टेंत ! चकोरा, तूं उदारपणानें मला प्रतिज्ञेंतून मोकळा करूं पाहात आहेस. पण माझा निश्चय ठरला की माझी अर्धांगी गेल्यामुळे निष्प्रभ झालेला हा देह परोपकारांत झिजवून आमरण संन्यस्तवृत्तीनें राहावयाचें. विधवा जशा केशवपनानें तोंड विद्रूप करून घेतात तसें–

**चकोर–** तसें म्हणजे ? मुंडन करणार की काय ?

**विहार–** तसें करण्याला मी तूर्त मोकळा नाही. परंतु त्याऐवजीं बैराग्या-प्रमाणे केंस वाढवून हें काळें तोंड विद्रूप करून टाकणार. सारांश काय, की माझी प्रिया माझ्या मरणानंतर ज्या व्रतानें राहिली असती, त्या व्रतानें वागून मी यापुढे कालक्षेप करणार ! ( जातो. )

**विहार–**(स्वतःशीं) दादांनीं ताईच्या कुशलाबद्दल सांगितलें तेव्हा वाटलें की आता आमचें कपटनाटक उघडकीला येणार ! पण पुढे सगळें बिनबोभाट पार पडलें. आता दादांच्या शुश्रूषेला लागून माझ्या मूर्खपणामुळे उद्भवलेला रोग घालविण्याच्या मार्गाला लागलें पाहिजे.

( साकी )

**अदूरदृष्टि स्वार्थवृत्ति मम सुज्ञ उदारहि बंधु ।**
**नेइ कालमुखिं अन्य मिळेना ऐसा जातां शोधूं ॥**
**देहा झिजवुनियां । ओढित मृत्युमुखांतुनि त्या ॥ १ ॥**

( पडदा पडतो. )

---

## अंक चवथा : : प्रवेश पहिला

(हरिहरशास्त्री)

हरिहर– ( स्वतःशीं ) एकेकाच्या दैवाचा काय जोर असतो पाहा ! मनोहराला स्वर्गी पाठवावें म्हणून त्याचा कपाळमोक्ष करण्याचा मीं प्रयत्न केला. पण त्याच्या कपाळींची रेषा घड असल्यामुळे तो या भूलोकींच स्वर्गसुख अनुभवितो आहे. त्याचें नशीब शिकंदर म्हणून त्याच्याकरिता असंभाव्य गोष्टीहि घडून आल्या ! मत्सरग्रस्त मनुष्याच्या हाताचा सपाटा, पण काळोखामुळे त्याला तो नीट बसला नाही. बरें, खात्री करून घेण्याकरिता दुसरा तडाखा लगावावा तों तो सगळ्या मुलखाचा भित्रा भैंकडभट, की जो साऱ्या जन्मांत दोनचार वेळांच अंधरांत गेला असेल, तो तेथे दत्त येऊत उभा राहिला. लागलीच मनोहराला आंत नेऊन त्याची नीट व्यवस्था लावण्यांत आली. आणि या घटकेला तर त्याच्यासारखा सुखी तोच ! गुडघ्यायेवढा बिछाना लोळायला आणि अप्सरेसारखी स्त्री शुश्रूषा करावयाला ! औषधाच्या घुटक्याबद्दल त्याला एखादे वेळीं चुकून अधरपानच मिळत असल्यास नवल नाही. रात्रंदिवस असें सौंदर्य जवळ असल्यावर मनोहराचें तत्त्वज्ञान जागचे जागींच विरघळून गेलें असलें पाहिजे. पूर्वी तरी तो बोले तसा निर्लेप होता कीं नाही कुणास ठाऊक ? तुर्कस्थानाच्या बादशहाप्रमाणे शंभरापेक्षाहि अधिक स्त्रियांचा जनानखाना तयार करणारी ही स्वारी शुक्राचार्यांचा अवतार असणें मुळीच संभवत नाही. मला सरस्वतीपासून दूर करण्याची कल्पना त्याला निवळ परोपकारबुद्धीनें सुचली नाही खास. आणि हल्ली तर प्रत्येक गोष्टीची अनुकूलता ! मला तर निःसंशय वाटतें की त्या दोघाचें मेतकूट यापूर्वी जमलें असेल, किंवा लवकरच जमेल. हें मेतकूट सरस्वतीच्या नवऱ्याला प्रत्यक्ष चाखायला मिळेल तर काय बहार होणार आहे ! म्हणजे मनोहरानें जसा आपल्या प्राणसंकटाचा उपयोग करून घेतला तसा मीहि आपल्या दुर्दैवाचा उपयोग करून घेतल्यासारखें होईल. पण हें घडावें कसें ? मला तर आनंदरावांच्या घरीं जाण्याला मज्जाव. तेव्हा एक तर त्याला घराबाहेर कुठें तरी एकीकडे गांठलें पाहिजे, किंवा घरांत मालकीण नाही असें पाहून व चाकरलोकांची मूठ दाबून

आपला लाग साधला पाहिजे. या गोष्टीला थोडासा विलंब लागला तरी पुरवला; पण काम मात्र हटकून झालें पाहिजे. ( जातो. )

## प्रवेश २ रा

( मनोहर व सरस्वती )

**मनोहर–** सरस्वति, काय म्हणतेस मी पंधरा दिवस सारखा निश्चेष्ट पडलों होतों ?

**सरस्वती–** आता आपण पुरतेपणीं बरे झालां आहांत म्हणूनच मी हें आपणांला सांगितलें.

**मनोहर–** मला ताप चढल्यावर मी जो बेशुद्ध झालों त्यानंतरचा आणि सावध होण्याच्या पूर्वीचा काळ मला सुखमय निद्रेप्रमाणेच वाटला. मरण आणि पुनर्जन्म यांचा हा मला एक अनुभवच मिळाला म्हणावयाचा !

( मोहनीकी लागे राम०–या चालीवर )

**मम रोगमुक्ति नव जे । पुनर्जन्मशी साजे ॥ ध्रु० ॥ मूर्छोन्मुक्त पुरुष परिचित जनसमूहिं निजसंज्ञा । पुनरपि मिळविति म्हणुनि तत्स्मृति प्रिय वाटे त्यांना ॥ १ ॥ जननांतरि जरि लाधे स्मृति ती पूर्वीची पुरुषा । शून्य गणुनि जग मग तो होता सिद्ध आत्मनाशा ॥ २ ॥**

**सरस्वती–**आपणांला वाटतें की पुनर्जन्म अगदी परक्या लोकात घडून येतो, तसें मला नाही वाटत. मरतांना आपली जी वासना असते तिजप्रमाणे दुसरा जन्म मिळतो म्हणतात. आता मरणकाळची वासना प्रियजनांस सोडून थोडीच असणार आहे ! म्हणून जन्मांतरीं आपल्या भोंवतालची मंडळी पूर्व परिचयाचीच पण भिन्नदेहधारी असली पाहिजे.

( नैना लगाये मेरे०–या चालीवर )

**जिथें परमरुचि । दिसेल हृदयिंचि । गतजन्मींची । ओळखची ॥ ध्रु० ॥ अपुल्याविषयीं सप्रेमादर मनिंचा अपरंपार । पाहुनि वाटे जननांतरिंचा यासि असे आधार ॥ धरि आत्मा स्मृति जन्मांतरिं कर्मादिची ॥ १ ॥**

चकोराचा आणि चंद्रिकेचा असाच जन्मांतरींचा निकट संबंध असून तो मेला निमित्ताला मात्र पति झालेला म्हतारा त्याचा त्या जन्मींचा वैरी असावा. तोच प्रकार विहार आणि तरंगिणी यांचा.

**मनोहर**–खरेंच, विहार हल्ली कुठे आहे ?

**सरस्वती**– हल्ली तरंगिणीच्या मरणामुळे ते अगदी विरक्त होऊन गेले आहेत. उरलेलें आयुष्य परोपकारात वेचायचें असा त्याचा निश्चय झाला असून त्याप्रमाणे त्यांनीं शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या मुलांना शिकवण्याचें सुरू केलें आहे.

**मनोहर**–( हंसून ) हें त्याचें केवळ स्मशानवैराग्य आहे. त्याचा स्वभाव फार प्रेमळ आणि उतावळा आहे. त्यामुळे तो लवकरच कोणत्या तरी तरुणीच्या मोहांत पडल्यावाचून रहाणार नाही.

**सरस्वती**–विधुर प्रेमळ असला म्हणजे तो स्त्रियांच्या सहवासांत आपला निर्धार सोडून चंचळ झालाच पाहिजे, असा कांही नियम नाही. आपलें स्वतःचेंच पहाना ! आपणाला अलमात नेहमी स्त्रियांचाच सहवास, असें असतांना आपलें व्रत चालूच आहे कीं नाही ? आपण आश्रम सोडून इकडे जरी आलांत तरी माझी कटकट आपल्याभोंवती असतेच. आपल्या आजारात तर चकोर आणि मी आपल्याजवळ सारखे बसून होतों.

**मनोहर**–खरेंच सरस्वति, मी तुझा कसा उतराई होऊं सांग बरें ?

( तुजे मालरानी०–या चालीवर )

**खरी जन्मदात्री । झालीस धात्री ।। केलीस सेवा स्वयेंची**
**सुगात्री ।।ध्रु०।। दिधलेंसि असुदान । स्वप्राण अवगणुन । देवी**
**असासि कीं न मम अधिष्ठात्री ।। १ ।। असती तव अपार ।**
**मजवरति उपकार । फेडूं शकें ते न इह वा परत्रीं ।। २ ।।**

**सरस्वती**– येवढयाकरिता कांही मीं हा विषय काढिला नाही. शिवाय मी आपली सेवा करीत होतें ती केवळ मनाच्या उल्लासानें आणि हौसेनें.

**मनोहर**–तरी पण जाग्रणानें आणि चिंतेनें तुझी काय स्थिति झाली आहे ही !

( दिंडी ) **नयन गेले खोल हे काळजीनें । तयांभोंवति परिवेष**
**कृष्ण वर्णें ।। दिसति पांडुर जागरें गाल हेही । तयांवरची**
**रक्तिमा नेत्रिं येई ।। १ ।।**

पुष्कळदा आजारांत रोगी आणि त्याची शुश्रूषा करणारा यांच्या व्यापारांची अदलाबदल होते. म्हणजे शुश्रूषा करणारा श्रमामुळे रोगी बनतो आणि रोगी त्याची सेवा करूं लागतो. एकापासून मृत्यु जितका दूर जातो तितकाच तो दुसऱ्याच्या जवळ येतो.

**सरस्वती**–( एकीकडे ) इतकें माझें भाग्य कुठचें !

**मनोहर**–सरस्वति, तूं मला आईप्रमाणे प्राणदान दिलेंस, मुलीप्रमाणे माझी सेवा केलीस, आणि बहिणीप्रमाणे मला प्रेमानें वागविलेंस याबद्दल मी तुला काय देऊं ? देह अर्पण केला तरी कमीच होणार आहे !

**सरस्वती**–( एकीकडे ) आता धीर करावाच. ( उघड ) हीं तीन नातीं सोडून उरलेलें जवळचें नातें आपणांशीं ठेवण्याची मला मोकळीक असावी आणि आपला देह अर्पण करण्याऐवजी माझ्या देहाचा स्वीकार करावा. आपणांला मला बक्षीस द्यायचेंच असेल तर हें द्यावें.

**मनोहर**– काय म्हणतेस ?

**सरस्वती**– यापेक्षा उघड करून काय सांगूं ?

( कैसे कटेरि सजनी ०–या चालीवर )

**तनु ही स्वीकरुनी । चरणनिहित, प्रणयें भरली हृदयरमण मम धन्य करा मज सकल युवतिजनिं ॥ध्रु०॥ व्याकुल शरिं करि भारी स्मर हा । रक्षा मजसी त्यासि निवारुनि ॥ १ ॥**

**मनोहर**–काय ? तुझ्या पतीचा अधिकार बळकावूं ? सरस्वति, हीच का तूं माझ्या मनाची परीक्षा केलीस ? तुला पत्नीधर्माची ओळख करून देण्याकरिता मला ठेविलें आहे हें तूं विसरतेस.

**सरस्वती**–– आपण माझ्याशीं पतिधर्मानें वागावें म्हणजे मला पत्नीधर्म निराळा शिकवायला नको.

**मनोहर**– शिवशिव ! सरस्वति, एकदा बोललीस तें बोललीस. पण,

( मोरे नै लगन०–या चालीवर )

**वचना पुन्हा न वद या । अपुल्या मधुरशा शरीरा न मळविं मलिन मतिसि अवसर मनिं देउन ॥ध्रु०॥ पावित्र्यशून्यें सतत अंतरंगें । विमल देह भासे खचित मलिन ॥ १ ॥**

**सरस्वती–** महाराज यांत अधर्म कसचा ? चकोराचा चंद्रिकेशीं विवाह झाला तर तो दुराचरणाखालीं येईल का ?

**मनोहर–** तिचा पति गत झाला आहे.

**सरस्वती**–मी भीड सोडून बोलतें याची क्षमा असावी. पण माझे पतीहि मला तसेच झाले नाहीं का ? फार काय सांगूं ? पण त्यापलीकडेहि शोचनीय माझी स्थिति झाली आहे !

( काहेको दिनि संया०– या चालीवर )

**दोहिंकडुनि मज जाच करी ही कांचणि मेली ॥ध्रु०॥ प्रेमलव पतीविषयीं नसतां तत्सेवा ये भालीं ॥ १ ॥ अपुल्या पायीं मन वाहियलें दर्शवे न कधिं कालीं ॥ २ ॥**

**मनोहर–** आपल्या स्थितीचा विचार नेहमी आपणांहून हीन स्थितीशीं तुलना करूनच माणसानें करीत जावा.

( आन परी दरबार०–या चालीवर )

**हृदयिं करीं सुविचार । ऐसा ॥ ध्रु० ॥ तव नाथाच्या सम दुर्मिळ जगिं । स्त्रीप्रेमा अविकार ॥१॥ किति साध्वींसी तत्पति छळिती । कटुवचनीं अनिवार ॥ २ ॥**

**सरस्वती–** खाटकाच्या गाईपेक्षा मी सुखी आहें खरी !

**मनोहर––** शिवाय जों जों सुख कमी तों तों त्याच्या नाशाची भीतीहि कमीच. पर्वतशिखरीं उभा राहिलेल्यास सभोवतालच्या रम्य देखाव्याचें दृष्टिसुख अधिक तर खालीं पडण्याची भीतिहि फार. दुःखाची आणि सुखाची गोळा-बेरीज नेहमी एक असते. संसारसुख मिळत असलेल्या स्त्रीचा पति आजारी पडून जीवितसंशयांत असला म्हणजे तिला किती काळजी लागून राहात असेल बरें ?

**सरस्वती**-याचा मला गेल्या पंधरवड्यांत पुरताच अनुभव आला.पण महाराज, अशा स्त्रीचा प्रेमळ पति दुर्दैवानें गत जरी झाला तरी त्याच्या सुखकर सहवासाची आठवणसुद्धा मजसारख्या अभागिनीच्या विवाहसुखापेक्षा शतपट बरी !

**मनोहर–** असें म्हणूं नकोस ! आनंदराव आपल्या अर्धांगीच्या अगदी अर्ध्या वचनांत असतात कीं नाहीं ?

**सरस्वती**— महाराज, मला आपण त्यांची अर्धांगी थट्टेंतसुद्धा म्हणूं नये अशी विनंति आहे.

**मनोहर**— इतका तिटकारा येण्याचें कारण ?

**सरस्वती** — आपण सर्व जाणत असून माझ्या तोंडून वदविण्यांत काय अर्थ ? पण आपली तशी इच्छाच असेल तर ऐका. त्यांनीं माझ्यासारख्या अल्पवयस्क मुलीबरोबर तिच्या इच्छेविरुद्ध लग्न केलें, आणि तिच्या सुखाचें मातेरें केलें हाच त्यांचा सर्वांत मोठा अपराध. वयांमध्ये इतकें अंतर असल्यामुळे साहजिकच त्यांच्या आणि माझ्या मतांत, विचारांत, आचारांत, हेतूंत पदोपदीं अंतर दिसून येऊं लागलें, परंतु हें त्यांना फार उशीरानें कळलें. त्यानंतर मला आपल्या कलाप्रमाणें वागविण्याऐवजी तेच माझ्या कलाप्रमाणे चालूं लागले; आणि मला भारदस्त करण्याऐवजी स्वतःच बालिश बनले. मी पैठणीचा हट्ट धरिला की त्यांनीं ती आणविलीच. मौक्तिकहार हा शब्द माझ्या कंठातून निघतो न निघतो तोंच तो पदार्थ माझ्या कंठांत पडला म्हणून समजावा.

**मनोहर**— हें तर सारें प्रेमाचें दर्शक आहे. यावरून तुझी कृतज्ञता आणि प्रीति जागृत व्हावयास पाहिजे होती.

**सरस्वती**—यामुळे माझा द्वेष मात्र वाढला. त्यांनीं जर माझा शब्द याप्रमाणे झेलला नसता तर त्यांचा तिटकारा करण्याचें समाधान तरी मला मिळालें असतें. पण त्यांनीं माझी प्रत्येक हौस पुरवून मला तेंहि समाधान ठेविलें नाही.

**मनोहर**— वाः ! काय ही विचारांची संगति ! तुला तिटकारा येण्याला त्यांनीं जागा ठेविली नाही म्हणून तुला त्यांचा तिटकारा येतो ?

**सरस्वती**—आमचा जोडा जसा विजोड तसेच माझे विचारहि विसंगत असल्यास नवल काय ? कडू बीजापासून कडूच फळें निघावयाचीं. महाराज, आपण जर माझ्या दृष्टीस पडलां नसतां तर मी माझ्या दुःस्थितींतहि सुख मानून काळ कमाबसा कंठिला असता; पण आपली (मनोहर मूर्ति, उदार मन आणि प्रेमळ स्वभाव) हीं जेव्हा माझ्या नजरेस आलीं तेव्हा अशा पुरुषाबरोबर माझें आयुष्य किती सुखांत गेलें असतें, हा विचार येऊन मला माझ्या पतीचा फारच राग आला. आपण विधुरावस्थेंत आहांत हें पाहून तर त्या रागाला फार भरती आली.

( सखेरी का करुना० – या चालीवर )

**वधें मी जई मधुर मूर्ति ही । वृत्ति सकल तन्मय होऊनी जाति चरणिं आकर्षुनि नच ठरति हृदयिं ॥ ध्रु० ॥ होय असह्य विवाहपाश मज । गमत फार कटु तुटुं सजे दृढहि ॥ १ ॥**

**मनोहर**–बरें, या थराला गोष्टी येत तोंपर्यंत तुला माझ्या सहवासांत काळ घालवायला सांपडला याला कारण कोण ?

**सरस्वती**— याला कारण त्यांचा भोळसरपणा !

**मनोहर**—भोळसरपणा नव्हे तर त्यांचा आपणा उभयतांवरील विश्वास ! त्यांनीं जो हा आपणांवर विश्वास ठेविला तो आपण विश्वासघात करावा. म्हणून कीं काय ? त्यांनीं आपलें अर्धांगीरूप उत्तमांग माझ्या अंकावर ठेविलें असून मी जर तें त्यांच्यापासून वेगळें करीन तर तें पातक कुठे फेडूं ?

**सरस्वती**— आपण दृष्टांतांत अर्धांगीला अंकावर घेण्याचें म्हटलेंत तसें खरोखरीच घेऊन मग मला दूर केलें तर मला नाही इतकें वाईट वाटणार. पण महाराज, येवढा तरी मजवर अनुग्रह कराच ! आपण मघाशीं म्हणलांत त्याप्रमाणे खरोखरच आपला ताप नाहीसा होऊन तो मजमध्ये संचारला आहे. तर तो आपल्या हिमतुल्य आलिंगनानें नाहीसा करा. मी आपला ताप बरा होण्याचे कामीं उपयोगीं पडलें हें जर खरें असेल तर माझा संताप नाही का आपण नाहीसा करणार ?

( भैतो संयाकी प्यारी दुलारी० – या चालीवर )

**मनिं शंकुं नका सेवुंया यौवना पूर्णबिंबा । प्रिया । करुनि न विलंबा । हा न अवसर पुनरपि निजकरगत होइल चिर । प्राप्त सुसमय थोर सुखमय साधुं संधि ही स्वर्णसंनिभा ॥ ध्रु० ॥ दाह होई फार देहीं मुळिं धरवेना धीर । दीनपरिपालन तुमचें व्रत राखावें नरवीर ॥ बुडें मी नीरें मला परतीरिं पोंचवा धा मज निर्धारिं । करालंबा ॥ १ ॥**

**मनोहर**–(एकीकडे) अरेरे ! ही अगदीच अनावर झाली !

**सरस्वती**–महाराज, आपली जी चोहोंकडे कीर्ति आहे ती खरी करून दाखवा.

( सावरिया मन भायोरे०— या चालीवर )

**तुम्ही अनाथांचे कैवारी ॥ ध्रु० ॥ स्त्रिया आजवरि रक्षियल्या किति । एकचि का भारी ॥ १ ॥ मजसम करुणापात्र मिळेना जगति दुजी नारी ॥ २ ॥**

**मनोहर—** सरस्वती, हल्ली रात्रीचा अंमल आहे. ज्याप्रमाणे जगतावर त्याप्रमाणे मनुष्याच्या मनावरहि ती अंधकार पसरते.

( प्रबल दल साज०— या चालीवर )

**तिमिरमय होय रजनी करी कालिं या ॥ कृष्णमति हृदयिं अनियंत्र राज्या ॥ ध्रु०॥ जन करिति समयिं या । घोर कर्में जया । दिनमुखीं स्मरुनियां । वरिति लज्जा ॥ १ ॥**

मनुष्यानें नेहमी अशीं कृत्यें आणि भाषणें करावीं की त्यांचा त्यास कधी पश्चात्ताप होऊं नये.

**सरस्वती—** माझ्या पतींनीं लहान मुलीशीं लग्न करण्यांत जें निंद्य कृत्य केलें त्याचींच फळें माझे पापी विचार व अमर्याद भाषणें हीं होत. त्यांची जबाबदारी मजवर नाही, त्यांजवर आहे.

**मनोहर—**अशा दुःसह स्थितींत जर तूं शुद्ध आचरण ठेविलेंस तर तुझ्या सद्‌गुणांची जग वहावा करील. सर्व सुखें अनुकूल असतां सुदगुणी रहाण्यांत कांही विशेष नाही आणि त्याची लोकांत कांही किंमतहि नसते.

**सरस्वती—**जर माझा इष्ट हेतु पूर्ण झाला तर मला लोकांच्या स्तुतीची किंवा निंदेची चाड कशाला पाहिजे ?

**मनोहर—** आपल्या मनोदेवतेच्या खालोखाल आपणांस समाजाची पर्वा बाळगिलीच पाहिजे. जें कृत्य मनोदेवतेलाहि पसंत नाही आणि समाजालाहि नाही असें कृत्य केलें असतां मनुष्याला अंतर्यामीं असमाधान राहून बाहेरूनहि छळ होतो. आपण समाजसागराचे बिंदु आहोंत तोंपर्यंत आपणांला त्याच्या इच्छेकडे दुर्लक्ष्य करितां येत नाही.

**सरस्वती—**समाजानें माझ्यासारख्या स्त्रियांवर काय दया केली आहे म्हणून त्यांनीं त्यास मान द्यावा ?

**मनोहर**—अजून आपल्या समाजशासनांत सुधारणा करण्याला पुष्कळ जागा असेल. पण म्हणून समाजाच्या अस्तित्वामुळे आपणांस काहीच फायदा होत नाही असें म्हणणें चुकीचें आहे. समाज आहे म्हणून आम्हांला खाणें पिणें वस्त्रप्रावरणें वेळेवर मिळतात. समाज आहे म्हणून आम्हांस स्वस्थपणे दिवसा व्यवसाय करितां येतात व रात्रीं विश्रांति घेता येते. समाज आहे म्हणून पत्रें, पुस्तकें, मासिकें इत्यादि मनोरंजनाच्या गोष्टींचा आम्हांस लाभ होतो. फार कशाला, समाज आहे म्हणूनच आम्हांस ईश्वरप्राप्तीचा मार्ग निर्वेघ्नपणे चालवितां येतो. बरें या सगळया कामगिरीबद्दल समाज वेतन किती अल्प मागतो तर तुम्ही दुसऱ्याच्या वस्तूस हात लावूं नका, मग ती वस्तु पैसा असो, मिळकत असो, कीं भार्या असो.

**सरस्वती**—एकमेकांवर प्रेम करणारीं स्त्रीपुरुषें अरण्यांत जाऊन राहिलीं तर तिथे नाही का त्यांना सुख मिळणार ?

( कन्हया जरा बन्सी बजा०—या चालीवर )

**मधुर किति रम्य वनीं वसती । दुर्मिळ लोकीं ती ॥ ध्रु० ॥**
**स्वादुफलाशनिं क्षुत्पीडाशम निर्झरजलिंच तृषाशांति ॥ १॥**
**घनवृक्षांच्या छायेखाली सतत वसणें विजनप्रांतीं ॥ २ ॥**

**मनोहर**—या नुसत्या कादंबरींतल्या गोष्टी आहेत; यांत अरण्यवासाचे तोटे जमेस धरिले नाहीत.

( सो तेरीभेरी कैसी बने०—या चालीवर )

**विपुल भय ये दिसुनी वनवासीं ॥ ध्रु० ॥ आपण कंदफलें**
**भक्षित ते हिंस्रपशुहि अपणांसी ॥ १ ॥ मधुरजला प्राशितसूं**
**आम्ही अहि आम्हांसी ग्रासी ॥ २ ॥ नरभक्षक पचविति**
**अम्हां जसे आपण अन्नरसासी ॥ ३ ॥**

पूर्वीच्या वनवासी ऋषींना राजाकडे वारंवार धांव घ्यावी लागे ती याचकरिता !

**सरस्वती**—एकूण समाजाचीं बंधनें कितीहि जुलमी असलीं तरी तीं पाळणें आमचें कर्तव्यच आहे तर ?

**मनोहर**—तीं पाळावीं किंवा तीं तोडण्याचें शासन भोगण्याला तयार व्हावें.

आणि समाजाच्या शिक्षांइतक्या भयंकर दुसऱ्या कोणत्याहि शिक्षा नसतात. पाठीवरचे चाबूक पुरवतात, पण पाठीमागच्या निंदा पुरवत नाहीत. अंधार-कोठडींत राहणें पत्करतें, पण उजडांतला बहिष्कार पत्करत नाही. तोफेच्या तोंडीं गेलेलें परवडतें, पण शेजाऱ्यांच्या तोंडचे उद्‌गार परवडत नाहीत. विष खपतें, पण अपमान खपत नाही. या सर्व शिक्षा भोगण्याला मनुष्यानें कांही प्रसंगीं मात्र तयार झालें पाहिजे. ते प्रसंग म्हणजे जेव्हा समाजाचे नियम न्यायास व नीतीस सोडून असतात तेव्हाचे. अशा प्रसंगीं बाह्य शत्रूंशीं लढण्याला अंतरात्मरूप बळकट किल्ल्याचा आपणांला आधार असतो.

**सरस्वती**— सामाजिक शिक्षांचें आपलें वर्णन ऐकून माझ्या अंगावर कांटा उभा राहिला !

**मनोहर**— मीं आतापर्यंत समाजांतील प्रत्येक व्यक्तीचें कर्तव्य सांगितलें. आता माझ्यासारख्या ज्या मनुष्यानें एखादी लोकोपयोगी संस्था काढिली आहे त्यावर त्यामानानें इतरांपेक्षा जबाबदारीहि विशेष असते. शंभराहून अधिक लोकांनीं आपल्या मुली, सुना, बहिणी विश्वासानें माझ्या स्वाधीन केल्या आहेत, त्यांच्या विश्वासास मी पात्र आहें असें जर मी आपल्या वर्तनानें दाखविलें तर लवकरच शंभराच्या पांचशें मुली होतील. पण जर का मी तुझी विनंती मान्य करून आपलें शील सोडिलें, तर मजवर पुन्हा कोण विश्वास ठेवणार आहे ? कोण मला आपल्या घराची पायरी चढूं देणार आहे ? माझ्या अविचारानें मी स्वतःचें नांव घालवीन इतकेंच नाही तर माझ्या मागून जे महात्मे अशा संस्था काढतील त्यांच्या मार्गांत मी दुर्लंघ्य विघ्नपर्वत आधीच निर्माण केल्यासारखें होईल.

**सरस्वती**—पण अशा एकांत स्थलीं व रात्रीच्या शांत वेळीं आपणांकडून जर थोडेंसें वाईट वर्तन झालें तर तें जगजाहिर थोडेंच होणार आहे ! हें पाहा !

( कृष्ण मुरारी बिनती०—या चालीवर )

**रात्रि पसरि निज वसन अवनिवरि ॥ स्वजनदुरित लपवुनि निज गहन तिमिरिं लाज वारि । प्रणतकरुण हृदय धरुन करुनि अवन दीन तारि ॥ ध्रु० ॥ कीटकरव कर्कशतम निर्मुनि रतिकृत निनद पूर्ण करित छत्र निमिषिं तूर्ण । प्रणयि रब्ध-**

**कलहशब्द वहुत मुग्ध नृपपरिचररविं बुडवित निद्रित करि सृष्टि सारि ॥ १ ॥**

**मनोहर-** सरस्वति,

( मुख मोर मोर ०– या चालीवर )

**कधि पापलेप नच होय जगतिं । स्फुट कुकृति पाहिं सकलहि समयिं होति ॥ ध्रु० ॥ अघलव जरि करिं तरि ये कृष्णता मदीय वदनिं । क्षणांत हरुनी मम शुचिचरितकांति ॥ १ ॥**

पापानें माझें तोंड इतकें काळवंडून जाईल की तूं सुद्धा माझा तिरस्कार करूं लागशील.

**सरस्वती—** आपण प्रेम केलें म्हणजे इतरहि आपणांवर प्रेम करूं लागतात असें आपण एकदा म्हणाला होतां ना ?

**मनोहर—** तें मीं प्रेम.संबंधानें म्हटलें होतें. कामवासनेसंबंधानें नव्हतें. या दोहोंतील भेद तूं विसरून जातेस.

**सरस्वती—** महाराज, आपणापेक्षा थोरांनींहि अशीं कृत्यें करण्यांत पाप मानिलें नाही. मग आपण तरी कां मानावें ? लहानांनीं अनुकरण करावें हाचना थोरांच्या चरित्रांचा उपयोग ?

**मनोहर—** तुझें धोरण अजून माझ्या लक्ष्यांत येत नाही.

**सरस्वती-** भगवान् श्रीकृष्णांनीं वृंदावनांत गोपींशीं क्रीडा केली; त्याचप्रमाणे कांहीं देशांत अजूनहि स्त्रिया गुरूस आपला देह अर्पण करितात हें जर खरें असेल तर आपणांलाहि माझी सेवा घेण्याला हरकत नसावी.

**मनोहर—** हा जो देहार्पणाचा प्रकार तूं सांगितलास तो हल्लीं कांहीं लोकांत प्रचलित आहे हें खरें आहे; पण म्हणून तो स्तुत्य आहे असें कोणी समजत नाहीं. उलट तो बंद करण्याचे प्रयत्न सुरू आहेत. कृष्णाविषयी म्हणशील तर भक्ताची भगवंताचे ठायीं जी अचल भक्ति असावी लागते, तिची परमावधि रमणीप्रेमासारखी असते, या दृष्टीनें बहुधा व्यासांनीं गोपींची प्रणययुक्त भक्ति वर्णिली असावी असें अनेक विद्वानांप्रमाणे मलाहि वाटतें. मजसारख्या पामरांतसुद्धा जर साधारण इंद्रियदमन संभवतें तर तें श्रीकृष्णासारख्या महात्म्यांत कसें नसेल ?

**सरस्वती—** आपला निर्धार पाहून मला माझ्या निर्लज्जपणाची लाज वाटूं लागली आहे. आता या विषयासंबंधानें मी आपणांस पुन्हा त्रास देणार नाही. मात्र आपणांकडून मला एक वचन पाहिजे आहे.

**मनोहर—** तें कोणतें ?

**सरस्वती—** की आपलें मन जर कधीं कोणाहि स्त्रीविषयी विरघळलें तर आपण माझे हेतु पूर्ण कराल.

**मनोहर—** काय चमत्कारिक मागणें हें ! ठीक आहे. सरस्वति, माझी स्वतःच्या निर्धाराबद्दल इतकी खात्री आहे की माझ्या चित्तांत कोणत्याहि स्त्रीनें चलबिचल उत्पन्न केली की मी तुझें म्हणणें मान्य करण्याचें तुला वचन देतों. खरोखर पाहिलें तर ही प्रतिज्ञा नसून मिथ्याध्यवसिति आहे. आता मी तुझा निरोप घेतों.

**सरस्वती—** काय ! अशा रात्रीं आपण जाणार ?

**मनोहर—** आपलें आज जें भाषण झालें त्यानंतर या घरांत रहाणें मला प्रशस्त दिसत नाही; शिवाय आनंदरावहि आज घरीं नाहीत, तेव्हा मी आपल्या आश्रमांत जातों.

**सरस्वती—** अलीकडे आश्रमांत एक सुंदर व तरुण अशी नवीन अध्यापिका आली आहे असें ऐकितें.

**मनोहर**—(एकीकडे) अरेरे ! तरंगिणीला दिलेलें वचन मला पदोपदीं नडणार!

( अजब प्रांत गुजराथ ०— या चालीवर )

**पूर्ण न करुनि विचार देउनी चुकलों या वचना ॥ ध्रु०॥ प्रश्न न जोंवरि करील कोणी तोंवरि ही रसना। मूकभाव धरुनी न वदेलचि परमार्थासि जना ॥ १ ॥ स्थिति झाली विपरीत कशी जन कुतर्क घे नाना । सत्यहि गणिती मोहें कपटें वदलों वाक्यांना ॥ २ ॥**

( उघड ) अशी अपरिचित आध्यापिका आलेली मला नाही माहित. बरं घेतों आता तुझी परवानगी. ( सरस्वती मान हलवितें. जातो. )

**सरस्वती**—( स्वतःशीं ) साऱ्या स्त्रीजातीवर प्रेम आहे असें तोंडानें म्हणायचें मात्र आणि एखादीनें शब्द टाकिला की तिची निराशा करायची.

( तिलककामोद–झंपा )

**हृदय मम रमण हा नेत आकर्षुनी । जेविं चुंबक बळें आय-सालागुनी ॥ ध्रु० ॥ प्रियलाभ जों कठिण । अनुरागिं तों लीन । वल्लभाविषयिं मन । होय मम या क्षणीं ॥ १ ॥ जलयंत्रजल वरुनि । रोधितां उद्गमनिं । गुणित हो बहु जवनि । प्रणयगति तेविं जनिं ॥ २ ॥**

यांच्या शेवटच्या वर्तनानें मला कांही आशाहि वाटते. आश्रमांत जी नवी बाई आली आहे तिच्यासंबंधानें प्रश्न केला असतां त्यांनीं बराच वेळ थांबून अशी उडवाउडव कां केली बरें ? चकोर आज त्यांच्याशीं कांही वेळ बोलत बसले होते. त्यांनीं अर्थात् तिच्याविषयी यांना बातमी सांगितलीच असेल. असें असून यांनीं मला तिजबद्दल कांही माहित नाही असें कां बरें म्हटलें ? खास इथे कांहीतरी पाणी मुरतें आहे ! त्या बाईविषयी माझ्या मनांत एका क्षणास प्रेम तर दुसऱ्या क्षणास मत्सर वाटत आहे ! माझ्या प्रियकराचें प्रेमालिंगन मिळवून देण्याला ती साधनीभूत होणार म्हणून तिला आलिंगन द्यावेंसें वाटतें ! पण मला मिळण्यापूर्वी तें तिला मिळणार या विचारानें तिच्याविषयी मनस्वी संताप येतो ! विहाराच्या प्रतिज्ञाभंगामुळे चांद्रिकेस चकोराची प्राप्ति आणि माझ्या प्रियकरांच्या प्रतिज्ञाभंगामुळे मला त्यांची प्राप्ति हीं दोन्ही लवकरच घडून येणार असें दिसतें. [मला अलीकडे प्रेमापासून होणाऱ्या सुखदुःखांचा अनुभव येत गेल्यामुळे चंद्रिकेबद्दल कितीतरी कळकळ वाटूं लागली आहे.] मृत्यूप्रमाणे प्रेमामुळेहि द्वेषादि विकारांचा लय होऊन जातो. असो, आता मला माझ्या प्रियकरांचा लाभ झाला म्हणजे त्यांची सर्व विद्या मला तेव्हाच उचालितां येईल.

( झांग कळवा० – या चालीवर )

**चुंबुनियां त्यांसि हरिन मधुरशी गिरा । ग्रंथसंघ शीघ्र न दे ज्ञानसागरा ॥ ध्रु० ॥ मिळवुनि हृदयाशीं हृदय । आलिंगुनि दृढ निर्भय । करिन आपुली तदीय । मतपरंपरा ॥ १ ॥**

नाहीतर हें घोकंपट्टीचें शिक्षण ! ( जाते. )

## प्रवेश ३ रा

### ( विहार )

**विहार**-(स्वतःशीं) घरीं दारीं, जेवतांना, उठतांना, बसतांना, सगळीकडे आणि अष्टौप्रहर माझ्या प्रियेची मूर्ति समोर खेळत असते. प्रिये तरंगिणि, तुझें मजवर जितकें निर्मल प्रेम होतें तितकेंच माझेंहि तुजवर आहे. तुझ्या सद्‌गुणांचें चिंतन करितां करितां मला एकंदर स्त्रीजातीविषयीं इतका कांहीं आदर वाटूं लागला आहे की रस्त्यानें कांकणांचा आवाज कानांवर पडला पुरे की माझे नेत्र तिकडे फिरलेच म्हणून समजावें. तुझ्या मूर्तीशीं साम्य ज्या ज्या स्त्रींत आढळतें ती ती तुजप्रमाणेच मला प्रिय वाटते; मग ती कोणत्या का जातीची असेना ! तुझ्यासारखी तरुण व लावण्यवती असली म्हणजे झालें. फार काय सांगू ? अलीकडे पूजा करितांनासुद्धा देव आणि देवी यांज-मध्ये मला पक्षपात करावासा वाटतो. देवांच्या डोक्यांवर कण्हेरीचीं व झेंडूचीं फुलें टाकून देवींच्या मस्तकीं मात्र गुलाबाचीं आणि मोगऱ्याचीं फुलें वहातों. तसेंच बेलांचा आणि दूर्वांचा भारा देवांवर सोडून देवींना तुळशीच्या मंजि-ऱ्या अर्पण करितों. परोपकार म्हणून या मुलांना शिकविण्यास सुरुवात केली तों हाच प्रकार तिकडेहि होऊं लागला गणित शिकवितांना मुलाकडून बेरीज व वजाबाकी वारंवार करून घेतों, आणि गुणाकार भागाकार पडतात लांबणी-वर ! भूगोलांतील सामुद्रधुनि, संयोगभूमि यांच्या व्याख्यांवर सारखी झोड सुरू करितों; आणि समुद्र, महासागर वगैरे पुरुष मंडळी ठेवितों तशीच कोकलत ! इतिहासांतील चांदबिबी, मस्तानी याच्या चरित्रांचीं पारायणें सुरू करून शिवाजीमहाराज, बाजीरावसाहेब यांचीं पवित्र नांवें इतिहासातल्या इतिहासांतच राहूं देतों ! या प्रकारामुळे मुलेंसुद्धा दांडगीं होऊन माझें ऐके-नाशीं झालीं आहेत. मुलांपेक्षा मुली निःसंशय आज्ञाधारक असतील.

**चकोर**— ( प्रवेश करून ) – कसें काय ? दादासाहेब, ठीक चाललें आहेना तुमचें व्रत ?

**विहार**–ठीक म्हणून काय विचारतोस ? तुझी ताई हल्लीं कुठे वास करिते आहे हें सांग बरें ?

**चकोर—** ( एकीकडे ) यांना आमचें कपट कळलें कीं काय ? (उघड) मला नाहीं माहित.

**विहार—** अरे माझ्या समोर, मागे, उजवीकडे, डावीकडे, सारांश चोहोंकडे तिची मूर्ति मला दिसत असते. अशा स्थितींत माझें व्रत ढळणें शक्य तरी आहे का ?

**चकोर**-( एकीकडे ) माझी मोठी भीति दूर झाली ! ( उघड ) खरें प्रेम असतें तिथे असें असावयाचेंच.

**विहार—** तिचा जो मला ध्यास लागला आहे त्याची अलीकडे अगदी परमावधि झाली आहे.

( नच सुंदरि करुं कोपा०—या चालीवर )

**अंतर्बहि दिनरजनी। दिसते मज रूपखनि ॥ देवीसम सतत तिला पूजितसें स्वमनीं ॥ ध्रु०॥ मार्गीं ये संचरतां। कंकणरव कर्णपथा। तरि वाटे निज नाथा। आलि मिळाया कांता ॥ तत्सम मुख बघुनि जाइं मी वेडावोनी ॥ १ ॥**

हल्लीं मी कोणतेंहि पुस्तक वाचायला उघडलें तरी तिची आठवण होते. ज्यांत पुरुष व स्त्री यांचा भेद दाखविणारीं नांवें नाहींत अशीं पुस्तकें आणि शास्त्रें तरी कुठे आहेत ?

( चाल सदर )

**स्त्रीपुरुषीं भेद दिसे। व्याकरणीं दिधलासे ॥ स्त्रीनरकेसर ऐसे। ओषधिमधि रज खासे ॥**

**चकोर**-खरेंच ! त्यांच्यावांचून त्या शास्त्रांत पानच हालत नाहीं.

**विहार**-

**वेदान्तहि सुना प्रकृति- पुरुषांवांचोनी ॥ २ ॥**

**गणितीं चिन्हांकांसी। बघुनी होइं उदासी ॥ विद्युन्मीमांसा तशि। स्त्रीनरभेदा लक्षीं ॥ यंत्रशास्त्रिं तोचि येइ मळसूत्रीं दिसुनी ॥ ३ ॥**

**चकोर**-तुमचें अध्यापन ठीक चाललें आहेना ?

**विहार**-माझा व्यवसाय मात्र माझ्या विचारास फार प्रतिकूळ आहे. मुलांपेक्षा मुलींना शिकविण्याचा मीं पत्कर घेतला असता तर बरें झालें असतें. म्हणजे मी अंतर्बाह्य स्त्रीमय बनून गेलों असतों. बरें, विद्यार्थि मिळाले आहेत ते तरी सुधे आहेत का ? सकाळपासून संध्याकाळपर्यंत मला सारखा त्रास देत असतात. परवा मी खुर्चीवर बसावयास गेलों तों एका वात्रट मुलानें मागची खुर्ची ओढून घेतली; त्यासरसें मला भुईवर लोटांगण मिळालें !

**चकोर**— मग याबद्दल त्यांना चांगली शिक्षा कां नाही करीत ?

**विहार**— शिक्षा देतांनासुद्धा माझें हंसेंच होतें. मी छडी मारूं लागलों की ते ती चुकवितात, आणि यामुळे पुष्कळदा माझे नुस्ते हस्तविक्षेप होतात. मी एखाद्याचा कान पिळायला किंवा गालगुच्चा घ्यायला गेलों की माझ्या काखेंत टांचणी टोंचतात. याप्रमाणे खरी शिक्षा मुलाना न होतां मला होते. परवा एक मुलगा घरीं जाण्याची परवानगी मागूं लागला, मीं दिली नाही. तेव्हा त्यानें त्याबद्दल अगदी तगादा लाविला. तेव्हा मीं त्याला बांकावर उभें रहाण्याची शिक्षा फर्माविली. ती त्यानें अमान्य केली म्हणून मीं त्याला आंगटे धरून उभा रहा असा हुकुम केला. पण रहात नाही असें जेव्हा त्यानें उर्मटपणाचें उत्तर दिलें, तेव्हा सर्वांत मोठी शिक्षा म्हणून मीं त्याला खोलीच्या बाहेर जाण्यास सांगितलें. तेव्हा तो निलाजरा ‘ मला तरी हेंच पाहिजे होतें ’ असें म्हणून हंसत हंसत चालता झाला ! या चटोरपणाला काय म्हणायचें ?

**चकोर**— अरे अरे ! मला तुमची अगदी मनापासून कींव येते.

**विहार**— काल एकानें माझ्या छाटीच्या मागचे अंगास टांचणीनें एक चोळीच अडकावून दिली. मी फळयावर उदाहरणें सोडवून दाखवायला जेव्हा जेव्हा जाई तेव्हा तेव्हा सगळया वर्गांत एकच हंशा उडे. चोळी पाठीमागें असल्यामुळे मला दिसेनाहि. शेवटीं हीं मुलें आज इतक्या एकोप्यानें कां हंसत आहेत याचा पत्ता काढण्याकरिता एकाला छडीनें चांगला फोडून काढिला; तेव्हा त्यानें सर्व रहस्य फोडलें.

**चकोर**— अगोदर मला सांगा ही छाटी तुम्ही कां वापरतां ?

**विहार**— प्रायश्चित्त म्हणून !

( साकी )

**यतिवेषीं तुज बघुनी वदलों बहु सकोप उपहासें । शासन त्याचें कांताविरहीं ईशें दिधलें खासें ॥ त्याच वरुनि वेषा । परिमार्जिन मम गतदोषा ॥ १॥**

चकोरा, त्याबद्दल तूं मला पूर्ण क्षमा केलीस ना ?

**चकोर**— तुम्ही वडील, तेव्हां क्षमा करण्याचा अधिकार तुमचा आहे. तें असूंद्या. तुम्ही या मुलांना अगदी कंटाळलां आहांत ना ?

**विहार**— मला त्यांची अगदी ओकारी आली आहे. एखाद्या स्नेह्याला मुलगा झाला म्हणजे मला आजपर्यंत आनंद वाटत असे, पण हल्लींच्या अनुभवावरून तो आनंद अस्थानीं होता असें वाटतें.

**चकोर**— आमच्या आश्रमांत मुलींना शिकविण्यास तयार आहांत ?

**विहार**— अगदी एका पायावर ! पण मी आजपर्यंत मनोहराला त्याच्या आश्रमाबद्दल इतका तिटकारा दाखविला आहे कीं तेथे मी कोणत्या तोंडानें जाऊं असें मला झालें आहे.

**चकोर**— दादांच्या मनांत तर त्याबद्दल मुळीच नाहीं. तुम्ही आलांत तर त्याना उलट आनंद वाटेल.

**विहार**— तसें असेल तर माझ्याकडूनहि ना नाहीं.

**चकोर**— तेथे जाण्यापूर्वी मला तुम्हांला दोन गोष्टींबद्दल सूचना करून ठेविली पाहिजे.

**विहार**— त्या कोणत्या ?

**चकोर**— एक ही की अजून ताईबद्दलचें वेड दादांच्या डोक्यांतून पुरतें गेलें नाहीं. म्हणून त्यांच्याशीं बोलतांना त्याबद्दल ब्र काढावयाचा नाहीं. ही पहिली सूचना. तुम्हांला हल्ली ताईवांचून कांहीं दिसत नाहीं, म्हणून ही सूचना तुम्हीं विशेष लक्ष्यांत ठेवावी.

**विहार**— त्याबद्दल तूं काळजी करूं नकोस. दुसरी सूचना कोणती ?

**चकोर**—हल्लीं आश्रमांत एक श्रीमंत बाई आपखुषीनें अध्यापिका म्हणून आली आहे.

**विहार**— बरें मग ?

**चकोर—** ती तरुण आणि अत्यंत देखणी आहे.

**विहार—** काय म्हणतोस ? तरुण ?

**चकोर—** होय. अठरा वीस वर्षांच्या सुमाराची असेल.

**विहार—** आणखी काय म्हणलास ? अत्यंत देखणी ?

**चकोर–** मीं काही तिला पाहिली नाही. कारण ती फार मर्यादशील असल्यामुळे पुरुषांसमोर नेहमी बुरखा घेते. आणि म्हणूनच तुम्हाला दुसरी सूचना अशी करावयाची की तिच्या खोलीकडे तुम्ही फारच जरूरीच्या कामाशिवाय कधी फिरकूं नये.

**विहार–** फार उत्तम ! मला आता परस्त्रिया मातेसमान आहेत.

**चकोर–** ( एकीकडे ) स्वतःच्या मुलाच्या मातेसमान ! ( उघड ) मग आता उशीर कां ?

**विहार–** एकदा मुलांना सांगून टाकतों, आणि मग बाबांना माझा पुढचा पत्ता सांगून नंतर तिकडे जाऊं. अरे केदारा, कल्याणा, भैरवा, ( दोन तीन मुलें येतात ) बाकीचीं मुलें काय झालीं ? मल्हार कुठे आहे ? आणि त्याचा मित्र सारंग काय झाला ? तसेंच आपला कानडा दिसत नाही तो ? भारी अवघड कारटीं बोवा ! आळवतां आळवतां घसा कोरडा पडतो ! अरे बेट्यांनो, सगळ्याजणांना सांगून टाका की तुमच्या खोड्यांना त्रासून आजपासून वर्ग बंद केला म्हणून. (एका बाजूनें मुलें उड्या मारीत जातात. दुसऱ्या बाजूनें चकोर व विहार जातात. )

## प्रवेश ४ था

**( मनोहर, व तरंगिणी. )**

**मनोहर–** तरंगिणी, आमच्या आश्रमांत तुझे दिवस बरे जातात ना ?

**तरंगिणी–** दादा, हें काय विचारतोस ?

( साकी )

**अन्नोदक अति निर्मल त्याहुनि विमल देह हे जेथे । शुद्ध अंतरें सर्वांहुनि त्या योगिहि रमेल तेथे ॥ १ ॥**

इथली व्यवस्था तरी किती सुयंत्र आहे ! मुलींचीं नांवें तरी किती गोड ठेविलीं आहेत ! एकीचें नांव भैरवी, तर दुसरीचें तोडी, आणि तिसरीचें धन्यश्री.

**मनोहर**– मुली आश्रमांत आल्यावर त्यांचीं आम्ही निराळीं नांवें टेवितों तीं बहुधा त्यांच्या स्वभावावरून ठेवितों. एक मुलगी नेहमी उदास असते; तिचें नांव जोगी ठेविलें आहे. दुसरी फार लाजाळू, तिला 'ग' ची बाधा मुळीच नाही; तिला गंधार वर्ज्य असलेल्या एका रागिणीचें नांव दिलें आहे. एक मुलगी बाहेरून फार दांडगी दिसते, पण आंतून फार कोमल अंतः-करणाची आहे; तिला कोमलस्वरमय भैरवीचें नांव ठेविलें आहे. या मुलींचे पोषाखसुद्धा शक्य तितके संगीतशास्त्रात वर्णिल्याप्रमाणेच ठेवीत असतों. यामुळे आश्रमांत वैचित्र्य येऊन मुलींनाहि गाण्याचें सहज ज्ञान होतें. तिरंगिणि, तुझें नवीन नांव कल्याणी हें सुद्धा त्याच वर्गांतलें आहे.

**तरंगिणी**– मला तिकडून नेहमी सांगणें होत असे की या आश्रमांत नुस्तें पोपटपंचीचें शिक्षण मिळतें. पण इथे पहातें तो रोजचा स्वैंपाक, शिवण-टिशेव मुलीच पाळीपाळीनें करितात; तसेंच वरच्या वर्गांतील मुली खालच्या वर्गांतल्या मुलींना शिकवितात. त्यामुळे शिकण्याबरोबर शिकविण्याचाहि त्यांना सहज अनुभव येतो. त्यांच्या सांगण्यात आणि खऱ्या प्रकारांत मला जमीन-अस्मानाचें अंतर दिसून आलें आहे.

**मनोहर**– हा अनुभव नेहमींच येतो. हें अंतर किती आहे हें स्वतः पाहा-ण्याकारिता आज विहारहि येथे येणार आहे.

**तरंगिणी**– अगबाई ! हें ऐकून माझ्या उरांत धडकी भरली ! हें सोंग जर का त्यांना आधीच कळून चुकलें तर पंचाईत व्हायची ! तशांत तुला त्यानीं विचारिलें तर तूं प्राण गेला तरी खोटें सांगायचा नाहीस.

**मनोहर**– मी येथे बसणारच नाही म्हणजे झालें.

**एक मुलगी** (प्रवेश करून)–महाराज, बाहेर विहार नांवाचे कोणी गृहस्थ आणि त्यांच्याबरोबर दोन बाया आल्या आहेत.

**मनोहर**– येऊंदे त्यांना आंत. तरंगिणि, मी या दुसऱ्या दारानें जातों बरें बाहेरं ( तरंगिणी मानेनें बरें म्हणून खुणाविते. मनोहर जातो. )

**तरंगिणी**–( स्वतःशीं ) हें हृदय त्यांना भेटण्याकरिताच कीं काय धड-धड उडूं लागलें आहे. हे डोळे त्यांना पहाण्याकारिता कसे तान्हेले झाले आहेत. त्यांची तृषा शांत करण्याकारिता हे आनंदाश्रु उभे रहातात ! अश्रूंनो तुमच्यानें माझ्या डोळ्यांची तहान कशी निवणार ? अगबाई, आलेच वाटतें ! (तोंडावरून

बुरखा घेते. **विहार, चकोर, सरस्वती,** व **वेणूबाई** प्रवेश करितात. )

**चकोर**–कल्याणीबाई, हे माझे मेव्हणे विहार आश्रमांत अध्यापक होऊन आले आहेत.

**तरंगिणी**–(स्वर बदलून) फार आनंदाची गोष्ट आहे! सर्वसंगपरित्याग करून आश्रमाची सेवा करणाऱ्या स्वयंसेवकाची आपणाला फार आवश्यकता आहे.

**विहार**–आपल्यासारख्या गर्भश्रीमंत स्त्रियांनीं आपल्या वैभवावर लाथ मारून आश्रमाची चाकरी पत्करावी हेंच मोठें आश्चर्य! आपलें मी अल्प अनुकरण मात्र केलें आहे त्यांत बढाई कसची!

**तरंगिणी**– (सरस्वतीकडे पाहून) या विहारांच्या भगिनी आहेत वाटतें?

**चकोर**– नाही. त्यांच्या सापत्नमातुश्री आहेत. आम्ही इकडे यावयास निघालों तेव्हा त्याहि आश्रम पाहण्याच्या उद्देशानें इकडे आल्या.

**तरंगिणी**–बाई मी आपणांस यांची बहीण समजून आपला अपमान केला याबद्दल आपली क्षमा मागतें.

**सरस्वती**–त्यांत कसची क्षमा मागायची! (एकीकडे) बाई फार सुंदर आणि लहान वयाची दिसते! तिकडे मोह खास पडणार!

**विहार**–मनोहरपंत येथेच आहेत असें कळल्यावरून आम्ही येथे आलों. पण आपण एकट्याच असल्यामुळे आपल्या एकांताचा भंग मात्र आमच्याकडून झाला. त्याबद्दल माफी असावी.

**तरंगिणी**– ते आतापर्यंत येथेच बसले होते. आपण येण्यापूर्वी नुकतेच उठून गेले.

**विहार**–(एकीकडे) स्वारी विरघळली वाटतें! आणि कोण नाही विरघळणार? इच्या तोंडावर बुरखा असूनहि इतर अवयवांवरून इचा नाजुकपणा दिसून येत आहे. चंद्रावर जरी अभ्रपटल आलें तरी त्याच्या चोहोंकडे पसरलेल्या करांवरून त्याच्या कांतीची कल्पना करितां येते. पण माझ्यासारख्या तपस्व्यांना आता इतक्या बारकाईनें पाहाण्याची काय जरूर आहे?

**सरस्वती**– (एकीकडे) आम्ही आल्याबरोबर उठून गेले! ठीकच आहे. माझ्याशीं येवढालीं लांबलांब भाषणें झाल्यावर जर त्यांचा एकांत मला पहायला मिळाला तर तें त्यांना कसें खपणार?

**विहार**–बाई, या आश्रमाच्या मालकांना भेटण्याच्या आधी येथे बसणें

योग्य नाही. तर आता आम्हाला मनोहरपंतांकडे जाण्याची परवानगी असावी.

**तरंगिणी**--आपणांसारख्या ज्ञात्यांची पहिली भेटसुद्धा चित्ताला चटका लावून सोडिते. आपल्या या अल्प सहवासानें अधिक सहवासाची इच्छा होणें स्वाभाविक आहे. तेव्हा--

( काहेको सतावो संया०–या चालीवर )

**पुनरपि दर्शन द्यावें लवकरि । सतत घडे जरि ये न वीट तरि ॥ ध्रु० ॥ सज्जनसंगति तृषित जनां करि । शीतल जरि खरि गमत सुधेपरि ॥ १ ॥**

**विहार**–ठीक आहे. पण मी म्हणतों,

( सुन शाम बिनती०–या चालीवर )

**चिर वास सुखिं या अशा । मम । बहु भाग्याचा गमत मानसा ॥ ध्रु० ॥ जन्मभरी येथेचि रहावें । श्रवणिं वचन मधुसम सेवावें । अशीच मनीषा ॥ १ ॥**

**सरस्वती**— (एकीकडे) बाईचा साखर पेरण्यांत हातखंडा दिसतो ! ही त्यांना तेव्हाच आपल्या जाळयांत गुरफटून टाकणार ! मी बिचारी भोळी सांपडलें म्हणून नाही नाही त्या तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सागून मला चकाविलें. पण हें प्रकरण म्हणावें निराळेंच दिसत आहे ! संभाळून असा आता ! ( तरंगिणीशिवाय सर्व जातात. )

**तरंगिणी**— ( स्वतःशीं ) काय तरी बाई त्यांचा धीटपणा !

( उग्र तपा भंगाया०– या चालीवर )

**तीव्र दृष्टि अवगुंठनिं लाविलि मच्चुंबनकांक्षिणी । असे जी समर्थ तद्भेदनीं ॥ वदनावरणा छिन्न निजबळें केलें असतें तरी । शरीरें युक्त असति ती जरी ॥ नम्रपणा जरि वचनिं दाविला नयन तरी धीट ते बघती वेधूं पातें शितें ॥ १ ॥**

आणि हेंच का त्यांचें मजवरचें प्रेम की परस्त्री दिसल्याबरोबर त्यांनीं असें धीटपणानें तिजकडे पाहात बसावें ? माझा सारा अभिमान गळून गेला !

बायको मेल्यावर पुरुष कसे वागतात याचा मला चांगलाच अनुभव मिळणार असें दिसतें ! पण या सगळयाचा शेवट चकोराच्या आणि वत्सेच्या लग्नातच होणार ना ? शिवाय त्यांनीं आपली आशाळभूत दृष्टि मजकडेच लाविली होती ना ? मग मला वाईट तरी कां वाटावें ? छेः ! मीं मनाचें किती जरी समाधान केलें तरी त्याची हुरहुर जात नाही ती नाहीच. ( जाते. )

## प्रवेश ५ वा.

### ( चंद्रिका व वेणूबाई )

**वेणू—** ताईसाहेब, ऐकलीत ना माझ्या जन्माची कर्मकहाणी ? त्या मेल्या शास्त्र्यानें माझें लाडकें बाळ गळा दाबून जिवें मारिलें आणि सरकार त्याच्या तपासात आहे हें जर चकोरांनीं मजपाशीं सांगितलें नसतें तर मी हें तुमच्यापाशीं ओकलेंहि नसतें. पण काय करूं ? माझ्या बाळाच्या गळयाला नख लाविलें तेव्हा त्यानें जी किंकाळी फोडली असेल ती आठवून मला तुमच्यापाशीं अंतःकरण मोकळें केल्यावांचून रहावेनाच. त्याच्या प्रत्यक्ष आईनें जेव्हा त्याला त्या कसाबाच्या हातीं अनाथगृहांत पोहोंचविण्याकरिता दिलें, तेव्हा त्या बिचाऱ्याला पुढें वाढलेल्या दुःखाची कल्पनाहि नव्हती. बाळा, काय तुझें तें त्या वेळचें गोजिरवाण आणि हसरें तोंड ! तें मी आता कुठे पाहूं ? तुझ्या आईला नाहीना तूं आता पुन्हा भेटणार ? पण मी आई कसची ! त्याची पूर्वजन्मींची वैरिण द्वेष उगविण्याकरिता जन्माला आलें आणि माझें सोनुलें जन्मल्याबरोबर त्याच्या घाताला कारण झालें !

**चंद्रिका—** वेणूबाई, शोक तरी किती कराल आता ? कितीहि रडलांत तरी तुमचें बाळ परत नाही ना येत ?

**वेणू—** तें कुठचें येणार ! मीच जाईन आता त्याला भेटायला स्वर्गात. पण या पापिणीला स्वर्गात कोण येऊं देणार ! नाही येऊं दिलें तरी मी स्वर्गाच्या दाराशीं तसेंच धरणें धरून बसेन आणि काकुळतीला येऊन देवाला म्हणेन, ' देवा, माझें बाळ स्वर्गात एकटें आहे. तें माझ्या कडेवर येण्याकरिता कसें घाबरें झालें आहे. तर हे भक्तवत्सला, त्याची आणि माझी ताटातूट करूं नकोस. एक तर मला स्वर्गात येऊं दे, नाहीतर त्याला तरी माझ्याबरोबर नरकांत येऊंदे. मी जाईन तेथे माझें बाळ खुषीनें येईल. '

**चंद्रिका**— वेणूबाई, नकाहो असें बोलूं ! तुमचें बोलणें ऐकून हृदयाला घरे पडतात ! त्यानें एखाद्या दगडालासुद्धा पाझर फुटेल !

**वेणू**— ताईसाहेब, तुम्ही म्हणतां दगडाला पाझर फुटेल म्हणून. मग त्या मेल्या शास्त्र्याच्या अंतःकरणाला कसा नाही हो द्रव आला ? मेल्या, तुला देव परलोकीं बघून घेईल !

**चंद्रिका**— परलोकीं कशाला पाहिजे ? याच जगांत मेल्याला त्याच्या कर्माचें प्रायाश्चित्त मिळेल बरें ! तुम्ही कांही चिंता करूं नका.

**गडी**—( प्रवेश करून ) ताईसाहेब, बाहेर शास्त्रीबुवा आले आहेत. सोडूं का त्यांना आत ?

**चंद्रिका**—जा, घेऊन ये त्यांना पण त्यांना इथे सोडल्यावर तूं मात्र जवळच माझ्या हांकेच्या आंत उभा रहा. (गडी जातो.) वेणूबाई, तुम्ही आता जा. जर का तो इतक्यात तुमच्या दृष्टीला पडला तर तुम्ही संतापानें त्याची निर्भत्सना करून त्याला जागें कराल. ( वेणूबाई जाते. स्वतःशीं ) दादा आश्रमांत गेल्यापासून ही बिचारी माझ्या सोबतीला येते म्हणून बरें आहे. नाहीतर मला दिवस वर्षाप्रमाणे वाटला असता. इच्याप्रमाणे आज आमच्यांत कितीतरी बिचाऱ्या विधवा असतील.

( तुने मोहनी कैसी डारी ०— या चालीवर )

**कितिक अशा योषितां । ज्या पापामधिं रता ॥ ध्रु० ॥ सरळ**
**सुखाचें साधन नुरलें । कुटिलचि सेविति पथा ॥ १ ॥ कपटि-**
**कामवासनेंसि पडती । बळि; नच त्यां मुक्तता ॥ २ ॥ गुप्तपणें**
**झालेल्या बालां । करिति दुरी ज्या स्वतां ॥ ३ ॥**

**हरिहरशास्त्री** ( प्रवेश करून )—( स्वतःशीं ) जोंपर्यंत मला सरस्वतीचें वेड होतें तोंपर्यंत इच्या मुखचंद्राकडे माझें लक्ष्यच गेलें नाही. पण अलीकडे इच्या लावण्याची एक एक नवीन खुबी रोज प्रकट होत आहे. या चेहऱ्यांत निस्तेजपणामुळे जी शोभा आली आहे ती कांही अवर्णनीय ! आजपर्यंत कपाळीं कुंकू नसणें मला शोभाहीन वाटत असे. पण ज्याला कलंकविरहित चंद्रमा पहावयाचा असेल त्यानें इच्या मुखाकडे पहावें. असें शुभ्र कपाळ पाहिलें म्हणजे काम होत नसतें म्हणतात. कशाला होईल ? या

चेहऱ्यामधून कामाकडे लक्ष्य लागेल तर काम व्हायचें कीं नाही? ( उघड ) कसें काय ! तब्बेत ठीक आहे ना ?

**चंद्रिका**— माझ्यासारख्या दुर्दैवी बायकांच्या तब्बेतीची चौकशी करून तुमच्यासारख्या पुण्यवान् माणसास काय करायचें आहे ? माझी तब्बेत नेहमीप्रमाणे चांगली आहे. तिला काय धाड व्हायची आहे ?

**हरिहर**— तुमच्या चकोरांचीहि प्रकृति खुशाल आहे.

**चंद्रिका**–(एकीकडे) हें ऐकून आनंद वाटण्याऐवजी त्यांच्या प्रकृतीबद्दल संशय बरिक उत्पन्न होतो. यानें हें मुद्दाम कां सांगितलें असावें ? यांत याचा कांहीतरी मतलब असावा. ( उघड ) तुमचें म्हणणें उघड करून सांगा.

**हरिहर**-- माझा आशय कांही विशेष गूढ नाही. चकोर हल्ली नेहमी आनंदांत दिसतात, त्यावरून सहजीच बोलून गेलों. त्यांचा वेळ अलीकडे मोठ्या करमणुकींत जातो असें ऐकितों.

**चंद्रिका**–(एकीकडे) हें ऐकतांच माझ्या अंतःकरणास डागण्या द्याव्या त्या-प्रमाणे कां बरें वाटतें ? त्यांचें सुख तेंच माझें असें मला वाटू नये का? चंद्रिके, तुझ्यासारख्या आपलपोट्या स्त्रियेस ते योग्य नाहीत हेंच खरें ! ( उघड ) ते पुरुष आहेत; तेव्हा त्यांचा वेळ आनंदांत जात असल्यास नवल नाही.

**हरिहर**— हो ! पुरुषांना बायका मिळाल्या म्हणजे करमणुकीला काय तोटा !

**चंद्रिका**— आश्रमांतील मुली बिचाऱ्या अज्ञानी ! आणि त्यांच्यामुळें ती काय करमणूक व्हायची आहे ?

**हरिहर**–त्यांना शिकविण्याकरिता एक नवीन चेहेरेबाज बाई आल्या आहेत. त्यांच्यापासून चकोर रोज दोन-चार घंटे स्वतः शिक्षण घेत असतात. मग तें शिक्षण कसलें असतें कुणास ठाऊक !

**चंद्रिका**–(एकीकडे)उतावळ्या मना ! असें अधीर होऊं नकोस.वेडे चंद्रिके,

( दिंडी )

**जरी त्यांचा अनुराग नसे भालीं । जसा या जन्मीं तिलक**
**तव कपालीं ॥ वस्तु तरि जी दुष्प्राप्य असे तूतें । लाभ काय**
**असे वांछुनी तियेतें ॥ १ ॥**

(उघड) आश्रमांत एक बाई आल्या आहेत असें मीं ऐकिलें होतें. पण त्यांचा आणि चकोरांचा स्नेह आहे हें मात्र मला ठाऊक नव्हतें.

**हरिहर**-- कसें ठाऊक असणार ! तें कोणालाहि कळूं नये म्हणून तीं दोघेंजण दारांना कड्याकुलुपें लावून घेऊन बसत असतात. कांही स्नेह असे असतात की ते जगजाहीर व्हावे अशी आपली इच्छा असते. उदाहरणार्थ, बऱ्या लोकांशीं स्नेह. पण अबलांशीं स्नेह असा असतो की त्याचा तिसऱ्याला संशयसुद्धा येऊं नये अशी आपण खबरदारी घेतों.

**चंद्रिका**-(एकीकडे) मेल्याची जीभ झडून जावो ! (उघड) चकोरांसारख्या विद्वान् पुरुषाचा त्या विदुषीशीं स्नेह जडला हें योग्यच झालें. अशा थोर लोकांच्या गोष्टी माझ्यासारख्या सामान्य मुलीला ऐकून आणि तुमच्यासारख्या सामान्य पुरुषास सांगून काय फायदा होणार ?

**हरिहर**-फायदा इतकाच की आपण त्यापासून धडा शिकावा. चकोरानें जर तुमचा विश्वासघात केला तर तुम्हांला त्याचा करितां येणार नाही का ? आपल्या लहानपणच्या मैत्रिणीला विसरून तो जर दोन दिवसांच्या सोबतिणीला इतका भाळून गेला तर त्याचा वचपा तुम्हांला मजसारख्या एकनिष्ठ मित्रावर प्रेम करून काढितां येणार नाही का ?

**चंद्रिका**-( रागानें ) काय बोलतां ? पुन्हा बोला पाहूं.

**हरिहर**--अशा रागावूं नका. हें तुमचें मुसमुसणारें तारुण्य, रतीनेंहि पाहून लाजावें असें लावण्य, हीं वैधव्याग्नींत दग्ध होण्याकरिताच आहेत कीं काय ? मनुष्यजन्म वारंवार येत नसतो आणि त्या जन्मांतहि तारुण्य फार वेळ टिकणारें नसतें. त्याचा उपभोग आपण स्वतः घेऊन दुसऱ्यास दिला नाही तर या जन्माचें सार्थक काय ? तो चकोर एक अरसिक असला म्हणून इतरांचे डोळे फुटले कीं काय ?

**चंद्रिका**-- ( एकीकडे ) रागानें आता माझा दम कोंडून प्राण जाणार खास ! ( उघड ) बायकांना एकट्या गांठून त्यांच्याशीं असें निलाजरेपणानें बोलणें तुम्हांला शोभतें काहो ?

**हरिहर**-आणि त्या चकोरानें तुम्हांला एकटें गांठलें होतें तें ? तेव्हा नाही असा संताप आला ?

**चंद्रिका**-चला या घटकेस येथून निघून जा. एक पळभर रहाल तर तुमची कांही धडगत नाही. अरे विठ्या, विठ्या चल लौकर ये इकडे.

**हरिहर**–बरें आहे ! या उद्धटपणाबद्दल तुझे केंस घेतल्यावांचून रहात नाहीं ! ( जातो. )

**चंद्रिका**–(स्वतःशीं) मला तरी आता या केसांशीं काय करायचें आहे !

**गडी**–( प्रवेश करून ) काय हुकूम आहे, बाईसाहेब ?

**चंद्रिका**–बाहेरच्या दाराला कडी लावून घे, आणि कोणालाहि आंत येऊं देऊं नकोस. माझें आज कपाळ दुखतें आहे.

**गडी**–तो लेकाचा आला होता ना कपाळदुखव्या !

**चंद्रिका**–आता तूं आणखी बोलूं नकोस. जा.

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ६ वा

( **विहार** बसला आहे. भोंवतालीं **भैरवी, असावरी धन्यश्री, तोडी, जयजयवंती** इत्यादि मुली उभ्या आहेत. )

**मुली**—

( दिरादिर तनन तनदीं०–या चालीवर )

**पदिं नमन तव शारदे । वंद्ये ब्रह्मतनये गीतनिरते माते वर-वरदे विनवित सविनय ॥ ध्रु० ॥ तिमिरिं रवि अवनिच्या ठेवि अर्धा । तदनुकृतिसि न आचरीं करिं करुणा । धरी लाज तूं स्त्रीजातिचि वरिं नय ॥ १ ॥ ज्ञानतरणिकिरणीं पुरुष शोभे । तिमिरमय परि छायिका जणुं अबला । त्वरें स्त्रीकलंका क्षालिं करिं सदय ॥ २ ॥**

( सर्व मुली आपापल्या जागांवर बसतात. )

**विहार**– ( स्वतःशीं ) त्या कल्याणीची मूर्ति प्रियेसारखीच असल्यामुळे माझ्या मनांत वरचेवर येते, यांत नवल नाहीं. तिचें बोलणें चालणें अगदी तिच्याप्रमाणेच मनोवेधक आहे. तिच्या हसण्याचा मंजूळ ध्वनि बुरख्यांतून येतो तो एखाद्या पिशवींतील रुप्याच्या नाण्याप्रमाणे खणकन् येतो. या नाण्या-वर आपल्या मुखाची मुद्रा करण्याचें भाग्य कोणा दैववानाचें होतें कुणास

ठाऊक ! ती विधवा आहे, त्या अर्थी माझ्यासारख्याच्या कांही उपयोगी नाही. शिवाय माझा अविवाहित रहाण्याचा संकल्प कालत्रयींहि ढळावयाचा नाही. चकोर तिच्याबरोबर दोन दोन चार चार घंटे एकांत करीत बसला असतो, त्याअर्थी त्याच्याच मनातून या नाण्याची चोरी करावयाचा विचार दिसत आहे. याकरिताच बहुधा त्यानें मला तिच्याशीं फारसा संबंध ठेवूं नका म्हणून बजाविलें असावें. असो, आता या मुलींना नेहमीप्रमाणे एखादी बोधपर कथा सांगावी. ( उघड ) मुलींनो, काल आपली रामायणाची कथा कुठपर्यंत आली होती ?

**भैरवी–** त्या मेल्या रावणानें सीतादेवीला उचलून लंकेला नेली, तिथपर्यंत कथाभाग आला होता.

**विहार–** हां बरोबर ! आता पुढचा वृत्तांत ऐका. याप्रमाणे कल्याणी नाहीशी झाल्यावर–

**तोडी–** कल्याणी नव्हे, सीता.

**विहार–** हो हो ! सीता नाहीशी झाल्यावर राम रानोरान शोक करीत भटकूं लागला. शोकामुळे त्याचे डोळे निस्तेज झाले. गालावरचे केस वाढल्यामुळे आणि स्नान नसल्यामुळे चेहरा मळकट दिसूं लागला. असावरि, तू माझ्या तोंडाकडे पाहून गालांतल्या गालांत हंसते आहेस. मी समजलों का तें ! माझाहि चेहरा तसाच झाला आहे म्हणून ना ? ( असावरी पुन्हा हंसते. एकीकडे ) या केसांमुळे माझें तोंड अलीकडे फारच विद्रूप दिसूं लागलें आहे खरें. विधवा आपल्या विद्रूपपणापासून होणारा अपमान कसा सहन करीत असतील त्या असोत ! ही असावरी माझ्या गुढघ्यायेवढी ! पण तिचें हसूं माझें हृदय कापीतच आत गेलें ! मुलांची थट्टा केवळ दांडगाईची आणि म्हणून सुसह्य असते. पण या पोरींची नाजुक थट्टा सोसण्याला फार कठीण बुवा ! (उघड) याप्रमाणे जानकीच्या विरहानें वेडा झालेला राम शोक करूं लागला, 'हे कल्याणी'–

**तोडी–** ' जानकि '

**विहार–** पुन्हा चुकलों ! कल्याणी आणि जानकी हे शब्द अगदी जवळ जवळ आहेत बेटे ! 'क' बद्दल 'जा' 'ल्या' बद्दल 'न' आणि 'णी' बद्दल 'की' हें अक्षर घातलें की 'कल्याणी' पासून 'जानकी' शब्द झाला.

**भैरवी–** काय बाई चमत्कार तरी !

**विहार–** नंतर जटायूकडून रामास रावणानें सीता चोरून नेल्याची सारी हकीगत कळल्यावर त्यानें सुग्रीवाला त्याच्या भावाशीं लढाई देण्याला मदत केली, आणि त्याला त्याच्या सिंहासनावर बसविलें. नंतर समुद्रावर सेतु बांधून माकडांच्या साह्यानें कल्याणीला–नव्हे–सीतेला रामचंद्रांनीं परत आणिली. भैरवि, साग पहूं मीं सांगितलें त्याचा साराश ?

**भैरवी—** माझ्या बाई कांहीं लक्ष्यांत राहिलें नाही ! माझें सारें लक्ष्य होतें कल्याणीबाईकडे.

**विहार–** अभ्यासाच्या वेळीं असें भलतीकडेच लक्ष्य ठेवूं नये. बरें, काय ग कल्याणीबाई तुमच्यावर प्रेम करितात का ?

**भैरवी–** त्या किती प्रेमळ आहेत म्हणून सागूं ? साऱ्या मुलींशीं आई-सारख्या वागतात.

**विहार–** आणि त्या दिसतात कशा ग ?

**भैरवी–** तें नाहीं मीं इतक्या बारकाईनें पाहिलें.

**विहार–** तूं अशीच वेंधळी आहेस झालें ! मघाशींहि तुझें लक्ष्य माझ्या गोष्टीकडे नसून कल्याणीबाईकडेच होतें.

**भैरवी–** ( एकीकडे ) माझें एकटीचेंच नव्हतें.

**असावरी–** गुरुजी, कल्याणी आणि जानकी हे शब्द जर सारखे सारखे आहेत, तर आता नाहीं तुमच्या तोंडीं कल्याणीबद्दल जानकी शब्द चुकून येत !

**विहार–** अग चूक जर याप्रमाणे नेमानें होऊं लागली तर तिला चूक कोण म्हणेल ?

**असावरी–** खरेंच बाई ! हें नाहीं माझ्या लक्ष्यांत आलें.

**विहार–** बरें, आता कोण सागतें मघाच्या गोष्टीचें तात्पर्य ?

**धन्यश्री–** मी सागतें.

**विहार–** तूं ? येवढीशी चिमुरडी ! बरें सांग सांग पाहूं ?

**धन्यश्री–** रामानें रावणाला उचलून नेलें; मग कल्याणी रडूं लागली की 'अगे सीते, मला कां सोडून गेलीस ?' मग वाटेंत सुग्रीव भेटला; त्यानें रावणाला चोरल्याचें वर्तमान सांगितलें. मग सेतूवर समुद्र बांधून सुग्रीवाच्या मदतीनें कल्याणीला सीतेनें सोडवून आणिलें.

**विहार–** वाः ! सगळें रामायण होऊन सीता रामाची कोण याची वानवाच !

**हरिहरशास्त्री** ( प्रवेश करून )– आपणांशीं जरा एकीकडे चार शब्द बोलावयाचे आहेत. जरा इकडे याल तर बरें होईल.

**विहार**– मुलींनो, आज तुम्हांला सुट्टी आहे. जा खेळायला. ( मुली आनंदानें उड्या मारीत जातात. ) शास्त्रीबुवा, आज कुणीकडे ?

**हरिहर**–आपलें कुटुंब निवर्तल्यापासून आपल्या मनांत मजविषयीं मध्यंतरीं कांहींसा अविश्वास उत्पन्न झाला होता. खरी आहे ना ही गोष्ट ?

**विहार**— मुळीच नाहीं. जें घडून आलें तें केवळ माझ्या अदृष्टानें घडवून आणिलें.

**हरिहर**–तर मग आपला मजवरचा विश्वास दाखविण्याची संधि आल्यास आपण त्याची साक्ष पटवाल म्हणायचें ?

**विहार**–याबद्दल तुम्हांला संशय वाटत असेल तर माझी त्याबद्दल परीक्षाच घ्या म्हणजे झालें.

**हरिहर**–मी जें आपणांस सांगणार आहें तें आपली परीक्षा पाहाण्यापेक्षा माझ्या पूर्वींच्या प्रमादाचें क्षालन करण्याकरिताच सांगणार आहें. ऐका तर. मीं आजपर्यंत आपणांला हजारदा सांगितलें असेल की, या चंद्रिकेचा एकदा धर्माप्रमाणे विधि होऊं द्या म्हणून ! पण आपण तें मनावर घेतलें नाहीं. आपण घरीं नाहीत हें पाहून ती काय चार करूं लागली आहे, कळलें का ? अंगावर सर्व शृंगार करून खिडकीशीं दोन दोन घटका परक्या पुरुषाशीं बोलत बसते.

**विहार**– काय करिते म्हणतां कारटी ?

**हरिहर**– मीं सांगितलें यांतील एक अक्षर खोटें नाहीं.

**विहार**–एकदा तिनें मुलीमुलींच्या खेळांत कपाळाला कुंकूं लाविलेलें मला माहित आहे. बाकी, या थराला गोष्टी जातील असें नव्हतें मला वाटलें.

**हरिहर**–मी तिला आज यासंबंधानें चार उपदेशपर शब्द बोलायला गेलों तों तिनें माझ्यावरच कुभांड घेतलें !

**विहार**–काय ? तुमच्यासारख्या सत्पुरुषावर कुभांड ?

**हरिहर**–तर काय !

**विहार**-- अरेरे ! या वेळीं ती समोर असती तर तिची पाठ फोडून टाकिली असती !

**हरिहर**–स्त्रियांवर आणि हात टाकायचा ! शिव शिव !

**विहार**— तिनें तुमचा उपमर्द करून तुम्हीच तिची कींव करितां ना ! शाबास आहे तुमच्या औदार्याची !

**हरिहर**–तिचें एकदा वचन केलें की तिच्यांत वांकडें जाण्याचें सामर्थ्यच उरणार नाही. घरांत हल्ली स्वतंत्रता आहे म्हणून हे वेडेचार सुचतात. बाकी, पोरगी मोठी गरीब आहे हो !

**विहार**–मीच येऊन याचा योग्य बंदोबस्त केला असता. परंतु येथे मला एक निकडीचें काम असल्यामुळे तिकडे येण्यास फुरसत नाही. शिवाय तुमच्यावर माझा पूर्ण भरंवसा आहेच ! तेव्हा यासंबंधानें जें जें कांही करायचें तें तें मी तुमच्यावर सोंपवितों. तुमचें कदाचित् चंद्रिका ऐकणार नाही, म्हणून तुमच्याबरोबर तिला एक पत्र देतों. तें तिला दिलेंत की तुम्हाला फारशी तसदी पडणार नाही.

**हरिहर**– हा चकोर तर कांही गडबड करणार नाही ना ?

**विहार**– त्याचा मीं आधीच विचार केला आहे. तो आता चंद्रिकेबद्दल मागणी करीत नाही, कांही नाही. त्याचे हातपाय आमच्या कल्याणीबाईंनीं जखडून टाकिले आहेत. ( पत्र लिहितो. )

**हरिहर**–(एकीकडे) याला म्हणतात चोराच्या उलट्या ! या हरिहराच्या इच्छेच्या आड कोणी आलें की त्याला असाच प्रसाद मिळावयाचा !

**विहार**–हं, हें घ्या पत्र. ( देतो. ) मात्र तिला समुद्रतीरीं नेतांना बरोबर कोणीतरी सोबतीला असलें म्हणजे बरें. मीं पत्रांतही तसें लिहिलें आहे.

**हरिहर**–तें नको मला सांगायला ! ती वेणुबाई आहेना बाबासाहेबांकडे ? तिलाच बरोबर नेऊं म्हणजे झालें. ( जातो. )

**विहार**–( स्वतःशीं ) या जगांतील सर्व मनुष्यें चंचलवृत्तीचीं आहेत असें दिसतें. चकोर एका पंधरवड्यांत चंद्रिकेला विसरून गेला. तीहि तितक्याच वेळांत त्याला विसरून गेली. पण त्यांनाच बोल कां लावावा ?

( मगुमुशाम चुवोन घात०—या चालीवर )

**विश्व अखिल चल सदाहि । त्यातें न विराम कांहि ॥ भ्रमण दिसे उडुसमूहिं । अविरत खळ त्यासि नाहिं ॥ ६०॥ बहु**

**चंचल अवनिगोल । नरदेहीं अणुंहि चपल । तन्मतिसी काय नवल । दिसुनि जरी भ्रमण येइ ॥ १ ॥**

देवानें माझ्या अंगीं इतका खंबीरपणा ठेविला आहे हे त्याचे केवढे उपकार आहेत !

**चकोर** ( प्रवेश करून )–( क्रुद्ध मुद्रेनें ) दादासाहेब, तुम्हीं काय मांडिलें आहे हें ? मीं आड उभें राहून त्या नीचाचें आणि तुमचें झालेलें सारें संभाषण ऐकिलें. चंद्रिकेला तुम्ही विरूप करणार ?

**विहार**–अरे बाबा, तिच्या केंसांची आम्हीं गय केली कीं येथील कुटाळ लोक आमच्या डोक्यावरचे केंस राहूं देणार नाहीत. आम्ही जें करीत आहोंत तें सारें तिच्या बऱ्याकरिता आहे. आता तुला सांगायला कांहीं हरकत नाही. अरे, तिला अशीच ठेविली तर ती खास बिघडणार !

**चकोर**–या नीचाच्या सांगण्यावर तुम्ही जातां कीं काय ? या मतलबी मनुष्याची पापी नजर चंद्रिकेवर आहे, हें त्याच्याच विश्वासांतल्या वेणूबाई-कडून मला कळलें. चंद्रिकेला यानें पुष्कळदा वपनाची भीति घातली. ती जेव्हा बधेना, तेव्हा यानें तिजवर कुभांड रचिलें आहे. मीं तुमच्या घरावर सारखा पहारा ठेविला आहे. तुम्हांला जेव्हा वाटतें कीं मी कल्याणीबाईशीं बोलत बसलों आहें, तेव्हा मी तिच्याजवळ नसून तुमच्या घराची टेहळणी करीत असतों.

**विहार**– मग तुमची कल्याणीबाईवर प्रीति नाही तर ?

**चकोर**– छेः ! मुळींच नाही ! ती कितीहि सुंदर असली तरी मला ती सख्ख्या बहिणीसारखी आहे अशी मी शपथ वाहतों.

**विहार**– ठीक ठीक ! बरं, आता तुझें म्हणणें तरी काय ?

**चकोर**–हा नराधम चंद्रिकेला समुद्रतीरावर नेऊन तिची विटंबना करणार ही माझी खात्री आहे. तर मीच तिच्याबद्दल तेथे जाऊन बसतों. आणि तो लाघवी भाषणें बोलून लाडीगोडी करूं लागला की त्याला असा चोप देतों, कीं त्यानें जन्मांत कधीं पाहिला नसेल.

**विहार**– पसंत आहे मला हा बेत !

**चकोर**–पसंत असेल तर चंद्रिकेच्या नांवचें मला एक पत्र द्या. आणि त्यांत हा मजकूर तिला कळवा. ती तुमच्या अर्ध्या वचनांत असते.

**विहार**–माझ्याकडून कांही हरकत नाही पत्र द्यायला. (पत्र लिहितो.)

**चकोर**–(एकीकडे) अगदी भोळा सांब आहे! त्यांतून ताईच्या मरणाच्या खोट्या वार्तेनें याचें मन भांबावल्यासारखें झालें आहे. त्या शास्त्र्यानें मागितल्याबरोबर यानें त्याला पत्र दिलें, आणि मीं मागितल्याबरोबर मला देत आहे! पुनः तो भेटला म्हणजे त्याला तिसरेंहि देईल. तर आपणांला याच्यावर उद्यापर्यंत चांगली नजर ठेविली पाहिजे. (जातो.)

**विहार**--(स्वतःशीं) चकोराची प्रीति कल्याणीवर नाही हें ऐकतांच मला आनंद कां बरें व्हावा? ठीकच आहे. त्यानें तिजवर प्रेम केलें तर तो एक प्रकारचा चंद्रिकेचा उपमर्दच होणार आहे. आणि तिचा उपमर्द तो माझाच नाही का? ठीक! जुळलें! शिवाय चकोराची कल्याणीवर प्रीति जडूं नये अशा इच्छेच्या मुळाशीं या आश्रमाच्या कल्याणाची इच्छाहि आहेच. मुलींना शिकाविण्यांत वेळ घालविण्याऐवजी गुरु जर एकमेकाच्या सहवासांतच घालवूं लागले तर ही संस्था सुराळितपणे चालावी कशी? याप्रमाणे एक खाजगी आणि दुसरा सार्वजनिक असे माझे दोन हेतु आहेत. ते एकदा या मठ्ठ डोक्यांत ठेंचून ठेविले पाहिजेत. नाहीतर प्रसंगीं विसरून जाईन. पहिला हेतु कोणता बरें? अरे अरे! गेला डोक्यांतून निघून! हांहां! आला परत! पहिला हेतु चंद्रिकेचा उपमर्द होऊं नये हा. आणि दुसरा सार्वजनिक स्वरूपाचा उच्च हेतु, की जो माझ्या मनांत पूर्णपणे बिंबला आहे, तो कोणता बरें? तो फारच उच्च असला पाहिजे. कारण तो माझ्या डोक्यांतून वरचेवर उडून गेला. असो, आपणाला आता या हेतूंशीं तूर्त काय करावयाचें आहे? आपलें नेहमीचें चिंतन चालू ठेवावें झालें!

(दिंडी)

**आड केली दृष्टिच्या साखि यमानें।**
**तैशि कल्याणी स्वावगुंठनानें॥**
**उभय चिंतिन त्या तुल्यसौष्ठवांगा।**
**कल्पनास्मृति चकविति कलानिसर्गां॥ १॥**

(पडदा पडतो.)

---

( चंद्रिका व वेणूबाई )

**वेणूबाई**—तुमच्या भावाचें पत्र झालें म्हणून काय झालें ? ते तुम्हाला वाटेल तें करायला सांगतील का ? आणि ते जर तुमची इच्छा गुंडाळून ठेवितात तर तम्हाला तरी त्यांचा कल पाहूनच कशाला चालायला पाहिजे ?

**चंद्रिका**— वेणूबाई, बायका नेहमी कोणाच्याना कोणाच्या तरी ताब्यात असावयाच्याच. त्याना स्वतंत्रता कुठची ? मी हल्ली दादाच्या ताब्यांत आहे. तेव्हा मला त्याच्या मर्जीप्रमाणे नको का वागायला ? शिवाय बाबांच्या घरीं असतांना माझा अपमान होण्याची वेळ आली होती, तेव्हा त्यापासून माझी सुटका दादानेंच केली ना ? तो उपकार मी त्याची अवज्ञा करून फेडूं लागलें तर तें बरें दिसेल का ?

**वेणू**-- मी यःकश्चित् तुमची बटिक ! पण मींसुद्धा कोणाला आपल्या केंसाना हात लावूं दिला नाही. तुम्ही तर चांगल्या थोरा मोठ्यांच्या आहात. तुम्हीं नाही म्हटलें तर तुमच्या अंगाला हात लावण्याची कोणाची प्राज्ञा आहे ? जिचें नख सुद्धा परक्याला दिसण्याची मारामार, तिनें आपलें डोकें अनोळखी आणि भिकार न्हाव्यापुढे लववावें कीं काय ? हें कोणत्या मुलखाचें शास्त्र ? आमच्या पुरुषांनीं आपला देश परक्याच्या स्वाधीन केला तो केला, पण बायकासुद्धा परक्यांच्या हातीं देण्याला त्यांना लाज वाटूं नये हें कशाचें लक्षण ? आम्ही विधवा बायका जीं आपलीं सौभाग्यचिन्हें काढून ठेवितों तीं त्यानींच आता आपल्या अंगावर घालावीं हें बरें ! आम्ही आमच्या वेण्या डोक्यांवरून उतरतों, त्या त्यांनीं आपल्या नेभळ्या डोक्यावर चढवून आमचीं काकणें आपण भरावीं हेंच चागलें !

**चंद्रिका**— वेणूबाई, आपल्या देशांत आज इतक्या विधवाचे होम चालले आहेत, त्यांत माझा एक असला म्हणून काय झालें ?

( नाही कोणीहि हुंगियलें०—या चालीवर )

**किति असती मजसम नारी । बहु कष्टी ज्या संसारीं । प्रणया-**
**विण जगती सारी । अटवीसम भासे ज्यांना ॥ १ ॥ निज आप्तां**
**गणुनी स्वामी । रत असति सदा तत्कर्मीं । प्रियहृदया परि**
**या जन्मीं ॥ धनिनि नच ज्या हतदैवा ॥ २ ॥**

त्यांतून मला आता हे केंस ठेवून काय करायचें आहे ? ज्यांच्याकरितां ठेवावयाचे त्यांचें तर मजवरचें प्रेम उडून गेलें. माझ्या केंसांना त्यांच्या स्नेहाचा काय तो आधार ! तो स्नेह संपल्यावर त्यांनीं कसें जगावें ?

**वेणू**– त्या मेल्या शास्त्र्यानें सांगितलें तें मला मुळीं म्हणतां मुळीं खरें वाटत नाही. त्याचें कोणतें खरें असतें म्हणून हें खरें मानायचें आहे ? त्यांतून चकोरांचा स्वभाव किती प्रेमळ आहे !

**चंद्रिका**– फार प्रेमळ आहे म्हणून तर ज्याच्या त्याच्यावर प्रेम करीत सुटतात ! मला आता खरें विचाराल तर या केसांबद्दल मुळींच भीति वाटत नाही; तर त्या मेल्या शास्त्र्याबद्दल वाटते. या निमित्तानें मला दूर नेऊन भलतेंसलतें करायलाहि मेला चुकणार नाही.

**वेणू**— त्याची तुम्हाला नको काळजी ! मी आणि आपले गडी बरोबर असले म्हणजे त्या मेल्याची कांही मात्रा चालायची नाही.

**गडी**– ( प्रवेश करून ) ताईसाहेब, चकोरमहाराज आले आहेत.

**वेणू**–जा, पाठवून दे त्यांना इकडे. (गडी जातो.) ताईसाहेब, आता ते आले की नाही म्हणजे त्याच्याशीं चांगलें प्रेमानें बोला बरें ! यानंतर तुम्हांला त्यांना तोंड दाखविण्याचा प्रसंगहि कधी येणार नाही. हीच त्यांची शेवटची भेट समजा.

**चकोर** ( प्रवेश करून )–( स्वतःशीं ) चंद्रिकेची दृष्टि एखादा निश्चय करून चुकावा त्याप्रमाणे निश्चल दिसत आहे. आमच्यांतील गतभर्तृकाचे निश्चय त्याच पाळूं जाणत ! ( उघड ) चंद्रिके, दादासाहेबांच्या पत्राप्रमाणे वागण्याचा तुझा निश्चय झाल्यासारखा दिसतो.

**चंद्रिका**– त्यांची आज्ञा मला शिरसामान्य आहे.

**वेणु**–हो, ती आज्ञा यांच्या मस्तकानें मान्य केली आहे, इतकेंच नाही तर त्यांच्या रोमारोमानेंसुद्धा केली आहे.

**चकोर**–पण दादासाहेबांनीं आपला बेत हल्ली बदलला आहे.

**चंद्रिका**–घटकेघटकेंत आपला बेत बदलणारे दुसरे कोणी असतील ! ते नाहीत हें खास !

**चकोर**–तर मग तुझा मजवरचा विश्वास पार उडाला ? चंद्रिके,

( शामसुंदर कंसारी०—या चालीवर )

**सांडिला विश्वास कसा। प्रेमाचा तो श्वास जसा। श्वास न**

**कीं आत्माचि तसा ॥ ध्रु० ॥ प्रमाद काय मजकडुनि घडला घडवि जो अविश्वास असा ॥ १ ॥**

**चंद्रिका**–विश्वास रहावा कशाच्या आधारावर ? जिकडे आपलें प्रेम उडून गेलें तिकडेच विश्वासहि उडून गेला.

**चकोर**–तूं कल्याणीबाईबद्दल म्हणत असशील.

**चंद्रिका**–आपण माझ्या मनातलें बरोबर ताडले हें मोठेंच नवल ! मीं कांहीं त्या बाईचें नांव घेतलें नव्हतें ! आणि मला आता दुसऱ्याच्या नांवाशीं करायचें आहे तरी काय ?

**चकोर**–माझेंहि नांव तूं सोडणार तर ? हा आपल्या विवाहास शुभशकुनच म्हणावयाचा ! कारण बायका आपल्या पतीचें नाव घेत नसतातच !

**चंद्रिका**–आपण कांही आता लहान नाही, म्हणून प्रेम एकीकडे आणि लग्न भलतीकडे असा आपला प्रकार होईल.

**चकोर**–चंद्रिके, मीं तुझ्या दादाजवळ शपथपूर्वक सांगितलें, तसें तुझ्याजवळहि सांगतों की, कल्याणी माझ्या सख्ख्या बहिणीप्रमाणे आहे. तिच्याबद्दल जर माझ्या मनांत कधी पाप आलें असेल तर ही जिव्हा झडून जावो.

**चंद्रिका**–मग तिच्याबरोबर एकांतांत गोष्टी कशाला करायला हव्या ?

**चकोर**– त्याचा उलगडा मी लवकरच करणार आहें. लोकांच्या मनांत असे भलते भलते संशय यावे हें आश्रमालाहि अंतीं अपायकारकच आहे. म्हणून मला याचा लवकरच खुलासा केला पाहिजे. तोंपर्यंत तुझा मजवरचा अविश्वास असूं दे पाहिजे तर. दादासाहेबांनीं आपला पहिला बेत बदलला याबद्दल तुझी खात्री होत नसेल तर हें पहा पत्र. ( पत्र देतो. चंद्रिका वाचते. )

**चंद्रिका**–उद्या माझ्या जागीं आपण जाऊन बसणार असें यांत लिहिलें आहे.

**चकोर**–उद्याचेंच कशाला ? तूं जेथे असशील तेथे माझें नेहमीच वास्तव्य व्हावें अशी या हृदयाची इच्छा आहे. बरें, उद्या सकाळीं त्यानें समुद्रावर केव्हा बोलविलें आहे ?

**वेणु**– पहांटे चार वाजण्याच्या सुमारास. माझ्यावर त्या मेल्याचा पक्का भरंवसा असल्यामुळे त्यानें त्या वेळेला ताईसाहेबांना नेण्याचें काम निर्धास्तपणे माझ्यावर टाकिलें आहे.

**चकोर**–संकेतकालावरूनसुद्धा त्याचा दुष्ट आणि पापी हेतु दिसून येतो. पहाटे चार वाजतां, की ज्यावेळीं तेथे चिटपांखरूंहि नसणार, अशा वेळीं तेथे बोलवावयाचें दुसरें काय प्रयोजन असणार आहे ?

**वेणु**–तें आम्हां बायकांना काय माहित ?

**चकोर**– ठीक आहे तर. उद्या मी आणि वेणूबाई ठरलेल्या वेळीं संकेत-स्थलीं जाऊन बसणार. वेणूबाई, तुमचा अजून सगळ्या पुरुषांवरचा विश्वास उडाला नाही ना ?

**वेणू**– मी मोठ्या आनंदानें तुमच्याबरोबर येईन.

**चकोर**– त्याबद्दल मी तुम्हाला बक्षीसहि चांगलें देईन. त्या दुष्टाला मरे मरे तों मारून तुमचे डोळे निववले म्हणजे झालें की नाही ? मात्र तुम्हीं मजबरोबर यायला चंद्रिकेची संमति पाहिजे. कारण ती जरी माझ्या इच्छे-विरुद्ध वागली तरी मी तिच्या इच्छेबाहेर केंसभर सुद्धा वागणार नाही.

**वेणू**– मघाशीं तुम्ही ताईसाहेबांच्या मनाविरुद्ध केंसभर वागायला तयार झाला होता, तें विसरलांत वाटतें इतक्यांत ?

**चंद्रिका**– आपण जो उलगडा करण्याचें कबूल केलें आहे तो ऐकल्या-वर मग याचा काय तो जबाब देईन. नाहीतर आपला तरी जबाब घेईन.

**चकोर**– तुझी आज्ञा प्रमाण आहे. ( जातात. )

---

## प्रवेश २ रा

### ( हरिहरशास्त्री )

**हरिहर**– ( स्वतःशीं ) मी ज्या संधीसाठी टपून बसलों होतों ती आली नाही ती नाहीच. शेवटीं दांडगाईनें घरांत शिरून आनंदरावांना भेटण्या-शिवाय इलाजच राहिला नाही. त्यांच्यासारख्या भित्र्या मनुष्याला माझ्या भेटीचा हेतु कळल्यावर ओरड करण्याचें किंवा मला माराचा धाक दाखवि-ण्याचें धैर्यच होणार नाही. शिवाय त्याच्यासारख्या फाजील विचारी माणसा-च्या मनांत माझें भाषण अंकुरहि तेव्हाच धरील. भुसभुशित जमिनींत बीं तेव्हाच रुजतें असा नियम आहे. एकदा त्याला संशय येऊन त्यानें माझ्या बोलण्याचा खरेपणा पडताळून पहाण्याची संधि आणिली म्हणजे मग पुढील

गोष्टींची मला मुळींच फिकिर नाही. कारण मनोहराचें ठाणें सरस्वतीच्या रंगमहालांत बसण्यापूर्वींच तीं परस्परांवर फिदा होतीं. त्यानंतर इतक्या दिवसांचा एकांत सांपडल्यावर त्याचा त्यांनीं उपयोग करून घेतला नसेल हें संभवत नाही. तर आता मनाचा घडा करून शिरोवेंच आंत आणि भीड-मुर्वंत न ठेवितां एकदम सर्व ओकून टाकावें. मी आता आनंदारावांचा आश्रित नसल्यामुळे त्यांची भीड ठेवण्याचें कांहीं कारण नाही. ( पडद्यांत जाऊन पुन्हां प्रवेश करितो. )

**आनंदराव**– (प्रवेश करून) तुम्हाला सांगितलें ना या घरात पुन्हा पाऊल टाकायचें नाही म्हणून? अरे कोण आहेरे तिकडे?

**हरिहर**–मीं घरांत पाऊल टाकायचें नाही आणि इतरांनीं मात्र घरांदारांत वाटेल तेथे प्रवेश करायचा हा कुठला पक्षपात? आपण ओरडून चार मंडळी गोळा कराल तर त्यात आपणांलाच पश्चात्ताप होणार आहे.

**आनंदराव**–मला नाही उमजत हें तुमचें कुचकें बोलणें.

**हरिहर**–कुचका आणि आंतल्या गाठीचा मनुष्य पुरवला, पण आपल्यासारखा भोळा सांब नाही उपयोगी. अहो, आपलें स्त्रीधन चोरानें चोरून नेलें, आणि आपण स्वस्थ घोरत पडलां आहांत?

**आनंदराव**–सरस्वतीचें स्त्रीधन कीं काय?

**हरिहर**–आपलें स्त्रीरूपी धन! सरस्वतीचें कुठलें? ती तर चोराला सामील असणार! अजून नाहीना लक्ष्यांत येत? बरोबर आहे! स्त्रीचें कुकर्म पतीला सगळ्यांच्या मागाहून समजायचें!

**आनंदराव**–दुष्टा, काय म्हणतोस? सरस्वतीच्याकडून असें कृत्य? कधीहि होणार नाही! या शब्दांबद्दल तुला मात्र येथल्या येथेच प्रायश्चित्त देतों.

**हरिहर**–मीं म्हटलें तें खोटें नाही. आपली खात्री सर्वांच्या शेवटी व्हावयाची!

**आनंदराव**–मूर्खा, नुस्त्या तुझ्या शब्दांनीं माझी खात्री होण्याची आशा बाळगतोस! थांब, तुला नोकरांकडून जेरबंदानें मारविलें पाहिजे.

**हरिहर**–आणि माझी खात्री केली पाहिजे, असेंच ना? हें पाहा, असे संतापून जाल तर आपली खात्री कशी करायची? खात्री होण्याला विचारशक्ति जागेवर पाहिजे; आणि ती जागेवर असायला डोकें शांत पाहिजे.

**आनंदराव**–बरें, तसें कां होईना! माझ्या स्त्रीधनाचा चोर कोण म्हणतां?

**हरिहर**–ज्यानें लोकांच्या शंभरांहून अधिक विधवा चोरून त्यांचा जनानखाना बनविला आहे त्या विधवांच्या कनवाळूपेक्षा दुसरा कोणता असणार? त्याला सरस्वतीबाईचीहि कींव आली.

**आनंदराव**–कोण? मनोहरपंत? मग झाली माझी खात्री!

**हरिहर**–झाली ना अगदी पूर्ण खात्री?

**आनंदराव**–होय! की एकतर तुम्ही वेडे आहांत किंवा हें सारें कुभांड आहे. अहो, त्या पुरुषाची योग्यता काय, तुमची काय, वाटेल त्यानें जीभ उचलावी आणि लावावी टाळूला म्हणजे काय? अहो, मनोहरपंत म्हणजे सामान्य मनुष्य नव्हे. कोणाला परगांवीं जायचें असलें आणि बायकोला बरोबर नेण्याची अडचण असली म्हणजे खुशाल तिला त्यांच्या हवालीं करून जावें.

**हरिहर**–आणि परत आल्यावर सव्याज परत घ्यावी असेंच कीं नाही?

**आनंदराव**–शिवशिव! काय बोलता हें? ज्याच्या कीर्तीला अजून निंदेनें स्पर्श केला नाही——

**हरिहर**–त्यानें आपल्या कुटुंबाला कसा स्पर्श करावा म्हणता?

**आनंदराव**– हो हो! असेंच म्हणतों मी!

**हरिहर**–– अहो, मनोहरपंत म्हणजे वसुधैवकुटुंबकवृत्तीचे थोर गृहस्थ! सगळी दुनिया त्यांचें कुटुंबच!

**आनंदराव**–काय घाणेरडे हे शब्द! हें पाहा, या गोष्टीचा पुरावा नसेल तर यापैकी प्रत्येक शब्द तुम्हाला चांगला जाचेल बरें?

**हरिहर**–– आपण पुरावा मागतां हें योग्यच आहे. जो मनुष्य हलक्या कानाचा असतो त्याचे कान लांबीमुळे जडहि असतात. पण आपणाला पुरावा कसा पाहिजे? तीं दोघेंजण एका खोलींत एकत्र असलीं तरी आपली खात्री थोडीच व्हायची आहे? कारण आपण स्वतःच तर शिक्षणाचें निमित्त पुढे करून त्यांना प्रहरन् प्रहर कड्याकुलुपें घालून कोंडून ठेवीत असतां!

**आनंदराव**–त्याचें संभाषण तर आड उभें राहून ऐकायला सांपडेल कीं नाही?

**हरिहर**–सांपडेल तर! आणि त्यावरून आपली खात्रीहि होईल.

**आनंदराव**–ठीक आहे. उद्या रविवार आहे ना? मनोहरपंत उद्या सरस्वतीला नेहमीप्रमाणे सध्याकाळचे शिकवायला येतील. त्यावेळीं तुम्ही येऊन मला आमच्या घराचे पिछाडीस भेटा. म्हणजे काय तो सोक्षमोक्ष होऊन जाईल.

मी त्यावेळीं बाहेर गेल्याचा बहाणा करीन म्हणजे झालें.

**हरिहर**–मला उद्या मजाव मात्र होऊं नये. ( जातो. )

**आनंदराव**–(स्वतःशीं) मीं मूर्खानें माझ्यापेक्षा तिसांहून अधिक वर्षांनीं लहान अशा मुलीशीं लग्न केलें याचे परिणाम कोठवर जाणार कुणास ठाऊक ! यापेक्षा मीं तीसपस्तीस वर्षांच्या विधवेशींच लग्न लाविलें असतें तर किती चांगलें झालें असतें ! माझ्या स्त्रीला माझ्या उदार वर्तनाचे असंख्य उपकार वाटून ते कसे फेडूं असें होऊन गेलें असतें. शिवाय समान वयांमुळे तिचीं माझीं मतेंहि बरींच जुळलीं असतीं. मीं पुनर्विवाह केला असता तर या दुर्धारकांनीं मात्र कुचेष्टा मांडली असती. पण सरस्वतीचें वर्तन खरोखरच गैर असलें आणि तें जगजाहिर झालें तर कोण माझी गय करणार आहे ? सुधारक आणि दुर्धारक यांचें माझी थट्टा करण्यांत मात्र एकमत होईल. कारण परस्त्रियांच्या कुटाळक्या करणें कोणाला नको असतें ? आता माझा सारा भरंवसा मनोहरपंतावर आहे. आणि ते माझ्या आशेची निराशा करणार नाहीत अशी माझी मनोदेवता सांगत आहे. पण या हरिहरशास्त्र्याला माझें घर बंद करण्याला मनोहरपंतांनींच सुचविलें नव्हतें का ? तें काय म्हणून ? सर्व घर निर्मक्षिक करून सरस्वतीशीं एकांत मिळवावा म्हणून तर नसेल ना ? पण आता विचार कशाला पाहिजे ? हा सूर्य आणि हा जयद्रथ हें पाहाण्याची वेळ जवळच आली आहे. ( जातो. )

---

## प्रवेश ३ रा.

( देवालयांत **चकोर** लपून बसला आहे. )

**हरिहरशास्त्री** (प्रवेश करून)—(स्वतःशीं) चंद्रिका या देवळांत माझीच वाट पाहात बसली असेल. ( वेणूबाई प्रवेश करिते. ) कसें काय वेणूबाई ? आहे ना सगळी तयारी ?

**वेणू**— त्या येथे येऊन बसल्याला कितीतरी वेळ होऊन गेला ! अशा कामांत तुमच्याकडूनच उशीर व्हावा हें एक आश्चर्यच म्हणावयाचें !

**हरिहर**— आता आणखी बोलून वेळ घालविण्यांत काय अर्थ ? चंद्रिकेला कडकडून भेटायला मी कसा उतावळा झालों आहें !

**वेणू**— (एकीकडे) मेल्या, तुला चांगली कडकडून भेट मिळेल! (उघड) मी आता आड होतें. दोघांत तिसरें कशाला पाहिजे?

**हरिहर**— मीसुद्धा तेंच सुचविणार होतों तुला. (वेणूबाई जाते. देवळांत प्रवेश करून स्वतःशीं) आंत अगदी अंधार गुडुप आहे. पण अशा कामाला उजेड कशाला पाहिजे? चंद्रिकेनें माझ्या अंतःकरणांत जो प्रकाश पाडिला आहे त्याहून दुसऱ्या प्रकाशाची येथे कांही जरूर नाही. देवळांत अशीं कृत्यें करण्याला प्रथम प्रथम मला धैर्यच होत नसे. पण आता मी इतका निढावलों आहें की या गोष्टी देवाला साक्षी ठेवून करण्यांत मला कांहीच दिक्कत वाटत नाही. (उघड) प्रिये चंद्रिके, आता तरी माझ्या म्हणण्याला कबूल हो. म्हणजे अजून तुझी सुटका होऊन तुझा केशकलाप संपूर्ण स्थितींत राहील. तुझ्या मुखचंद्रावरील केशकलापाचा कलंक जर तुला ठेवावयाचा असेल तर तुझ्या आचरणाला थोडासा कलंक लावून घेण्याला तुला तयार झालें पाहिजे.

**चकोर**— (एकीकडे) अरे दुष्टा!

**हरिहर**— तुला लोकापवादाची भीति असेल तर अशा गाढ अंधकारांत मला दिलेलें गाढ आलिंगन लोकांना कसें कळणार? पृथ्वीच्या पाठीवर अशीं किती तरी माणसें आहेत की जीं अंधारांत वाटतील तीं कृष्णकृत्यें करून दिवसा उजळ माथ्यानें संचार करितात. तुला देवाचें भय वाटत असेल तर एखाद्या पोथीचें एक जरी पारायण केलेंस, तरी एकच काय? शेंकडों जन्मांचीं पातकें धुतलीं जातील. तुझा चकोर तर तुझ्या पकडींतून पार निघून गेला आहे.

**चकोर**— (एकीकडे) दुष्टा, माझ्या पकडींत पुरा सांपडलास आता!

**हरिहर**— तर मग आता आलिंगन देण्याला विलंब कां लावितेस?

**चकोर**— (एकीकडे) हा पाहा तयारच आहें! (उभा राहातो.)

**हरिहर**— काय? तुला माझी विनंति मान्य झाली शेवटीं? अहाहा! धन्य! धन्य आहें मी आज! (चकोरास आलिंगन देतो. चकोर त्यास आंवळून मारतो.)

**हरिहर**— अग वेणे, माझा गळा कापिलास ग!

**चकोर**—तुला एका अनाथ मुलीची वेणी पाहिजे होती ना? मग वेणीनें तुझा गळा कापिला यांत काय वाईट केलें? तूं किती अबलांचे केंसानें गळे कापिले असशील!

**हरिहर–** मूर्खा चकोरा ! तुला मी दाद येणार आहें कीं काय ?

( दोघांची झोंबी सुरू होते. दोघे पडद्यांत जातात. )

**वेणूबाई–**(प्रवेश करून) काय म्हणतां मी तुमचा गळा कापला ? मग माझा आणि माझ्या बाळाचा गळा कापतांना नाही हो तुम्हाला कांही वाटलें ? ( हरिहरशास्त्री पडद्यांत ओरडतो. ) मर मेल्या ! मर असाच !

**चकोर–**(प्रवेश करून) वेणूबाई, त्याला बेदम मार देऊन तसाच निपचित ठेवून आलों. फिटलें ना तुमच्या डोळ्यांचें पारणें ? चला तर घरीं. (जातात.)

---

## प्रवेश ४ था

### ( तरंगिणी, जोगी, असावरी, भैरवी )

**जोगी–**कल्याणीबाई, तुम्हाला बरें वाटत नाही असें कळलें मात्र, आणि मला जें काही झालें तें विचारूं नका !

( नित काग उडादी मैं०–या चालीवर )

**मम मानस बावरलें । सगळें धैर्य गळे मुखकांति पळे ॥ ध्रु० ॥**
**एकाएकीं माता जेवीं । शयनीं रोगें ग्रस्त पडावी । काळजि**
**तेविं मनीं उमळे ॥ १ ॥**

**तरंगिणी–**बाळे जोगी, इतकें घाबरण्यासारखी कांही मी आजारी नाही.

**असावरी–** नाही तर काय ?

( काना न करत मुसे रार०–या चालीवर )

**सुटत बहुत या कंप देहीं । घर्म फुटे रोमारोमाप्रति । रोमांच**
**उठे वदनींही ॥ ध्रु० ॥ रोगाचीं हीं उघड लक्षणें । शंका कां**
**मनिं निपजे ही ॥ १ ॥**

**तरंगिणी–** (एकीकडे) तिकडच्या भेटीच्या उत्सुकतेमुळे माझी झालेली चमत्कारिक अवस्था रोगामुळे झाली असेंच या समजतात ! भोळ्या बिचाऱ्या !

**भैरवी–** तें कांही असो, तुम्ही बऱ्या असा किंवा वाईट असा. आम्ही तिघींनीं तुम्हांला बरें वाटावें म्हणून या वस्तु आणिल्या आहेत, त्या तुम्ही अवश्य घेतल्या पाहिजेत.

( माइ सरसती शारदा०–या चालीवर )

**अम्हिं मिळुनियां आणिली । रम्य सुगंधी सुमांची माळ रचुनि उटिहि करूनी त्या आगळी ॥ ध्रु० ॥ ध्यावेंत शीत विमल पेय अमृताहुनिही बहुत मधुर साचें । विंझणेहि वाळ्याचे । प्रकृति क्षणिं करितिल हीं चांगली ॥ १ ॥**

**तरंगिणी**– ( एकीकडे ) रंगमहालाची सगळी तयारी आयती झाली ! आता तिकडच्या येण्याचाच काय तो उशीर आहे ! ( उघड ) वेड्या कुठच्या ! अग, ताप बरा व्हावा म्हणून कोणी असले का उपाय योजितें ? यावरून तुमचें मजवरचें निर्मळ प्रेम मात्र दिसून आलें खरें. बरें, ठेवा तें सगळें साहित्य खाली आणि जा खेळायला. मला आता जरा स्वस्थता पाहिजे. (मुली जातात. स्वतःशीं ) कल्याणीचा हा आजार शेवटचाच म्हणावयाचा. कारण आता दोन घटिकांतच तिचा अंत होऊन तरंगिणीचा पुन्हा जन्म होणार ! तिकडच्या भेटीच्या विचारानें मला एकपरी आनंद आणि दुसऱ्यापरी खिन्नता वाटूं लागली आहे. जर माझे प्रियकर कल्याणीच्या मोहाला बळी पडले नाहीत तर पत्नीच्या नात्यानें आनंद, पण बहिणीच्या आणि भावजईच्या नात्यानें विषाद वाटेल. जर ते त्या सटवीच्या पाशांत पडले तर चकोराचें आणि चांद्रिकेचें लग्न लागणार म्हणून संतोष, परंतु माझे पति इतक्या चंचळ चित्ताचे आहेत म्हणून वाईट वाटेल. पण या अपुऱ्या जगांत एकाचें सुख तें दुसऱ्याचें दुःख असें चालावयाचेंच ! ही आलीच वाटतें स्वारी ! आता पलंगावर आजाऱ्याचें सोंग घेऊन पडलें पाहिजे.

( पलंगावर पडते. विहार प्रवेश करितो. )

**विहार**– ( स्वतःशीं ) चकोरानें ही वार्ता सांगितल्याबरोबर माझी कांही चमत्कारिक स्थिति झाली !

( जो तूं रचो समान ० – या चालीवर )

**हें कळे न काय होत । कल्याणी अंगिं आर्त । परिसुनि हें कानिं वृत्त । भ्रांतचित्त बनुनि जात ॥ ध्रु० ॥ तत्परिचय परम अल्प । सहवासहि मासकल्प । नच विकल्प । प्राण तीरिहि तदायत्त । पूर्ण गमत ॥ १ ॥**

तिचा आणि माझा अध्यापनाचा उच्च हेतु एकच असल्यामुळे आमचा स्नेह इतका जडून गेला आहे की, तिजवांचून मला आणि मजवांचून तिला मुळीच करमत नाही. पुरुषापुरुषांचा स्नेह जमतो त्यापेक्षा स्त्रीपुरुषाचा फार लवकर जमतो हें अगदी खरें आहे. तशातून तिचें प्रियेशीं सादृश्य असल्यामुळे तिच्या स्नेहावर माझा एक प्रकाराचा हक्कच असल्यासारखा वाटूं लागला आहे. देवा ! हा आमचा निरपेक्ष स्नेह असाच चिरकाल राहूं दे. (उघड) कल्याणी-बाई, तमची प्रकृति बरी आहे ना ?

**तरंगिणी**– आतापर्यंत फारशी चांगली नव्हती; पण आपण आल्यापासून जरा बरें वाटायला लागलें आहे.

**विहार**– ( एकीकडे ) हिचें मजवर किती तरी प्रेम हें ! चकोरांशीं जर ती विचित्र प्रतिज्ञा केली नसती तर–शिवशिव ! विहारा, या स्त्रैण विचाराला हृदयांत थारा देतोस ? अरे याच हृदयांत तूं जिवलग तरंगिणीला स्थान दिलें होतेंस ना ? आणि तें असें भ्रष्ट करितोस ? धिःकार असो तुला !

( हंसारे राजा ये पिंजरा ०– या चालीवर )

**अवचित कां विसरसी गत गोष्टी । कां भंगिसि शपथ अनु-घटी ॥ ध्रु० ॥ परनारी ही त्याज्य तुला रे । न पड तियेच्या कपटीं ॥ १ ॥ लंपट करि तुज मासमात्र का वास इयेच्या निकटीं ॥ २ ॥**

मीं एके ठिकाणीं असें वाचिलें आहे की ज्याला सद्गुणी व्हावयाचें असेल त्यानें अंतर्यामींच्या इच्छा मारिल्या पाहिजेत. तर आता हिच्याकडे पहाण्याची जी मला अनावर इच्छा झाली आहे तिचा बीमोड केला पाहिजे. (थांबून) झाला, माझा पूर्ण मनोजय झाला ! आता पहिली इच्छा जाऊन हिजकडे मुळीच पाहूं नये अशी नवीनच इच्छा उत्पन्न झाली आहे. पण पहिल्याप्रमाणे याहि इच्छेचा भंग करावयास नको का ? अलबत केला पाहिजे. तर आता इच्छेविरुद्ध हिजकडे एकदा डोळे भरून पहावें, आणि येथे आलों आहोंत त्याप्रमाणे नुसत्या स्नेहाचें वर्तन करून परत फिरावें. (उघड) कल्याणीबाई, मला थोडें वैद्यक समजतें. तुमची परवानगी असेल तर तुमची नाडी पहातों.

**तरंगिणी**–(एकीकडे) अजून कांही सांगावत नाही यांचा नेम ! हें सारें

शुद्धभावानेंच चाललें असेल. (उघड) मला पतिवियोग झाल्यापासून माझ्या हाताला अजून परपुरुषाचा स्पर्श झाला नाही. पण आपला व माझा स्नेह विशेष, म्हणून आपणांला हात दाखवायला माझी कांही हरकत नाही. हा पहा.

**विहार**– ( नाडी पहात स्वतःशीं ) अहाहा ! काय हिचें हें स्पर्शसुख ! (डोळे मिटून) मला वाटतें की मीं तरंगिणीचाच हात धरिला आहे ! (उघड) तुम्ही मजवर इतका विश्वास ठेविता याबद्दल मी तुमचे आभार मानितों. माझाहि तुमच्यावर असाच विश्वास आहे.

( दिंडी )

**प्रथम दर्शन अपुलें घडे क्षणीं त्या ।**
**स्नेह निष्कारण निपजला हृदीं या ॥**
**अचल वस्तुहि कर्षिति परस्परांसी ।**
**अयश्चुंबकमणि जेविं निकटवासी ॥ १ ॥**

खरें पाहूं गेलें तर तुम्ही परस्त्रीच. पण आपला स्नेह जडल्यापासून माझ्या मनातून आपपरभाव अगदी मावळून गेला आहे. याला कारण पूर्वजन्मींचा कांही संबंध नसेल ना ?

**तरंगिणी**–(एकीकडे) याच जन्मातला संबंध ! आणि तोहि अत्यंत निकट !

**विहार**—तुमची नाडी पाहिली मीं. पण नाडीपरीक्षेवरून कळलेल्या गोष्टी मुखपरीक्षेवरून पडताळून पाहाव्या लागतात. तर तुमची नाखुषी नसेल तर तुमचें मुखकमल–नव्हे मुखचंद्र–तसेंहि नव्हे, नुस्तें मुख पाहीन म्हणतों.

**तरंगिणी** — ( एकीकडे ) भटाला दिली ओसरी, आणि भट हातपाय पसरी ! (उघड) हें पाहा, माझा द्वितीय विवाह होईपर्यंत मी कोणालाहि तोंड दाखविणार नाही अशी शपथ वाहिली आहे. आमच्या गुजराथेंत कांही कुटुंबांत दक्षिणी ब्राह्मण बायकासुद्धा बुरखा घेतात. तो बुरखा मला ही शपथ पाळण्याचे कामीं फार उपयोगी पडला.

**विहार**— बरें, अशी शपथ वाहाण्याचें कारण ?

**तरंगिणी**— कारण पुरुष नेहमी बाह्य सौंदर्यालाच प्रथम भुलून लग्न करितात आणि नंतर आपल्या बायकांचा वीट आल्यावर त्यांना नानाप्रकारें छळतात, असा मला पहिल्या लग्नाचा अनुभव आला. तेव्हां केवळ माझे गुण

ओळखून जर कोणी माझ्याशीं विवाह लावील तर त्यालाच तोंड दाखवायचें, इतरांना नाही, असा मीं संकल्प केला आहे.

**विहार**— पण नुस्ता चेहरा बुरख्याच्या आंत लपवून हा कार्यभाग कसा सिद्धीला जाणार ? हे कोमल हात, शरीराची ही ठाकठिकीची ठेवण, मंजुळ आवाज, मोहक गति, या घरभेद्या वस्तु तर लपत नाहीत ना ? वेलीचे कोमल पल्लव पाहून तिच्या पुष्पांविषयीं अनुकूल अनुमान काढणार नाही असा एक तरी मूर्ख जगांत दिसून येईल का ?

( बारे दसरथके प्यारे ०– या चालीवर )

**सुंदर वदन नसेल कसें । अवयव इतर जरी सुरुचिर हे असती लावण्यें खचलेसे॥ ध्रु० ॥ ऐशी अवयवपंक्तिसमस्या । दिधली जरि रसिका उकलाया । पुरविल कल्पुनि मोहक आस्या । संशय यांत न भासे ॥ १ ॥**

तुमच्या लावण्याची पूर्ण कल्पना मला यापूर्वीच होऊन चुकली आहे. मग शपथ उगीच शब्दशः पाळण्यांत काय अर्थ ? तर त्वरा करून मला तुमचें मुख पाहूं द्या.

**तरंगिणी**— बायका पुरुषांप्रमाणे चंचल नसून एकवचनी असतात.

( लो फूल जानी ०– या चालीवर )

**बहु चंचला खरी ही । दिसुनी नृजाति येई॥ सारी ॥ ध्रु० ॥ विमला निशा ही नारी । अचलव्रतानुसारी । परि चंद्र चंचल भारी॥ १ ॥ सरिता त्यजि न मर्यादा । अनुसरे पतिसि रागांधा । परि वारिधि निजलहरी ॥ २ ॥**

**विहार**— पुरुषांच्या स्थैर्याचे आणि बायकांच्या चंचलपणाचे नाही का दाखले देतां येणार ?

( मुखमिटी दिलावे ०– या चालीवर )

**घन नभीं स्थिर असे पाहीं । चंचला तडिल्लता परी सदाहि ॥ १ ॥ तरु वसे सदा स्थिरदेही । हालते लता समीरहुंकृतींहि**

॥ २ ॥ ध्रुव तसा अचल पदिं राही । तारका तदाश्रिता विलोल मोहिं ॥ ३ ॥

पण अशा निरर्थक गोष्टींत वेळ घालवून काय फायदा ? वेळींच परीक्षा न झाल्यामुळे पुष्कळदा रोग असाध्य होऊन बसतात. मला तुमच्या रोगाची फार काळजी लागली आहे. मुखपरीक्षा झाली असती म्हणजे मग औषध सुरू करितां आलें असतें.

**तरंगिणी**— परीक्षा नीट न झाल्यामुळे माझा रोग विकोपाला जाऊन माझा प्राण जाईल येवढेंच ना ? त्याला माझी तयारी आहे.

**विहार**—तुमची असेल, पण तुमच्या मित्रमंडळीची नाही ना ! काय करावें बोवा ? मोठी अडचण येऊन पडली आहे. तुम्ही आपला बुरखा दूर करीत नाही. तो दूर नाही झाला की मुखपरीक्षा होणार नाही. ती झाली नाही की रोग दुर्धर होणार. आणि तसा झाला म्हणजे—छेः ! तो विचारच असह्य आहे ! आता मीहि तुमच्याप्रमाणेच एक प्रतिज्ञा करून चुकलों आहें, की पुन्हा लग्न करावयाचें नाही. आता मीं तुमच्याशीं लग्न केलें तरच तुम्ही मला बुरखा दूर करूं देणार आणि मीं लग्न केलें की माझी प्रतिज्ञा मोडणार. याप्रमाणे आपल्या दोन्ही प्रतिज्ञांचा कलह सुरू होऊन वेळ मोठ्या आणीबाणीची आली आहे. आता माझी ही पक्की खात्री आहे की तुम्ही स्त्रीजातीच्या असल्यामुळे आपला हेका काही केल्या सोडणार नाही. मलाच आपला सोडावा लागणार. पण स्नेह्याच्या जिवाकरिता आपली प्रतिज्ञा मोडण्याला काय हरकत आहे ? कृष्णानें नाही का अर्जुनाकरिता सुदर्शनचक्र हातीं घेतलें ? मग मला तरी हें सुदर्शन मुखमंडल स्वीकारण्याला काय प्रत्यवाय आहे ?

**तरंगिणी**— या गोड गोड गोष्टी आता पुरे झाल्या. गोडाची तेव्हाच तोंडाला मिटी बसते.

**विहार**— गोडाची मिटी बसते असें तुम्ही म्हणतां. पण तुमच्या गोड हातांची माझ्या कंठाला अजून मिटी बसत नाही.

**तरंगिणी**— पुन्हा तेंच ! हं सांगा लवकर आपला निश्चय ?

**विहार**— सुंदरि, झाला माझ्या मनाचा घडा !

( भिउं नको जिवलग सुंदरि ०- या चालीवर )

**तव पदिं अंकित किंकर वाहीं तनुलागि मम सुंदरि ॥ ध्रु० ॥**
**स्थिति तव दुर्धर झाली रोगोपशमा योजिं दास निर्धारीं।**
**पुलकित कृश तनु टोंचितसे या हृदया कंप पावते भारी।**
**मुखिं अवगुंठन राहे हो न परीक्षा पूर्ण तेणें अवधारीं। त्यातें दूर करीं ॥ १ ॥**

**तरंगिणी**— पण आपण आपल्या पहिल्या पत्नीच्या मरणानंतर एक महिन्याच्या आंतच दुसरें लग्न करण्याला तयार झालांत यावरून एक तर आपला लहरी स्वभाव दिसतो—

**विहार**— लहरी ? मुळींच नाही.

**तरंगिणी**— किंवा आपली पहिली पत्नी आपली अशी तशीच असल्यामुळे तिजवर आपलें प्रेम नसेल.

**विहार**—हा, असा कांहीसा प्रकार होता खरा ! ती स्वभावानें जरा हट्टी होती.

**तरंगिणी**— पण मीहि तशीच आहें हें आपल्या निदर्शनाला येऊन चुकलेंच आहे.

**विहार**— शिवाय तिचें रूप या सौंदर्याच्या पासंगालाहि पुरण्यासारखें नव्हतें. तिचें तोंड होतें आपलें ओबडधोबडच ! पण बाबांनीं लहानपणीं गळयांत बांधिली होती. टाकायची आहे थोडीच !

**तरंगिणी**— आपण म्हणे पुनर्विवाहाला फार विरुद्ध होतां ?

**विहार**— प्रथम विरुद्ध होतों, पण मजवर विधुरावस्थेचा प्रसंग आल्यानंतर माझ्या मनात त्यासंबंधानें विचार घोळावयाला लागून हल्ली माझें मत असें झालें आहे की विधुराला लग्न करावयाचें असलें तर गतभर्तृकेशींच करावें. त्यानें बालिकेशीं लग्न करणें म्हणजे तिजवर अकालीं मृत्यु ओढून आणण्यासारखेंच आहे. सुंदरि, आता यासंबंधानें अधिक चर्चा न करितां आपल्या मुखचंद्रावरील परिवेष दूर कर.

**तरंगिणी**— माझें तोंड पाहिल्यावर घाबराल बरें का ! सांगून ठेवितें. कदाचित् आपल्या पहिल्या कुटुंबाच्यासारखें ओबडधोबडच दिसून येईल.

**विहार**— काय हा विनय !

**तरंगिणी**— हा सारला बुरखा बाजुला–( बुरखा काढिते; विहार भीतीनें मागे सरतो. )

**विहार**-- भूत ! भूत !

**तरंगिणी**— हं, ओरडूं नका. मी आपली धर्मपत्नी तरंगिणी आहें.

**विहार**-- तूं तरंगिणी ? मग कल्याणी कुठे आहे ?

**तरंगिणी**— तिला मोठा रोग जडला होता त्यानें ती नुक्तीच मरण पावली.

**विहार**— पण तरंगिणीहि मरण पावली होती ! ही काय भुताटकी आहे कोण जाणे ?

**तरंगिणी**– अजूनहि माझी ओळख पटत नाही का ?

**विहार**– माझ्या जागीं जर एखादा श्रद्धाळू असता तर त्यानें तुझीं पावलें उलटीं आहेत का हें पाहिलें असतें.

**तरंगिणी**–माझें पाऊल कधी कोणाला उलटें दिसायचें नाही. असे बावरूं नका. आपल्या प्रेमाची कसोटी पाहाण्याकरिता आणि साधल्यास चकोर-चंद्रिकेचा विवाह घडवून आणण्याकरिता मीं मेल्याचें खोटेंच उठविलें आणि कल्याणी हें नांव घेऊन आपली परीक्षा पाहिली, तिच्यांत आपण चांगले उतरलांत.

**विहार**– प्रिये,

( सर्वेहि सोड राग०–या चालीवर )

**लज्जानंद गमति अंतरीं । समयीं एका ॥ पात्र न मी त्वत्प्रेमा तरी । पुनरपि लाधलीस सुंदरि । संसृतिनौका ॥ ध्रु० ॥ भार्या गत झालि न तोंवरि । तद्गुणशंका ॥ अंधा चंद्रिका न सुख वितरी । दिन जरी राका ॥ परि ती गत होतां मनिं करी । खेदाचे अंका ॥ झालिस गुप्त कांहि दिनभरी । वेडें करुनि मला गुणभरीं । आलिस सुखवाया मज परि । लावुनि चटका ॥ १ ॥**

**तरंगिणी**– पुन्हा ओबडधोबड चेहरा मिळाल्याबद्दल खंती वाटत असेल नाही ? पण मी म्हणतें,

( तुझी स्मृति मजला०– या चालीवर )

**असूं बहु विजोड करुनि गोड घ्या बळें मला । पदरिं अपुल्या पडुनी पवित्र देह जाहला ॥ ध्रु०॥ धवल चंद्र कृष्ण निशा । सेविति निःसीम अशा । सौख्यशांतिला ॥ १ ॥**

**विहार**- प्रिये, कृपा करून असें हिणवूं नकोस. मला तुझा किती ध्यास लागला होता याला चकोरच साक्ष आहे.

**तरंगिणी**- तो मला वेळोवेळीं सगळें वर्तमान कळवीत आला आहे.

**विहार**- या त्याच्या कामगिरीबद्दल बक्षीस म्हणून त्याला चंद्रिका अर्पण करायची.

**तरंगिणी**-पण अहेर करितांना खणाला कुंकू लावून नंतर अर्पण करितात.

**विहार**— प्रिये, तूं आपल्या हातानें तिला आज कुंकू लावून व इतर सौभाग्यचिन्हें अंगावर घालून तयार ठेव. आपण आता बरोबर मिळून बाबांच्या घरीं जाऊं. तेथे मनोहराचीहि गांठ पडेल. मी हीं घाणेरडीं वस्त्रें काढून आणि नेहमीचीं चढवून तयार होतों. ( जातात. )

---

## प्रवेश ५ वा

### ( आनंदराव व हरिहरशास्त्री )

**हरिहर**-हं ! आता येथे नीट उभे राहा. चित्त कावरेंबावरें होऊन हातपाय कांपत असतील तर या खांबाला धरा. माझें अंग आज मोडून आलें आहे म्हणून मीहि एक खांब धरून ठेवितों. हें पाहा त्यांचें संभाषण नीट ऐकूं येत आहे. ( नंतर पडदा वर जाऊन **मनोहर** व **सरस्वती** दिसतात. )

**सरस्वती**- महाराज, आता आपण माझ्या पकडींतून कसे सुटणार ? आता माझी इच्छा आपण पूर्ण केलीच पाहिजे.

**हरिहर**- ऐकलेंत ना ?

**आनंदराव**- दुर्दैव माझें !

**मनोहर**- सरस्वति, पुन्हा तुझ्या वेडानें उचल खाल्ली वाटतें ? अग, तुला मीं काळजीनें शिकविल्याबद्दल नुक्तीच आनंदरावांनीं आश्रमाला चांगली देणगी दिली आहे. आणि त्याच शिक्षणाचा असा परिणाम व्हावा ना !

**सरस्वती**-अजून सर्वांत मोठी देणगी आपल्या आश्रमाला मिळायचीच आहे.

**मनोहर**- ती कोणती ?

**सरस्वती**- ही पाहा ! (स्वतःकडे बोट दाखविते.) आपणांसमोर मूर्तिमंत उभी आहे ! आपला आश्रम चांगला चालायला पैसा पाहिजे, तशा विधवाहि पाहिजेत. हें तत्त्व ओळखूनच माझ्या पतींनीं येवढ्या प्रौढपणीं माझ्यासारख्या मुलीशीं विवाह केला.

**मनोहर**– सरस्वती, मी तुला निक्षून सांगतों.

( भूप-त्रिवट )

**विकल करिति तव बोल हृदय हें । सह्य गमे गरल याहुनि जें शीघ्र देह दाही ॥ ध्रु० ॥ जननीसम तव अपार पाहीं उपकृति सदये हो परी । मम मति कुंठित कसि तव न या साही ॥१॥**

**आनंदराव**– (एकीकडे) शाबास, मनोहरपंत !

**सरस्वती**–पण आता आपल्या इच्छेवर राहिलें आहे कुठे कांहीं? आपण माझ्याशीं परवा जी प्रतिज्ञा केली तिच्यांत आपण सपशेल फसलां. आता आपल्या मनांत नसलें तरी आपणांला माझा स्वीकार करावा लागेल.

**मनोहर**– सरस्वती,

( तोंतननन वाजवि०– या चालीवर )

**तव वचन गहन हें भासे । आकलन करावें कैसें । मन चिंतित परि आयासे । नच संशय सोसे । (चाल) प्रकट करुनि निज भावार्थ सहज करिं सदैव मज उपकृतिबद्धचि निमिषें ॥१॥**

**सरस्वती**– असें वेड पांघरण्यांत काय अर्थ आहे ?

( चाल–सदर )

**किति अंत पहातां कांता । कां लपवितसां हो स्वांता । निष्कारण ही कातरता । कुणि निकट न असतां । ( चाल ) वचन दिलें जें पूर्ण करा तें मार्ग न यांतुनि सुटकेचा लव आता ॥ १ ॥**

बरें, आपलें वांकडें पाऊल पडलें असलें तर त्यांत आपणांकडे फारसा दोषहि नाहीं. कारण बुद्धिवान् मनुष्याचें डोकेंच इतकें तरतरीत असतें की त्यावर प्रत्येक वस्तूचा ग्रह तावडतोब उमटतो. मग स्त्रियांचें सौंदर्यच अपवाद कसें होईल ? तेव्हा आपला भ्रंश झाला असल्यास त्यांत आपणांस वाईट वाटण्यासारखें कांहीं नाहीं.

**मनोहर**–अजून माझ्या डोक्यांत कांहीं प्रकाश पडत नाहीं !

**सरस्वती**— त्या कल्याणीच्या विरहानें अंधार झाला आहे ! प्रकाश पडावा कसा ?

**मनोहर**—आता माझ्या लक्षांत आलें. सरस्वती, हा तुझा संशय निर्मूल आहे.

**सरस्वती**— हें नुस्तें तोंडानें म्हणून नाहीं व्हावयाचें ! सिद्ध करून दिलें पाहिजे.

**मनोहर**— इतक्या सोकर्यीनें आणि इतक्या चांगल्या रीतीनें सिद्ध करून देईन की तुझा संशय एका क्षणांत पार फिटून जाईल.

**सरस्वती**— असें कधीं व्हायचेंच नाहीं !

**मनोहर**— आणि झालें तर ?

**सरस्वती**—मग मीहि कबूल केल्याप्रमाणे आपल्या पतीशीं मरेपर्यंत एकनिष्ठपणानें वागेन.

**मनोहर**—माझ्या गळ्याची शपथ वाहा.

**सरस्वती**—आपल्या गळ्याची शपथ. बाकी, ही शपथसुद्धा वाहायला नको होती. कारण—

( तेरे घरमें दूसरी नार०— या चालीवर )

**पदिं याच गुंतुनी जाइ सकलही प्रेम मम साचें ॥ ध्रु० ॥**
**निखिल भुवन लघु मानसिं गणिं मी तुल्य मृत्तिकेचें ॥ १ ॥**
**आपण गिरिपरि दृढ तरि माझ्या भय चरिता कैचें ॥ २ ॥**

**मनोहर**-सरस्वती, हें ऐकून मला मनापासून आनंद होत आहे. तुझें मजवरचें प्रेम जरी अयोग्य आणि निंद्य असलें तरी त्यानेंसुद्धा तुझें अंतःकरण निर्मल केलें.

( टुंक भुज कवन छुप०—या चालीवर )

**हो मन शांत खरें प्रणयानें । क्षुब्ध जलधि जैसा स्नेहानें ॥ध्रु०॥**
**इतरांविषयीं प्रेम तुझें निष्पाप खरें जाहलें । मजवरिचेंही प्रेम तसें होइल अल्पाचि कालें ॥ १ ॥**

( **आनंदराव** व **हरिहरशास्त्री** समोर येतात. )

**आनंदराव**—शाबास ! मनोहरपंत, शाबास ! तुम्ही मित्रधर्माला चांगले जागलांत. अरे, सरस्वती मूर्छित होऊं लागली. ( तिला सावरून ) सरस्वति, तुला लाजण्याचें कांहीं कारण नाहीं. उलट मींच लाजलें पाहिजे. तूं जी माझ्या परोक्ष म्हणून माझी निंदा आणि निर्भर्त्सना केलीस तिला मी पात्रच आहें. या महात्म्याच्या सहवासानें सुबुद्ध आणि सुविचारी झालेल्या माझ्या पत्नीचा

मी आनंदानें अंगीकार करीन. मात्र तो या क्षणीं न करितां माझा मित्र तुझी संशयनिवृत्ति करून आपल्या प्रतिज्ञेतून मोकळा झाला म्हणजे करीन.

**सरस्वती**- आपलें औदार्यच मला जन्मभर उपकारबद्ध करण्याला पुरेसें आहे.

**मनोहर**-हे शास्त्रीबुवा याठिकाणीं येण्याचें कारण ? हें घर यांना वर्ज्य होतें ना ?

**आनंदराव**— या नीचानें तुम्हा उभयतांविषयीं मला खोटेंनाटें सांगून आपल्या म्हणण्याचा प्रत्यक्ष अनुभव आणून देण्यासाठीं येथे आणिलें.

**मनोहर**—माझ्या सत्त्वाची कोणी परीक्षा पाहूं लागलें की त्यांत मला राग नसून आनंदच आहे !

**आनंदराव**—बावनकशी सोन्याला अग्नीची भीति कुठून असणार ?

**हरिहर**—याच्या शिक्षणानें सरस्वतीबाईचें तर मन बिघडलें कीं नाहीं ? माझ्या सांगण्यापैकीं अर्धा भाग खरा ठरलाच की !

**सरस्वती**—मेल्या, माझ्या मनांत अयोग्य विचार यावयाला तूंच खरोखर कारण झालास. ( आनंदरावास ) हें पाहिलेंत का पत्र ? यावरून या कसाबाच्या करणीबद्दल आपली खात्री होईल.

**आनंदराव**—अरे मांगा ! एकूण तूं मत्सरानेंच प्रेरित होऊन माझें मन कलुषित करण्याला प्रवृत्त झाला होतास ? तुला कोणतीहि शिक्षा केली तरी ती कमीच होणार आहे.

( **चकोर, चंद्रिका, विहार,** बुरखा घेतलेली **तरंगिणी, हंसिका, वेणुबाई** व एक सरकारी **शिपाई** प्रवेश करितात. )

**चकोर**- हं शिपाईबुवा, या नरामधाला पकडून तुम्ही आपल्या कामाला लागा. यानेंच तें अर्भक अनाथगृहांत पोहोंचवितों म्हणून तेथपर्यंत जाण्याचे श्रम न घेतां जिवें मारिलें. ( शिपाई हरिहरशास्त्र्यास पकडतो. )

**शिपाई** हं, अशी घडपड करूं नका. आपणांविरुद्ध पुरावा संगीन तयार आहे.

**हरिहर**–मी कायद्याच्या तावडींत जाणारा मनुष्य नाहीं. हें पहा, (खिशांतून एक कुपी काढून तिच्यातील एक गोळी खातो. ) या विषापुढे तुमचा काय इलाज चालणार आहे ?

**शिपाई**—बरें, चल चल ! ढोंगी कुठचा !

**हरिहर**–मी तर आता मरतोंच. पण मरतांनासुद्धा मी त्या रात्रीं मनोहराला मारून बेशुद्ध केल्याचें मला समाधान वाटेल ! ( शिपाई हरिहरशास्त्र्यास धक्के मारीत नेतो. )

**आनंदराव—** असें काय ! यानेंच तर तुमच्या प्राणांवर संकट आणिलें होतें ? पण याला आता एकदम पकडण्याचें कारण काय ?

**चकोर**-आपल्याच पातकाच्या जाळ्यात आपण सांपडला झालें ! दुसरें काय?

**भेकड**-( प्रवेश करून ) शास्त्रीबुवा रस्त्यांतच डोळे पांढरे करून पडले ! त्यांना दोन तीन शिपाई उचलून चावडीवर नेत आहेत ! त्यांचे डोळे इतके भेसूर दिसत होते की आज रात्रीं माझ्या स्वप्नांत मला तेच दिसणार !

**मनोहर**-जिवंत माणसें कशीं मरतात हा चमत्कार तुम्हीं ऐकलाच. आता मेलेलीं माणसें जिवंत कशीं होतात हा चमत्कार तुम्हांला प्रत्यक्ष दाखवितों. (तरंगिणीच्या चेहऱ्यावरचा बुरखा दूर करितो; तरंगिणी आनंदरावांच्या पायां पडते.)

**आनंदराव**- कोण ? तरंगिणी ?

**चंद्रिका**- ( एकीकडे ) माझा तिकडच्या वर्तनाबद्दलचा संशय एका निमिषांत निघून गेला !

**सरस्वती**- (एकीकडे) माझी सारी शंका कशी लागलीच फिटून गेली.

**आनंदराव**- हा काय चमत्कार आहे कळूं तरी द्या ! मनोहरपंत, तुम्हीं आपल्या पुण्यसामर्थ्यानें हिला जिवंत केलें असें जरी आम्हांला सांगितलेंत तरी आम्ही तें खरें मानूं. कारण तुमच्याकडून प्रत्यहीं होणाऱ्या तपाला काय अशक्य आहे ?

**मनोहर**-माझ्या पुण्यबलानें नाहीं, तर चकोराच्या प्रेमबलानें हा घाट जुळवून आणिला. विहाराची प्रतिज्ञा आपण ऐकिली आहेच. तिचें सत्त्व पहाण्याकरिता चकोरानें तरंगिणी गत झाल्याबद्दल खोटेंच उठविलें आणि शेवटीं या असत्याचा जय झाला ! या सगळ्यांत माझें साह्य मौनापलीकडे फारसें नव्हतें.

**आनंदराव**- प्रेमांत आणि युद्धांत सर्व कांही क्षम्य असतें.

**विहार**- बाबा, माझें मत आता पुनर्विवाह इष्ट आहे असें झालें आहे. हिनें आज अशीं कांहीं भक्कम प्रमाणें मजसमोर मांडिलीं की तीं कबूल करण्याशिवाय इलाजच राहिला नाहीं.

**चकोर**—(विहारास) असा प्रत्येकांच्या मतांत थोडा थोडा फरक झाला आहे. तुमचें मत पुनर्विवाहाला जसें अनुकूल झालें तसें चांद्रिकेचें मत पुरुषाच्या चित्तस्थैर्याबद्दल प्रतिकूल होतें तें अनुकूल झालें आहे. आमच्या ताईला मात्र याच्या अगदी उलट अनुभव आला.

**विहार**– (चकोरास) अरे, तसा अनुभव आला म्हणून तर तुला चांद्रिका लाधणार. (आनंदरावास) बाबा, आता चकोराच्या आणि चांद्रिकेच्या लग्नाला अडथळा तो कोणता राहिला ?

**आनंदराव**–या सर्व प्रकाराचा इतरांप्रमाणे मजवरहि परिणाम घडला नसता तर कदाचित् या विवाहाला मजकडूनच अडथळा आला असता. पण यानें मजमध्ये पूर्वी नसलेलें मनोधैर्य उत्पन्न केलें आहे. आणि उद्याच्याच मंगल मुहूर्तावर यांचा विवाह स्वतः लावण्याचा माझा संकल्प झाला आहे. सरस्वति, या वाग्निश्चयाची खूण म्हणून या दोघांचे हात एकमेकांच्या हातांत घालूं. (तसें करितात.)

**हंसिका**– ताई, त्या दिवशीं तूं मला लपूनसुद्धा कुंकूं लावून देत नव्हतीस; पण आता सगळ्यांच्या देखत लावायला तयार झालीस ना ?

**सरस्वती**–बाळे चांद्रिके, मीं तुला फार वाईट वागविलें त्याबद्दलचा राग गेला का ?

**चंद्रिका**–आई, तुझें आताचें वर्तन इतकें प्रेमळ आहे की पूर्वीच्या आठवणीचा त्याची किंमत वाढविण्यापलीकडे कांहीच परिणाम होणार नाही.

**मनोहर**– आनंदराव, गेल्या महिन्यांत घडलेले आणि आजच्या आनंदाच्या दिवसाला कारणीभूत झालेले प्रकार आपणांस केवळ निमित्त म्हणून बाहुल्यांप्रमाणे पुढे करून ज्या सूत्रधारानें घडवून आणिले, त्याची आता मनोभावानें स्वदेशाच्या कल्याणाकरिता प्रार्थना करूं.

**सर्वजण**

( जयति जय सुरसरित् ० – या चालीवर )

**सुभगपण भरतभूप्रति वितरिं ईश्वरा ॥ध्रु०॥ स्वातंत्र्य म्हणुनि शिरीं । सौभाग्य-तिलक धरि । क्रूर कालें स्वकरिं । पुशियला तो पुरा ॥१॥ सूत्रिं मंगल जिवें । नृमणिमाला खचे । शून्य-कंठा रुचे । तुजसी ती पामरा ॥२॥ भूतिकबरी विपुल । जाहली परि विरल । विखुरली अतिचपल सांवरी ती जरा ॥ २ ॥**

( पडदा पडतो. )

---

# टीपा व संदर्भ

अ. १. पृ. १ : 'नमित ईश पदसरोज'—ज्याच्या कृपापूर्ण दृष्टीचा प्रकाश पापरूपी चिखल तापजनक नाहीसा करतो व भयंकर विघ्नें हींच कोणी अंधार त्या अंधाराचा नाश करतो, अशा त्या शंकराच्या पदकमलाला आम्ही नमन करतों. कुंभयोनि म्हणजे अगस्त्य, त्याचा पति जो शंकर त्यानें समुद्राकडे पाहिलें व त्याच्या चित्तांत दया उत्पन्न झाली. नंतर त्यानें गंगा-स्वीकार केला. जरी ही गंगा विष्णूच्या चरणांतून बाहेर पडली तरी शंकरानें तिला डोकीवर धारण केलें आणि तिनें शंकराच्या सर्व तापाचा नाश केला.

पृ. २ : मनोहरचें भाषण कल्पनाविलासपूर्ण पण कृत्रिम भाषा-सरणीचें आहे.

पृ.४ : 'मनोहर—या भयंकर तापाच्या साथीमुळे': १८९६–९७ सालीं उद्भवलेल्या प्लेगाच्या साथीला उद्देशून हें असावें.

पृ. ८ . प्रवेश २—सुरवातीचें आनंदरावाचें भाषण विरोधाभासाचें उत्तम उदाहरण आहे. फुलावर सर्प व सर्पावर फुलें हीं उदाहरणें कोटीक्रम-युक्त लेखनाचा आरंभ आहे.

पृ. १० : 'आनंदराव—अर्थशास्त्राच्या दृष्टीनें विचार केला.' इ आगरकरांचा 'अलंकार मीमांसा' निबंध वाचा.

पृ. १२ : बंगाली धर्तीवरील नांवें—मनोरंजन मासिकाचे संपादक श्री. मित्र यांनीं प्रथम बंगाली नांवें प्रचलित केलीं. उ. चित्तरंजन, मृणालिनी, वसंत कुमार.

पृ. १३ : 'पण या सुधारकांनी पुनर्विवाहाचा प्रचार सुरू करून स्वैपाकिणी अगदी महाग करून टाकिल्या आहेत.'

श्री. म. शि. गोळे यांनीं 'हिंदुधर्म आणि सुधारणा' हें पुस्तक लिहिलें. त्यांत हिंदूंच्या आचारविचारांचे समर्थन करण्याचा प्रयत्न केला आहे. बालविवाहाच्या मंडनाबरोबर पुनर्विवाहाची अनावश्यकता त्यांनी प्रतिपादन केली. भाग ३६ आणि ३७ मध्यें त्यांनीं विधवा विवा-

हाचा प्रश्न चर्चिला असून ‘ विधवांच्या विवाहास जागाच नाही, असें संख्याशास्त्रदृष्टया सिद्ध करण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. ( मूळ पुस्तक पृ. २३५–३६ वाचा ) श्री. कोल्हटकर यांनी या ग्रंथावर जोराची टीका ( विविधज्ञान विस्तार पृ. ३० अं. ४–५–६ ) केली आहे. त्याला अनुसरून हें उपहासात्मक वाक्य या ठिकाणीं योजिलें आहे.

पृ. १५ : **‘आपण दोघें–रथांत बसुनी’** या पद्यांत सरस्वती मनोहरावर लुब्ध होते परंतु मनोहर मोहातीत असल्यामुळे सरस्वतीचें मन योग्य मार्गावर येतें. सरस्वती व आनंदराव यांचा संसाररथ परत नीट चालू होतो ही घटना सूचित आहे. कोल्हटकरांच्या कल्पनाविलासाचा व काव्यमय नाटयात्मकतेचा हा उत्तम नमुना आहे. याशिवाय या पदानंतरचें मनोहरचें आगमन पताकास्थानासारखें सूचक आहे.

पृ. १८ : **‘आनंदराव–आमची एक जवळची.–’** इ. नवीन सामाजिक सुधारणा सुरू झाल्या, त्यावेळीं जे सुधारक म्हणून समजले जात, त्यांचे कर्ते सुधारक व बोलके सुधारक असे प्रकार करण्यांत येत. बोलके सुधारक फक्त सुधारणा व्हावी या विषयावर तोंडपाटीलकीचीं व्याख्यानें देत. त्यांची कृति उक्तीच्या अगदी विरुद्ध असे. प्रत्यक्ष सुधारकांचे या कामाचे अग्रणी न्यायमूर्ति रानडे यांच्यावरहि बोलके सुधारक म्हणून हल्ला चढविण्यांत आला. कारण द्वितीय विवाह करणें प्राप्त झालें असतां त्यांनीं विधवाविवाह न करतां एका कुमारिकेशीं विवाह केला. प्रसिद्ध कादंबरीकार कै. ह. ना. आपटे यांच्याहि आयुष्यांत असाच प्रसंग घडला. वडील माणसांच्या आग्रहासाठीं असें करावें लागलें असा त्याचा बचाव करण्यांत येतो. ( प्रा. न. र. फाटक कृत रानडे चरित्र प्र. ८ पृ. २११-२१५ कु. वेणूबाई पानसे कृत आपटे चरित्र प्र. ८ पृ. ११०–११३. )

**अंक २.** पृ. ३३–**‘मनोहर–कृष्ण मेघरूप राक्षसांची सेना इ.’** भाषण अलंकारिक असलें तरी नाटयास अस्वाभाविक आहे.

पृ. ३४ : **‘बाह्य सृष्टि भासे.’**—मनाला आरसा म्हणतात की ज्यांत बाह्य वस्तूंचें प्रतिबिंब पडतें, पण ही गोष्ट खरी नाही, उलट असें म्हणणें योग्य होईल कीं बाह्य वस्तु ही आरशासारखी असून मनाचें प्रतिबिंब त्यांत पडतें.

पृ. ४८ : **कात्यायनीव्रत**—पुस्तकांत कात्यायन असें चुकीचें छापलें आहे. कात्यायनी–पार्वती तिला उद्देशून करावयाचें व्रत.

पृ. ५० 'हरिहरशास्त्रीं–गुरुशीं संबंध केला असतां तो पापाचरणा–खालीं येत नाहीं. गुजराथ, काठेवाडकडे प्रचलित असलेल्या वल्लभपंथी-यांत ही रूढि आहे.

अं. ३ पृ. ५७ : चकोर–ही वृंदावनाभोवतीं प्रदक्षिणा घालतांना इ.— भौगोलिक शास्त्रीय ज्ञानाचा सत्यापलाप न करितां लेखकानें केलेला अलंकारिक उपयोग ध्यानांत घेण्याजोगा आहे.

अं ३. पृ. ५७ : 'भेटसि कां भिन्न अंगीं मजसि जानकी'–स्त्रियांच्या सौंदर्याविषयीं असलेलीं सर्व उपमानें या पद्यांत आलीं आहेत. कटी सिंहाच्या कटीसारखी, दृष्टि हरिणाच्या दृष्टीसम, वेणी सर्पासारखी, कोकिळेच्या शब्दासारखा शब्द, चाफ्यासारखें नाक, बाहू लतेप्रमाणें, मांड्या केळीसारख्या, ओठ पोंवळ्यासारखे, कंठ शंखाच्या आकाराचा, डोळे कमळासारखे, शुद्ध मन निर्मळ पाण्यासारखें.

पृ. ६० : 'चन्द्रिका–पण वाईट रूढि नाहींशी करून चांगली पाडणें शक्य तरी आहे कां?'

लेखकानें हा महत्वाचा प्रश्न उत्पन्न केला खरा पण त्याचें योग्य उत्तर कोणत्याहि पात्राच्या तोंडीं आलेलें नाही. जें उत्तर आलें ते हेत्वाभासात्मक आहे (केळकर–खंड १० साहित्य खंड पृ. ९१२ पाहा)

पृ. ६२ 'चकोर–आकाश–कमलतंतूंनीं विणलेला अंतरपट इ.'– अलंकारिक भाषेच्या हव्यासामुळें भाषासरणी किती कृत्रिम होते यांचें उदाहरण

पृ. ६४ : 'हरिहर–दादासाहेब मी करतों याचें समाधान.'—

श्री. गोळे कृत 'हिंदुधर्म आणि सुधारणा' यांतील हा मुद्दा केवळ टर उडविण्याच्या हेतूने हरिहराच्या तोंडीं घातला आहे.

पृ. ७१ : 'सुख न लाधणें'–प्रेम आणि कलह, प्रकाश–काळोख, मऊ–कठोर, उन्हाळा–थंडी अशा प्रकारचीं द्वंद्वें नसल्यास माणसास सुख मिळत नाही ! विरोधी वस्तु असल्याखेरीज एखाद्या वस्तूची खरी योग्यता कळून येत नाही. मिठाची गोडी अन्नांत नसल्यास अन्न गोड लागत नाही, तसें प्रेमाचें आहे.

पृ. ७२ : 'ही प्रसंगी भानिति' .—पुढील प्रसंगीं असत्य बोललें तरी दोष लागत नाही असें एक संस्कृत वचन आहे:—

न नर्मयुक्तं वचनं हिनस्ति न स्त्रीषु राजन्नविवाहकाले। प्राणात्यये सर्वधनापहारे पंचानृतान्याहुरपातकानि। (महाभारत.) थट्टेत, स्त्रियांशीं बोलतांना, विवाहप्रसंगी, प्राणावर बेतलें असतां, सर्वस्वाचा नाश होत असतां, असत्य बोलणें पाप ठरत नाही.

अ. ३ पृ. ८२ : ' विहार ( स्वतःशीं ) '—पुस्तकांत हे शब्द चुकून आलेले आहेत. त्या ऐवजी ' चकोर ( स्वतःशीं ) ' असे पाहिजेत.

अं ४ पृ. ८९ : ' अर्धांगीरूप उत्तमांग.—'

सुभाषितः—विश्वासप्रतिपन्नानां वंचने का विदग्धता।
अङ्कमारुह्य सुप्तानां हन्तुः किं नाम पौरुषम्॥

पृ. ८४ 'सरस्वती—जिथें परमरुचि दिसेल हृदयींची गत जन्मींची' तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वं भावस्थिराणि जननान्तर सौहृदानि॥ (कालिदास : शाकुंतल अ. ५)

अं.४ : पृ.९२ : 'रात्रि पसरि निज वसन अवनिवरी'—रात्र आपलें अंधाररूपी वसन (वस्त्र) सर्व पृथ्वीवर पसरते. आपल्या लोकांनीं केलेलें दुष्कृत्य आपल्या दाट अंधारांत लपवून त्यांची लाज राखते. प्रणयानें करुण झालेलें अन्तःकरण सावरून व त्याचें रक्षण करून त्या अनाथ अन्तःकरणाला तारते. अत्यंत कर्कश असा रातकिडयांचा आवाज उत्पन्न करून प्रेमक्रीडेच्या आवाजावर एका क्षणांत ताबडतोब छत्र ( संरक्षण ) उभारून प्रेमी लोकांचा निष्पाप असा प्रेमकलहाचा आवाज ( गस्त घालणाऱ्या ) राजपुरुषांच्या आवाजांत नाहीसा करून ही रात्र सर्व सृष्टीला झोंप आणते.

पृ. १०८ : गीतनिरत—स्तुतींत रममाण होणारी. ज्ञान—तरणि किरणीं पुरुष शोभे ! ज्ञान रूपी सूर्याच्या प्रकाशानें पुरुष शोभतात उलट स्त्रिया म्हणजे जणूं अंधाराने भरलेली छायाच. हा स्त्रियांचा कलंक कृपापूर्ण हस्तानें ताबडतोब धुवून टाक.

पृ. १३५ : 'चकोर—असा कित्येकाच्या मतांत थोडाफार फरक झाला आहे. इ., या विधानावरून ' मतिविकार ' हें नांव एका अर्थीं सार्थ म्हणावे लागेल

पृ. : १३६ भरत वाक्यांतील राष्ट्रमातेच्या सौभाग्याची कल्पना पहा

———